# सागराचा जन्म

मूळ लेखक
कॉन्स्टंटीन पाउस्तोव्स्की

अनुवाद
शांता रानडे

प्रागतिक पुस्तक प्रकाशन,
पुणे

प्रकाशक
प्रागतिक पुस्तक प्रकाशन, पुणे
C/o शांता रानडे
६।१ बुधवार पेठ
लक्ष्मी रोड, पुणे ४११००२

पंचविसावे प्रकाशन

प्रथमावृत्ती : ७ नोव्हेंबर १९८७

मुद्रक
चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय
' शिव-पार्वती '
टिळक रस्ता, पुणे ४११०३०

मूल्य २५ रुपये

नव्या सोव्हिएट समाजाच्या उभारणीसाठी
कणाकणाने झिजून
आपली जीवने समर्पित करणाऱ्या
ज्ञात-अज्ञात अशा
**सोव्हिएट नागरिकांना**
विनम्र समर्पण

# प्रकाशकाचे निवेदन

आमच्या प्रागतिक पुस्तक प्रकाशन पुणे या प्रकाशनसंस्थेतर्फे प्रकाशित होणारे हे २५ वे पुस्तक आहे. आजवर आम्ही मार्क्सवादावरील अभिजात ग्रंथांचे अनुवाद, कै. इतिहासाचार्य राजवाडे यांचे दुर्मिळ झालेले "विवाह संस्थेचा इतिहास," "स्त्री चळवळीची वाटचाल," समाजवादाची थोडक्यात ओळख करून देणारे "समाजवाद म्हणजे आहे तरी काय ?" तसेच "मुस्लिम श्रमिका" "डबाबाटलीवाली" यासारखी सर्वेक्षणावर आधारित पुस्तके व काही पुस्तिका असे साहित्य प्रकाशित करून महाराष्ट्राच्या वैचारिक प्रबोधनास हातभार लावलेला आहे.

"सागराचा जन्म" या कादंबरीच्या प्रकाशनाने आम्ही एक नवे पाऊल टाकत आहोत. क्रांतिपूर्व रशियातील अभिजात रशियन साहित्यिकांच्या अनेक कलाकृतींचा अनुवाद मराठी वाचकास उपलब्ध आहे. बहुतांशी ते अनुवाद त्या साहित्य कृतींच्या इंग्रजी अनुवादावरूनच केलेले आढळतात. पण १९१७ सालच्या रशियातील राज्य-क्रांतीनंतर उदयाला आलेल्या सोव्हिएट युनियनमध्ये जो वर्गविहीन नवा समाज घडू लागला त्याचे प्रतिबिंब उमटलेल्या सोव्हिएत साहित्यकृतींपैकी फारच थोडे साहित्य मराठी वाचकांना उपलब्ध झालेले आहे. कॉन्स्टंटीन पाऊस्तोवस्की यांच्या "रज्दयेनिये मोर्या" या मूळ रशियन भाषेतील कादंबरीचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याची संधी या प्रकाशनाने आम्ही घेत आहोत.

श्रीमती शांता रानडे यांनी या कादंबरीचा मराठी अनुवाद केला आहे. या अगोदर त्यांनी "मार्क्स–एंगल्स यांचा निवडक पत्रव्यवहार" या ५०० शे पानांच्या मौल्य-वान ग्रंथाचा केलेला अनुवाद आम्ही प्रसिद्ध केला आहे. तसेच "स्त्री चळवळीची वाटचाल" या सहा लेखिकांनी लिहिलेल्या संकलनाचे कामही त्यांनी केले. सप्टेंबर १९६७ ते जुलै १९६८ या मॉस्कोतील वास्तव्याच्या काळात त्यांनी रशियन भाषेचाच अभ्यास केलेला असल्याने त्यांना त्या भाषेच्या बोलीभाषेचा अधिक परिचय होण्याची संधी मिळाली. परत आल्यावर त्यांनी भारत सोव्हिएट सांस्कृतिक संघातर्फे चालणाऱ्या रशियन भाषेच्या वर्गात १० वर्षे शिकवण्याचे कामही केलेले आहे. अशा तऱ्हेने बरीच वर्षे त्यांचा रशियन भाषेशी परिचय असल्याने त्यांनी सोव्हिएत साहित्याचा अनुवाद करून मराठी वाचकांना त्या साहित्याचा परिचय करून द्यावा अशी आमची इच्छा

होती. ती " सागराचा जन्म " या कादंबरीच्या रूपाने पूर्ण होत आहे. या पुढे असे आणखी अनुवाद त्यांनी आम्हास प्रकाशित करण्यास उपलब्ध करून द्यावेत अशी आमची इच्छा आहे.

वोल्गोग्राद ( पूर्वीचे स्टालिनग्राड ) ते आझोव समुद्र या विस्तृत प्रदेशावर पसरलेला प्रचंड प्रकल्प हा या कादंबरीचा विषय आहे. त्यात प्रकल्पांची नियोजनबद्ध उभारणी निरनिराळ्या प्रकल्पांमधील परस्परावलंबन, प्रकल्पाबरोबरच प्रकल्पग्रस्तांच्या वस्त्यांची उभारणी, प्रकल्पावरील शिस्त, टापटीप, बांधकाम कामगारांच्या स्वास्थ्याची निवासाची सुंदर योजना यांचे दर्शन आपणास या कादंबरीत घडते. तसेच नव्याने घडत असलेल्या सोव्हिएत नागरिकांचा आपल्या कामाकडे पाहण्याचा दृष्टिकोण, म्हाताऱ्यांपासून तरुणांपर्यंत अशा सर्व थरांतील सोव्हिएत नागरिकांचा प्रकल्पातील सहभाग, अधिकाऱ्यांची समाजाशी बांधिलकी, प्रकल्प वेळेआधी पूर्ण करून समाजास अर्पण करण्याची जिद्द या गोष्टीही या कादंबरीतील निरनिराळ्या पात्रांच्या व्यक्तिरेखांमधून व्यक्त होताना पाहायला मिळतील. थेट रशियन भाषेतून मराठीत केलेला अनुवाद हे या कादंबरीचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

श्रीमती शांता रानडे यांनी या कादंबरीचा मराठी अनुवाद करून दिल्यामुळे या सोव्हिएत साहित्यकृतीचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याची संधी आम्हास मिळाली त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत.

नेहमीच्याच आमच्या शिरस्त्याप्रमाणे याही पुस्तकाच्या छपाईचे काम आम्ही कल्पना प्रेसचे श्री. चिं. स. लाटकर यांचेकडे सोपविले होते. श्री. लाटकर आणि त्यांचे सहकारी यांनी ते उत्तम प्रकारे करून दिल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

आमच्या इतर प्रकाशनांप्रमाणेच आमच्या या नव्या पुस्तकानेही मराठी वाचक मनापासून स्वागत करतील असा आम्हास विश्वास वाटतो.

**कमल भागवत**

# अनुवादकाचे निवेदन

पानशेतचा भयंकर प्रलय, आणि कोयना धरणाच्या परिसरातील भयानक भूकंप या घटनांनंतर मातीची धरणे बांधावीत की नाही या प्रश्नावर बराच काळ उलटसुलट मते मांडली जात होती. तसेच धरणे पूर्ण होऊन त्याचा लाभ मिळू लागला तरीही प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन पूर्णार्थाने होतच नाही, या पार्श्वभूमीवर वोल्गोग्राद ते आझोव समुद्र एवढी व्याप्ती असलेल्या प्रकल्पावरील कॉन्स्टंटीन पाऊस्तोवस्की यांची मूळ रशियन भाषेतली " रज्दयेनिये मोर्या " ही कादंबरी माझ्या वाचनात आली. या दोन्ही प्रश्नांची योग्य उत्तरे या कादंबरीतून मिळत असल्याने या कादंबरीचा मराठी अनुवाद आपण करावा असे माझ्या मनाने घेतले. १९७५ साली रंगपंचमीच्या दिवशी अनुवादास सुरूवात होऊन दोन महिन्यात तो पूर्णही झाला. पण पुस्तक रूपाने प्रसिद्ध होण्यास मात्र जवळ जवळ १२ वर्षांचा काळ गेला. या कादंबरीच्या प्रकाशनास उशीर झाला असला तरीही त्यातील विषयाचे महत्त्व मुळीच कमी झालेले नाही. हस्तलिखिताचे कागद पिवळे पडल्याने प्रेस कॉपी करण्यासाठी मात्र पुन्हा वेळ घालवावा लागला.

डॉनवरील ४ किलोमीटर लांबीचे हे धरण मातीचेच आहे. फक्त मधल्या भागातील कॉंक्रीटच्या बांधकामाने दोन्ही बाजूंचे मातीचे बांध जोडण्यात आलेले आहेत. शेतीला पाणी, वीज निर्मिती आणि जलमार्ग या तीनही गरजा पूर्ण करणाऱ्या या प्रकल्पामुळे स्टेप प्रदेशाचा संपूर्ण कायापालट झालेला आहे. भाजून काढणारी उष्णता, धुळीची प्रचंड वादळे, भुतासारखा पिसाट वारा यांची माणसाने आपल्या कर्तृत्वाने स्टेपच्या रखरखीत भूमीवरून कायमची हकालपट्टी केली आहे. पारास्या आणि कोन्द्रात या स्टेपमधे उभे आयुष्य घालवलेल्या जोडप्याची कहाणी वाचताना राजस्थानातील एखाद्या जोडप्याचेच अनुभव आपण ऐकतो आहोत असे वाटते. या जोडप्याला डॉनसमुद्रात पाणी येऊ लागल्यावर झालेला आनंद पाहून मन तृप्त होते आणि मनात विचार येतो, आपल्याकडे कधी घडेल हे ? भविष्याकडे उत्सुकतेने, उत्साहाने जाणारी नवयुवती लेल्या, एक जबाबदार, जिद्दी, कुशल स्क्रेपर ड्रायव्हर क्लावा गुसेवा, क्रांतिपूर्व आणि क्रांतीनंतरचे जीवन अनुभवलेली धीरगंभीर हवामान तज्ज्ञ नतालिया पेत्रोवना गालागिन, मत्स्योत्पादनात प्रथम श्रेणीचे यश साध्य केलेली मारूस्या या व्यक्तिरेखांतून सोव्हिएत स्त्रीला मिळत असलेली संधी, उन्नतीसाठी आवश्यक मोकळे वातावरण यांचे दर्शन

घडते. प्रकल्प प्रमुख बासार्गिन, त्यांचे साहाय्यक झिमल्यानोय, सारायेव, स्तारोस्तिन यांच्या व्यक्तिचित्रणातून "प्रकल्पाच्या कामावरच्या प्रत्येक कामगाराची भोवतालची परिस्थिती आणि त्याची चांगली मनःस्थिती ही फार मोठी गोष्ट आहे." ही त्यांची धारणाच व्यक्त होताना दिसते. प्रकल्प प्रमुख बासार्गिन म्हणतात, "जे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आपण प्रयत्न करत आहोत त्या कामाकडे–समाजाची सुस्थिती निसर्गाच्या आणि मानवाच्या उत्पादक शक्तींचा पूर्ण विकास करण्याच्या कामाकडे, आपण पाहायला शिकलं पाहिजे! आपल्या या मूलभूत कामाची किंमत आपण कधीच कमी लेखता कामा नये! लोकांच्या मानसिक स्थितीशी संबंधित असं हे अतिशय महत्त्वाचं काम आहे. हे काम आमचं, पक्षाच्या लोकांचं आहे...आपण भविष्याच्या जास्त निकट उभे आहोत. भविष्यकाल अनेक गोष्टी करायला लावतो. तो नवा मानव घडवतो आहे–नवे स्वभाव, नवे गुण घडवतो आहे!" प्रत्येक प्रकल्प हा सोव्हिएट माणसाच्या जीवनाचा थर उंचावण्याशी निगडीत असल्याने तो उत्तम तऱ्हेने आणि जलद् गतीने पूर्ण होणे ही अशा अधिकाऱ्यांची, पक्षाच्या लोकांची बांधिलकी आहे ही मनोधारणाच या व्यक्तिरेखातून प्रातिनिधिक स्वरूपात व्यक्त होताना दिसते.

नव्याने जन्माला येणाऱ्या सागराच्या किनाऱ्यावरील लोकांना अनोळखी असणाऱ्या मासेमारीसारख्या व्यवसायाची तयारी करून देण्यासाठी नवा संसार मांडून देण्याच्या भावनेने नव्या सागरकिनाऱ्यावर जाणाऱ्या "समाजवादी म्हाताऱ्यांच्या" रूपाने प्रकल्पातील सामान्य माणसाच्या सहभागाचे आणि प्रकल्प आपला आहे या भावनेचेच दर्शन घडते. डॉनवरील सकशन ड्रेजर तरुणांकडे सोपवलेला होता. ड्रेजर प्रमुख तरुण मात्वेइचुक म्हणतो, "तेव्हा ओघानंच आलं की कामाचा उत्कृष्ट दर्जा सिद्ध करून दिला पाहिजे. कळलं? आव्हानाचं निशाण आपल्या केबिनमधे खडे आहे. ते तिथे ताठ मानेनं उभं आहे. बांधकाम संपेपर्यंत ते दुसऱ्या कुठल्याही विभागाकडे जाता कामा नये हे पण लक्षात ठेवायला हवं. कळलं?" तरुण लेन्या उत्तर देतो "कळलं!" स्वयंस्फूर्तीने नाविक पेशाचं काम तात्पुरतं सोडून या प्रकल्पावर आलेल्या मात्वेइचुकचे हे उद्‌गार सोव्हिएट युनियन मधील प्रत्येक प्रकल्पातल्या युवकांच्या उत्कृष्ट सहभागाचेच निदर्शक आहेत.

प्रत्येक प्रकल्प उभारताना परिसराचे हरितीकरण आणि त्याचे वास्तुशिल्पीय सौंदर्य या गोष्टींकडेही अजिबात दुर्लक्ष केले जात नसल्याने प्रत्येक प्रकल्प उपयुक्त आणि प्रेक्षणीय होतो.

या प्रकल्पाच्या पूर्ततेमुळे तहानेलेल्या स्टेप प्रदेशातल्या जमिनीला पाणी, मिळून स्टेपप्रदेशाचा संपूर्ण कायापालट झाला आहे. या सबंध कादंबरीत पाऊस्तोवस्की यांनी निसर्गाला आपल्या उन्नतीसाठी आपल्या आधीन करण्यासाठी चाललेला मानवाचा झगडा तसेच निसर्ग आणि मानव यांचे अतूट नाते अतिशय संवेदनक्षमतेने दाखवलेले

आहे. सोव्हिएट समाजाच्या उन्नतीसाठी झगडणाऱ्या माणसाच्या कर्तृत्वावर त्यांचा अपार विश्वास आहे.

पुष्किन, तुर्ग्येन्येव, टॉलस्टॉय, दोस्तोयेवस्की, मॅक्सिम गॉर्की यांच्या वाङ्मयाची ओळख मराठी वाचकांस आहे. त्यामानाने सोव्हिएट साहित्यकृतींचा परिचय मात्र बराच कमी आहे. शोलोखोव या जगप्रसिद्ध कादंबरीकाराचा परिचयही इंग्रजी जाणणाऱ्यांपुरताच मर्यादित आहे. त्यामुळे सोव्हिएट समाजात नव्याने घडणाऱ्या नव्या मानवाची ओळख आपणास अजून फारशी झालेली नाही. इतर प्रसार माध्यमांमुळे झालेली थोडी फार ओळख सोव्हिएट साहित्याच्या अनुवादाने आणखी वाढवावी या हेतूने केलेला हा अल्पसा प्रयत्न आहे.

बहुतेक रशियन साहित्यकृतींचे व काही थोड्या सोव्हिएट साहित्य कृतींचे मराठी अनुवाद हे इंग्रजी अनुवादावरूनच करण्यात आलेले आहेत. या प्रक्रियेत मूळ साहित्य कृतींच्या अस्सल गुणांचा कस कमी होण्याची शक्यता असते. मूळ रशियन भाषेतून थेट मराठीत त्यांचा अनुवाद होऊ लागल्यास अशा साहित्याचा आस्वाद घेण्याची संधी मराठी वाचकास मिळू शकेल. रशियन भाषा शिक्षणाच्या वाढत्या प्रसाराने या कामास आता गती येऊ लागेल. रशियन जाणणाऱ्यांची ती जबाबदारी आहे. या जबाबदारीतून मुक्त होण्याचा माझा हा अल्पसा प्रयत्न आहे. गॉर्की यांचे नाटक "तळ", चेखोव यांची दोन नाटके "वान्यामामा" आणि "समुद्रपक्षी", वेरा पानोवा यांची गाजलेली कादंबरी (जिच्यावर उत्कृष्ट चित्रपटही निघालेला आहे) "सिऱ्योजा" यांचेही अनुवाद मी पूर्ण केलेले आहेत. तेही यथावकाश प्रकाशित करण्याची माझी इच्छा आहे. इच्छा आणि तिची पूर्तता यात किती अंतर असेल ते आज काहीच सांगता येत नाही. पण त्या प्रकाशित करण्याचा मनापासून प्रयत्न मात्र मी निश्चितच सोडणार नाही एवढेच आश्वासन मी देऊ शकते.

दिवसेंदिवस वृद्धिंगत होत असलेली भारत सोव्हिएट मैत्री एकमेकांच्या संस्कृतीच्य परिचयाने दृढ होण्यास मदतच होते. दोन्ही देशांतील नागरिकांच्या परस्पर परिचयाने संस्कृतीची ओळख वाढते, तशीच ती उभयतांच्या साहित्य कृतींच्या परिचयानेही वाढण्यास चांगलाच हातभार लागतो. त्या कामास आपल्या परीने सेतुबंधनातील खारीप्रमाणे आपलेही वाळूचे कण टाकावेत या हेतूने या कादंबरीचा मराठी अनुवाद प्रकाशित केला आहे. मराठी वाचक अनुवादात असलेल्या उणिवांकडे दुर्लक्ष करून त्यातील आशय समजून घेतील असा विश्वास वाटतो.

प्रागतिक पुस्तक प्रकाशन, पुणे यांनी ही कादंबरी प्रसिद्ध केल्याबद्दल त्यांची मी अत्यंत ऋणी आहे.

**शांता रानडे**

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| नांदी | १ ते १८ |
| प्रकरण पहिले | १९ ते ३० |
| प्रकरण दुसरे | ३१ ते ४३ |
| प्रकरण तिसरे | ४४ ते ४९ |
| प्रकरण चवथे | ५० ते ५५ |
| प्रकरण पाचवे | ५६ ते ६८ |
| प्रकरण सहावे | ६९ ते ७४ |
| प्रकरण सातवे | ७५ ते ८३ |
| प्रकरण आठवे | ८४ ते ९५ |
| प्रकरण नववे | ९६ ते १०३ |
| प्रकरण दहावे | १०४ ते १११ |
| प्रकरण अकरावे | ११२ ते १२१ |
| प्रकरण बारावे | १२२ ते १२४ |
| प्रकरण तेरावे | १२५ ते १३१ |
| प्रकरण चौदावे | १३२ ते १३७ |
| प्रकरण पंधरावे | १३८ ते १४४ |
| प्रकरण सोळावे | १४५ ते १५० |
| प्रकरण सतरावे | १५१ ते १५६ |
| प्रकरण अठरावे | १५७ ते १६३ |
| प्रकरण एकोणिसावे | १६४ ते १७० |
| प्रकरण विसावे | १७१ ते १७६ |
| भरत वाक्य | १७६ ते १९० |

# नांदी

१९१६ सालच्या उन्हाळयात " झापरजेच " नावाचे जुने, निःशस्त्र केलेले लढाऊ जहाज तगानरोग बंदरात नांगरून पडलेले होते.

जहाजाच्या सगळया बाजू गंजाने भरून गेल्या होत्या. त्याचे लहान लहान पापुद्रे पाण्यात पडायचे आणि उन्हाने चमचमत तरंगत राहायचे.

हे मोडीत काढलेले " झापरजेच " जहाज ओसाड बंदरात पेंगळून उभे होते. जणू पुराणवस्तु प्रदर्शनात ठेवलेली वस्तूच ! गालागिन नावाचा उंचाडा खलाशी त्यावर पहारा करत असायचा. ते जुनेपुराणे जहाज हळूहळू कसे नष्ट होत जात आहे यावरच जणू तो थंडपणाने लक्षपूर्वक पहारा करत होता.

" झापरजेच " हे वाफेवर चालणाऱ्या अगदी पहिल्या काही रशियन जहाजांपैकी एक होते. शिडाच्या जहाजाच्या काही खुणा त्या जहाजावर अजूनही शिल्लक होत्या. डोलकाठ्यांवर दोरखंडे आणि ताणे अजूनही लोंबत होते. जगाच्या सफरींच्या वेळी तळातल्या खोल्यांमधून भरून राहिलेली निरनिराळया देशांमधील खारी हवा अजूनही तिथेच रेंगाळत आहे असे वाटत होते.

" झापरजेच " जहाजाच्या डेकवर बसून ज्या ज्या देशांचा प्रवास या जहाजाने केला असेल त्या देशांबद्दल कल्पना करायला मला बालपणी फार आवडायचे. काल-वांच्या चिकटलेल्या खवल्यांनी भरून गेलेल्या लोखंडी चाकाकडे पाहिल्यावर धुक्याने आच्छादलेल्या समुद्रात जहाजाचा तो फेसाळ मार्ग मला दिसू लागायचा. पण त्या मार्गावरून हे जहाज आता कधीच जाणार नव्हते. जहाजाच्या आड्याने रेखलेला

माग खूपवेळ दृष्टीपुढून हलायचा नाही. माझ्या ओळखीच्या एका खलाशाने मला सांगितले होते, की जहाजाच्या तेलाने समुद्राचे पाणी गढूळ होते. त्यामुळे जहाजाच्या मागच्या टोकाने रेखलेला मार्ग जास्त वेळ दिसत राहतो. त्याचा तो खुलासा त्यावेळी मला तितकासा पटला नव्हता. कारण एखादे चित्र जसे निसर्गतःच तयार होते, तसेच जहाजाच्या मागच्या टोकाने रेखलेल्या मार्गांच्या खुणा आपोआप निर्माण होतात हा माझा बालिश विचार त्यावेळी मला जास्त आवडायचा.

मी त्यावेळी तगानरोगमध्ये फिटरचा मदतनीस म्हणून तेलाच्या गिरणीत काम करत होतो. या गिरणीत सूर्यफुलाचे तेल काढले जायचे. समुद्र किनाऱ्यावरच्या एका टेकडीच्या पायथ्याशी ही गिरणी होती. जुनाट बाभळींच्या हिरव्या झाडीने वेढलेला आणि माखुकाच्या उबदार वासाने भरून राहिलेला असायचा तो भाग !

गिरणीच्या अंगणातून एक उभाच्या उभा लाकडी जिना वरच्या एका खाजगी मालकीच्या घरात गेलेला होता. आत्याच्या पूर्णपणे आधीन असलेला त्या गिरणीचा लक्षाधीश मालक वाक्सोव त्या घरात राहायचा.

तांबूससर दाढी असलेला गोल गरगरीत तरुण होता तो एक ! अशा व्यक्तींना "सूटबूटवाले" म्हणायची प्रथा होती तेव्हा ! त्याची आत्या त्याला नेहमी ढगळ ढगळ सूट शिवायची. त्या सैल सैल कपड्यांमुळे तो अधिकच आडव्या अंगाचा वाटायचा.

त्याची म्हतारी आत्या सदोदित लेकुरवाळ्या कोंबडीसारखी त्याच्यावर कलकलत असायची. स्वतःबरोबर वाक्सोवलाही या चर्चमधून त्या चर्चमधे फरफटत फिरवायची आणि शहराच्या बेसेर्गेनोवृका भागातल्या एखाद्या शाळकरी उपवर मुलीने आपल्या भाच्याकडे निरखून पाहू नये म्हणून डोळ्यात तेल घालून खबरदारी घ्यायची.

वाक्सोव आणि मी एकाच वेळी पब्लिक स्कूलमध्ये शिकत होतो हे जेव्हा वाक्सोवला समजले तेव्हा आपल्या समाजातल्या प्रतिष्ठेचा विसर पडून त्याने चक्क मला संध्याकाळच्या जेवणाचे आमंत्रणच दिले ! बंडखोर विचारवंत व्हावे, कलाशौकिन बनावे असे वाक्सोवला फार वाटायचे. श्रीमंत व्यापारी वर्तुळात त्यावेळी ती एक फॅशनच होती.

वाक्सोवच्या घरासारखे उदासवाणे घर मी आयुष्यात पाहिलेले नाही घरच्या यजमानाने मला सर्व खोल्या स्वतः फिरून दाखवल्या. भिंतींना फिकट जांभळा इरिस फुलांच्या डिझाईनचा वॉल पेपर लावलेला होता. व्हेनिशियन खुर्च्या भीतीने एकमेकींना बिलगल्यासारख्या भिंतीला लागून ओळीने उभ्या होत्या. प्रत्येक खोलीच्या मध्यभागी विणलेल्या रुमालाने झाकलेले अंडाकृती टेबल नजरेत भरत होते. रानबदके, ससे यांची जलरंगातली चित्रे असलेल्या जिप्समच्या तसबिरी सगळीकडे टांगल्या होत्या.

काचेची तावदाने असलेल्या व्हरांड्यात पक्ष्यांचे रिकामे लोखंडी पिंजरे झुलत होते.

" यातले पक्षी कुठे गेले ? " मी वाक्सोवला विचारले.

" देवदयेने ते मेले बिचारे. " त्याने हसत हसत उत्तर दिले आणि एका पिंजऱ्यला झोका दिला. पिंजरा करकरला.

" सगळे उचलून खरे तर केरात फेकून द्यायला हवे. पण वडलांची आठवण म्हणून जपून ठेवलंय सारं. माझ्या मृत वडिलांना पक्षांचा आणि दुर्मिळ वस्तू जम-वण्याचा फार शौक होता. कदाचित तुमचा विश्वास बसणार नाही पण त्यांच्या तबेल्यात आफ्रिकेतला झेब्रा आणि पक्ष्यांच्या खुराड्यात पेलिकन पाळलेला होता. जुन्या व्यापारी वर्गात असे छंद होते. आत्ताच्या व्यापारी वर्गासारखा नव्हता तो वर्ग त्यावेळी. त्रेति-याकोव, साव्वा मरोझोव, मामेंतोव यांची उदाहरणे आहेतच की आपल्यापुढे ! कशालातरी वाहून घेतलेली, त्यागी, कृतिशील माणसे होती ती ! भरभराटीत असलेल्या व्यापारी मंडळींनी त्यांच्याच मार्गाने जायला हवे खरे म्हणजे. पण आपल्या या तगानरोगमधे करण्यासारखेच्च काही नाही. इवलेसे टिचभर गाव आपले ! पाला-पाचोळ्यासारखे निरर्थक जिणे आहे इथले !

" पण तुम्ही प्रयत्न केलाय का काही करण्याचा ? "

" केला ना. चित्रे विकत घ्यायला सुरुवात केली होती मी—डेकाडेन पद्धतीची. वाक्सोवच्या नावे कलादालन उघडायचे स्वप्न होते माझे ! सध्या या डेकाडेन पद्धतीच्या चित्रात कुणाला काही कळत नाही. पण कुणी सांगावे ? दहा वीस वर्षांत या चित्रांनाच भाव येईल कदाचित्.

' मला आवडली असती ती चित्रे पहायला. . ."

पण वाक्सोवने हात उडवत म्हटले, " पण आता आहेतच कुठे ती ? माझ्या गैरहजेरीत आमच्या आत्याबाईंनी सगळी जाळून टाकली ती ! म्हणतात कशा " उधळ्या कुठला ! " पालक आहेत ना त्या माझ्या ? म्हणून सारखा धाक दाखवत असतात. एखाद्याला पालक असणे—त्यातूनही माझ्यासारख्या संप्रवृत्त व्यक्तीला पालक असणे—आणि तेही आत्ताच्या काळात ? शीः ! पण मला त्यांच्याबरोबर मिळते घेणे भागच आहे माझी सगळी शेंडी त्यांच्या हातात आहे ! डबोलं जमा करताहेत ना त्या ! तुम्हाला सुद्धा पटेल माझी अवस्था अगदी असह्य आहे. एक पाऊल काही इकडेच्च तिकडे करता येत नाही तुम्हाला खरं वाटणार नाही, पण मी अजून पॅरिस काही पाहिलेले नाही. पॅरिसबद्दल अत्याबाईंच्या समोर ब्रसुद्धा काढायची सोय नाही. त्या म्हणतात, " उधळं शहर आहे ते. " मी पॅरिसला गेलो असतो. तर तिथे पाऊल टाकल्याबरोबर उदारपणाबद्दल सगळ्या जगभर माझे नाव गाजले असते. मला पैशाची काही किंमत नाही वाटत. २० हजार—फ्रेंच अॅकॅडमीला

२० हजार—पॅरिसमधल्या ऑपेराला! २० हजार—प्रजासत्ताकाच्या अध्यक्षांच्या मदत निधीला! अशा देणग्या दिल्या असत्या मी! वर्तमानपत्रातून मुलाखती छापून आल्या असत्या. लीना कोवाल्येवा आणि सारा बेनीसारख्या सौंदर्यवती...

" बेटा पावेल," दारामागून म्हातारीच्या बसकट आवाजातील शब्द ऐकू आले. " पाहुण्यांना घेऊन जेवायला ये. बोलण्यातच गढून गेलाय नुसता!"

वाक्सोव माझ्या बाजूला मान वळवून पुटपुटला " विश्वास बसणार नाही तुमचा माझ्यावर. पण सारखी मांजरासारखी माझ्या वासावर असते. इथल्या एका विधवा चांभारणीकडून अगदी आवाज न करणाऱ्या, दुहेरी फेल्टचे तळवे असलेल्या, स्पेशल सपाता बनवून घेते थेरडी! मी नुसता कैदी आहे! जगातला सर्वांत दुर्दैवी प्राणी आहे मी!"

वाक्सोवने रागारागाने पुन्हा एकदा रिकाम्या पिंजऱ्याला झोका दिला. पिंजरा झुलू लागला, करकरू लागला. त्याचवेळी शेजारच्या खोलीतून घाईघाईने निघून जाणाऱ्या पावलांचा आवाज ऐकू आला.

"पळाली पहा!" वाक्सोवने खुणावले. "खालीवर जीव होतोय नुसता म्हातारीचा! कितीक युगांनी पांढरपेशा, बुद्धिजीवी माणूस पाहुणा म्हणून आलाय या घरी. कोत्या बुद्धीची आहे अगदी."

आणि दार उघडून आपल्या आताच्या बोलण्याशी अगदी विसंगत असे हसत तो गोड आवाजात म्हणाला,

" अगदी खरं खरं विचारतो आत्याबाई तुम्हाला, जितक्या गडगंज श्रीमंत व्हाल तितक्या सुखी व्हाल ना तुम्ही आत्याबाई?"

म्हातारी जेवायला टेबलावर काही आली नाही, पण ती दाराआडून बोलणे ऐकत असावी असे वाक्सोवच्या चुळबुळीवरून वाटले. एक सुस्त, मोठ्या मिश्यांचा माणूस जेवण वाढत होता.

जेवण अगदीच सुमार होते. पण मला ते श्रीमंतीच वाटले. कारण टोमॅटो, काळी ब्रेड आणि क्वास एवढेच माझे रोजचे जेवण असे.

आमच्याकडले क्वास फार सुंदर असायचे. असे पेय फक्त दक्षिणेच्या लोकांनाच बनवता येते. बाहेरून दव जमलेले या पेयाचे ग्लास जस्ताच्या पत्र्याच्या कौंटरवर किणकिणत असायचे. आणि त्यातले तुषार भोवताली उडत असायचे. त्यावर पडलेल्या सूर्यकिरणांमुळे त्यातून लहानगी इंद्रधनुष्ये थरथरायची. खरंखुरं इंद्रधनुष्य तगानरोगमधे जवळ जवळ किनाऱ्याला वळसा घालून बाजूनेच निघून जायचे.



गिरणीत कामाला असल्यामुळे मला फक्त रविवारीच "झापरजेच" जहाजावर

जायला जमायचे. त्या जहाजाच्या टोकावरून मी खेकडे पकडत असे किंवा डेकवर पडून वाचत असे.

मी मुख्यतः कविताच वाचत असे. आणि त्यातल्याही आनंददायक कविताच जास्त करून वाचत असे.

सूर्याचा सुवर्ण गोल,
निळ्या निळ्या वाळवंटातून उगवलेला,
संथपणे बुडतो आहे,
हलक्या हलक्या तेजाळ लाटांत !

यासारख्या ओळी माझ्या मनात आनंद लहरी निर्माण करायच्या.

चेखोवने स्थापन केलेल्या गावच्या ग्रंथालयातून मी पुस्तके आणत असे. उतारवयाकडे झुकलेली, गळ्याभोवती नेहमी काळ्या मखमलीचा स्कार्फ गुंडाळणारी ग्रंथपालिका कधी कधी मोठ्या श्रद्धेने मला पुस्तकांवरच्या चेखोवच्या सह्या दाखवायची. चेखोवचे देखणे हस्ताक्षर पाहून मी अगदी स्तिमित होऊन जायचो. चेकोवच्या लिखाणावर तगानरोगचा कुठलाच ठसा कसा उमटला नाही याचे मला फार आश्चर्य वाटायचे. विरळ बाभळी, फिकट निळा समुद्र, समुद्रकाठचे विशिष्ट वादळी वारे किंवा पडलेले वारे, अझोवबोली यापैकी कुठल्याच गोष्टींचा उल्लेख चेखोवच्या वाङ्मयात कसा आढळत नाही ?

माझ्याप्रमाणेच दर रविवारी मासेमारीचे शोकीन असलेले भूगोलाचे निवृत्त शिक्षक त्या जहाजावर यायचे. त्यांचे नाव लिपेत्सकीय. बंदरातल्या मुलांनी त्यांना एक मोठे गमतीदार पण अगदी योग्य टोपण नाव ठेवले होते—" शेवाळे " ! लिपेत्सकीय यांच्या अंगावरच्या टोपी, जाकीट, पँट या सगळ्याच कपड्यांना जुनेपणामुळे एक प्रकारचा हिरवट शेवाळी रंग चढला होता. आणि असे वाटायचे की उदार वृत्तीच्या या शिक्षणतज्ज्ञाचे सारे आयुष्यच डबक्यासारखे साचून त्यावर शेवाळे चढले आहे. लिपेत्सकीयना सभोवारच्या स्टेप प्रदेशाची, अझोव समुद्राची खरोखरच चांगली माहिती होती. ते त्या प्रदेशाचे उत्तम जाणकार होते.

ग्रीक स्ट्रीटवर त्यांनी एक लहानशी खोली भाड्याने घेतली होती. ज्या घरात ते राहायचे त्या घरात एकेकाळी ज्युझेपे व गॅरिबॉल्डी हे क्रांतिकारक रहायचे असा त्यांचा समज होता. त्या खोलीत जे काही तुटपुंजे सामान होते त्यात जास्त करून अंधुक झालेले पिवळसर पडलेले फोटो आणि नकाशेच जास्त होते. पण सर्वांत कुतूहलजनक वस्तू होती ती अंगणात होती—एक करड्या रंगाचा ग्रॅनाईटचा सिथियन बाईचा पुतळा ! लिपेत्सकीयनी तरुणपणीच तो स्टेप प्रदेशातून आणला होता. हजारो वर्षांच्या वाऱ्याच्या माऱ्याने त्या खरखरीत दगडाला पॉलिश झाले होते. आणि त्यामुळे त्या सिथियन बाईचा उथळ चेहरा तेल लावून तुळतुळीत केल्यासारखा चमकायचा.

आजवर जिथे मला काहीच चांगले आढळले नव्हते, अशा या सभोवतालच्या प्रदेशाबद्दलच्या लिपेत्सकीय यांच्या गोष्टी ऐकून, त्या वृद्धाच्या त्या प्रदेशाबाबतच्या अफाट ज्ञानाने आणि आपल्या भागावरच्या आणि तगानरोगभोवतीच्या गवताळ प्रदेशावरच्या त्यांच्या प्रेमाने मी चकीत होऊन गेलो; क्षाराचा घाणेरडा थर चढलेली उदासवाणी जमीन, धुळीने भरलेले वारे, आटलेल्या गढूळ नद्या एवढेच ज्ञान मला त्या गवताळ प्रदेशाबद्दल होते.

पावसाची टपटप, बैलगाड्यांच्या चाकांनी चाकोऱ्या पडलेले रस्ते, नदीवरचे धुके गव्हाच्या शेतांवर उठणाऱ्या लहरी, नाकतोड्यांची तडतड या गोष्टी मला फार आवडायच्या. म्हणून हे काहीच नसलेला अझोव समुद्र किनाऱ्यावरचा एकसुरी भाग मला मृतप्राय भूभागासारखा वाटायचा.

पण लिपेत्सकीयच्या गोष्टी ऐकल्यानंतर मात्र हा आग्नेय भाग जणू माझ्यापुढे सजीव होऊन उभा राहिला. इथली भूमी दंतकथांनी भरलेली आहे: सरमाती, स्किफी, पलोवत्सी, हजारी, गुन्नी, तातार, तुर्क यासारख्या हजारो जमातींनी हा प्रदेश तुडवलेला आहे. मुळांच्या जंजाळात जमिनीत दडलेले, काळवंडलेले मृत देहांचे सांगाडे, मोडके भाले, वेडी वाकडी झालेली शिरस्त्राणे, बियांची फोलकटे, सिथियन नाणी यांनी भरलेल्या मातीच्या सुरया अशा प्राचीन जमातींच्या अनेक खुणा मऊ गवताखाली, मातीच्या टेकाडांखाली दडलेल्या आहेत.

" आताची डॉन नदी ही पूर्वीची तानाईस नदी व अझोव समुद्र ही पूर्वीची तामारिंदा नदी होती ! " लिपेत्सकीय म्हणाले आणि जाड भिंगांच्या चष्म्यातून माझ्याकडे पाहू लागले.

या भागाच्या गतेतिहासाबद्दल लिपेत्सकींनी मला खूप गोष्टी सांगितल्या. ते ठासून सांगत, की इथेच आपल्या पूर्वजाने " इगोरच्या लढाईचे गीत " हा पहिला पोवाडा रचला.

कझाकांच्या " दूम्की " या काव्यप्रकारात वर्णन केल्याप्रमाणे डॉनच्या किनाऱ्यावर आणि डॉनच्या पलिकडच्या प्रदेशात

" वांझोटं बी पसरलं आहे शेतात
कझाकांची शिरं विखुरली आहेत या मातीत
जमीन सारी आहे झाकोळलेली
कझाकांच्या केसांच्या काळ्याकुरळांनी !

लिपेत्सकीयना आपल्या कापऱ्या आवाजात " दूम्की " म्हणायला फार आवडायचे. तातारनिकच्या झुडुपांबद्दल या स्टेप प्रदेशात एक गोष्ट सांगितली जाते. वसंतऋतूत स्टेप प्रदेश तातारनिकच्या गडद जांभळ्या फुलांनी भरून जातो. ही फुले रक्ताच्या थेंबांसारखी दिसतात. त्या फुलांकडे पाहून म्हाताऱ्या माणसांना भूतकाळाचे

स्मरण होई आणि ती मुलांना रात्रीच्या वेळी गोष्टी सांगत. ते सांगत, जिथे जिथे कझाकांच्या रक्ताचे थेंब सांडले तिथे तातार्निकची झुडपे उगवतात आणि ती फुलांनी भरून जातात.

"हंऽऽ. फार पुरातन गोष्टी या! बासुरमानांबरोबरच्या लढाया, कझाकांची काळया कुरळया केसांची झुलपे असलेली शिरे आणि ते भीषण रणकंदन!"

त्या काळापासूनच टॅमोरिंड या घोड्यांच्या टापांसारखी लय असलेल्या वाद्यांच्या साथीवर गायली जाणारी गाणी जन्माला आली.

त्या वृद्ध शिक्षकाला राझीन, पुगाचोव, बुलाविन यांच्या उठावांबद्दल, भुकेकंगाल लोकांच्या बंडांबद्दल गोष्टी सांगायला फार आवडायचे. इथेच, या डॉनच्या पलीकडेच रशियातल्या भटक्या जमातींनी जोमाने उठाव केले. तुरेचिना, आझोव, कॉकेशस लढवण्यासाठी "भटक्या जमाती" इथे एकत्र झाल्या. तुर्की सुलतान तक्रार करायचा की हे "रशियन भटके" आम्हाला डॉनचे पाणीसुद्धा पोटभर पिण्याएवढी उसंत देत नाहीत."

त्यानंतर पीटरच्या समुद्रावरच्या पहिल्या सफरी सुरू झाल्या. वरोनेजमधल्या मातकट रंगाच्या ओकच्या लाकडाच्या ओबडधोबड बोटींमधून या सफरी व्हायच्या. त्यानंतर अझोव समुद्राचा वेढा सुरू झाला. पिवळ्या मातीच्या भूशीरांवर किल्ले बांधले गेले.

लिपेत्सकीय म्हणायचे, "रशियन माणसाने या डॉन प्रदेशात आणि स्टेप प्रदेशात इतके रक्त सांडले आहे, की तो त्याग कधीच वाया जाणार नाही.

एकादी फार मोठी शौर्यशाली आणि आश्चर्यकारक घटना या भागात घडणार आहे असे भाकित इतक्या आधी करणे लिपेत्सकींना अर्थातच अशक्य होते. पण अशा घटनेचा साक्षीदार आणि साथीदार व्हायचे भाग्य मात्र मला मिळाले. पण ते अर्थातच लिपेत्सकीय यांच्या मृत्यूनंतर कितीतरी वर्षांनी!

हा भूगोलप्रेमी वृद्ध शिक्षक मेंडेलेयेवही आवडीने वाचायचा. देशातला एक थोर शास्त्रज्ञ म्हणून मेंडेलेयेवपुढे रशियाची भरभराट ज्यावर अवलंबून आहे असे खूपच प्रश्न होते. पण लिपेत्सकीयना फक्त आपल्या प्रिय आझोव समुद्राच्या आणि तगानरोगच्या भवितव्याची काळजी लागून राहिली होती.

आझोव समुद्र डोळ्यांदेखत मृतप्राय होत होता. तो उथळ बनत चालला होता. तगानरोगच्या बंदरात मोठी जहाजे येणे कधीपासूनच बंद झाले होते. ती समुद्रात लांब नांगरली जायची.

समुद्राबरोबरच गावही मरू घातले होते. लिपेत्सकीयना ते पूर्वीचे दिवस आठवत होते. तगानरोमधून डॉन प्रदेशातल्या गव्हाच्या राशी कोठारात पडायच्या. कबुतरांचे थवे दगडी रस्त्यांवर बसायचे आणि सांडलेल्या दाण्यांवर यथेच्छ चरायचे. लोखंडी

धावांच्या चाकांचा खडखडाट दिवसरात्रीही चालूच राहायचा. असे वाटायचे की ढगच सौम्य गडगडाट करत तगानरोगवरून जात आहेत. धक्क्यावर पडलेल्या गव्हाच्या राशींमुळे सबंध वातावरणालाच एक प्रकारची मेणासारखी तुकतुकीत चमक यायची. जहाजांना माल भरून घेण्यासाठी दिवस दिवस तिष्ठत राहायला लागायचे.

तगानरोगच्या पुनरूत्थानाचा विचार या वृद्ध शिक्षकालाच प्रथम सुचला ही गोष्ट खरीच आहे. वर्षांमागून वर्षे जात होती. आणि अझोव समुद्र जितका जास्त जास्त उथळ होत होता, तितका अधिक ठामपणाने तो विचार लिपेत्सकीयवर कबजा करत होता. तसे पाहिले तर. तो नुसता एक विचारच होता. कारण लिपेत्सकीयच्या बोलण्याकडे कुणीच लक्ष देत नव्हते. गावातल्या एखाद्या चमत्कारिक विचित्र प्रेक्षणीय ठिकाणाकडे पहावे, तसं लोक लिपेत्सकीय गुरुजींच्याकडे पहात. त्याकाळी प्रत्येक मोठ्या गावात अशी काही "वेडी" आणि "विक्षिप्त" माणसे हमखास आढळायची.

आज देशाचा सबंध आग्नेय भाग एका प्रचंड बांधकामाच्या कोलाहलात गजबजून गेलेला असताना मला लिपेत्सकीय गुरुजींची आणि त्यांच्या तगानरोगच्या पुनरुत्थानाच्या त्यावेळी अर्थहीन वाटणाऱ्या योजनेची तीव्रतेने आठवण होते आहे. त्यांची आठवण आली आणि मनात विचार आला, क्रांतीने माणसांचे जीवन किती समूळ बदलून टाकले आहे! त्याच्या विचार करण्याच्या शक्तीतही तिने पार बदल घडवला आहे! त्याच्या विचारांची गती काळाच्या गतीच्या पातळीइतकी उंचावली आहे.

ज्या गोष्टी आमच्या वाडवडिलांना स्वप्नवत् वाटत होत्या त्या आमच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्षात उतरताना आम्ही पाहातोय. पूर्वी काल्पनिक वाटणाऱ्या गोष्टी आज रोजच्या सवयीच्या झाल्या आहेत.

पण लिपेत्सकीय गुरुजींची स्वप्ने ही रशियाच्या मागासलेल्या आणि अडचणीच्या कालखंडात जन्माला आलेली होती. मग ती मूर्त रूप कशी घेणार?



तगानरोगच्या पुनरुत्थानाची आपली योजना लिपेत्सकीय गुरुजींनी प्रथम मला व गालागिनला "झापरजेच"च्या डेकवर बोलत बसलो असताना सांगितली संध्याकाळची वेळ होती तीं. गावाच्या जवळच "तुवोर" नावाची बोट गाळात रुतली होती. "तुवोर"वरचा माल उतरवून ते रिकामे करायचे होते व मग त्याला गाळातून बाहेर ओढून काढायचे होते. त्यासाठी बंदरातली टगबोट रिकाम्या मच्छीमार होड्या घेऊन तुवोरकडे निघाली होती.

साऱ्या स्टेप प्रदेशावर निळसर झाक पसरली होती. अजून बराच उजेड होता तरी दीपगृहातला लाल दिवा लागला होता.

आझोव समुद्रावर जो कुणी कधी गेलाच नाही त्याला तिथल्या सायंकालीन शोभेची

कल्पनाच करता येणार नाही. फिकट निळसर पाणी, मोत्याच्या शिंपल्याच्या गाभ्यासारखा सुरेख गुलाबी रंग घेतलेल्या विस्तीर्ण आकाशातली प्रचंड आकारांच्या ढगांची गर्दी, समुद्राच्या खोल आरशात मंद जळणाऱ्या ठिणग्यांप्रमाणे भासणारी आपली प्रतिबिंबे निरखणाऱ्या पहिल्या तारका! सारंच सुंदर!

बरन्योवच्या उतरत्या बांधावर फटीत घट्ट पाय रोवून बसलेले धुळीने माखलेले पिवळ्या द्रोक फुलांचे झुडून डोलत होते. आश्चर्याची गोष्ट अशी की डॉन नदीच्या मिळणाऱ्या विपुल पाण्याने तगानरोगच्या समुद्रातले पाणी गोड असते. पण तरीही दिवसभर फुटणाऱ्या लाटांनी तयार झालेल्या किनाऱ्यावरच्या डबक्यांतल्या पाण्याला मात्र समुद्राचाच वास येतो. त्या संध्याकाळी बिलियर्डच्या चेंडूची टकटक आणि मेंडोलिनचे तरल सूर किनाऱ्यावरून वाहात येऊन झापरजेचच्या डेकवर आमच्या कानावर पडत होते. मडक्यात निखारे घालून आम्ही पकडलेले मासे गालागिन भाजत होता.

" एके काळी आमचं हे बंदरसुद्धा इतर चांगल्या बंदरांसारखंच गजबजलेलं होतं. आणि आता किनाऱ्यावर वाढताहेत नुसती झुडपं. " गालागिन भडकून म्हणाला.

" मोठ्या आजाराची सुरुवात नेहमी किरकोळ भासणाऱ्या दुखण्यातूनच होते. " लिपेत्सकीय गुरुजी म्हणाले. " हेच पहाना, ही तुबोर बोट इथे गाळात रुतली आहे. गेल्या काही वर्षांत आझोवचा समुद्र इतक्या वेगाने उथळ का होत गेलाय याचे कारण शोधायला हवे. कारण उघड आहे. डॉन मधून पूर्वीपेक्षा जास्त गाळ वाहात येतो आहे. "

" फुकट चाललीय सारी जमीन!" गालागिन उसासत म्हणाला. "समजा, रोही मासा तुमच्या हाती लागला तर तो दोन्ही हातानी नुसताच धरून बसणं मूर्खपणाचं आहे. त्याला ओढून पाण्याबाहेर काढलंत तरीसुद्धा तो शेपटीचा तडाखा मारून डोळे मिचकावत पळून जाईल. मग बसा हात चोळत. "

" काय बडबडतो आहेस रे ?" लिपेत्सकीय गुरुजी म्हणाले, " त्याच्याबद्दल नाहीरे मी बोलत. तुम्ही नीट ऐकून घ्या, समजून घ्यायचा प्रयत्न करा. एके काळी डॉनच्या काठी वर्षानुवर्षांचे जुने ओक वृक्ष उभे होते. डॉनकाठची घनदाट जंगले नावाजलेली होती. ती सगळी जंगले तोडून टाकली लोकांनी. त्यामुळे आता प्रत्येक मोठा पाऊस जमिनीवरची सगळी माती धुऊन काढतो आणि डॉनमधे टाकतो. डॉन ती सगळी माती आझोव समुद्रात आणून पसरते. प्रचंड गाळ साचवते. " लिपेत्सकीय क्षणभर स्तब्ध झाले. " सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे! " ते पुन्हा म्हणाले आणि हातवारे करत बोलू लागले. " आणखी शंभर वर्षांनी तगानरोग बंदराचे रूपांतर निव्वळ दलदलीत होईल. "

" नवलच आहे!" हातातल्या सुरीने फुसफुसणारा मासा उलटत गालागिन म्हणाला. "जुने खलाशी वर्णन करून सांगतात अशा मृत गावांबद्दल. जणू काही अशी

गावं त्यांना जगाच्या पाठीवर भेटलेलीच आहेत. अशा या गावांजवळ पूर्वी समुद्र होता. आणि आता तो नाहीसा झाला. समुद्र मागे हटत गेला आणि पुळणीवर येऊन पडलेल्या माशांसारखी ती गावं मात्र तिथंच पडून राहिली. झोपी गेली—माशांसारखी. आणि शेकडो वर्षं लोटली तरी अजून ती गावं झोपलेलीच आहेत. काही कळतच नाही आपल्याला. जुने खलाशी थापा मारतात की खरंच सांगतात! आम्हा जमिनीवर राहाणाऱ्या लोकांची टिंगल करायला मुरब्बी खलाशांना नेहमीच आवडतं हे तुम्हाला सुद्धा माहीतच आहे. आणि त्यांनी काहीबाही सांगायला सुरुवात केली की आमचं डोकं चक्रावूनच जातं."

"अगदी बरोबर आहे त्यांचे!" लिपेत्सकीय म्हणाले. "आहेतच तसली गावे. आणि लवकरच त्या समुद्र हरवून बसलेल्या गावांसारखेच आपले तगानरोगही होईल. यावर अगदी साधा उपाय आहे. तगानरोगपासून उथळ्या समुद्रापर्यंत बोटी जाऊ शकतील एवढा खोल कालवा खणायचा आणि नंतर तो कालवा थेट रोस्तोवपर्यंत न्यायचा. तावडतोब हा आपला भाग जागा होईल."

"कुणी या कामाला हात लावणार नाही गुरुजी!" गालागिन तक्रारीच्या सुरात म्हणाला. "तुम्हाला साधनं कोण पुरवणार? झारला आपल्या या तगानरोगबद्दल काहीच वाटत नाही. डॉन काठच्या कझाकसैनिकांना केसाला भरपूर तेल पुरवलं आणि त्यांचे बूट कडक राहिले की बस्स!"

"या नुसत्या कल्पनेतल्या वावड्या आहेत असंच लोक म्हणणार हे मलासुद्धा माहीत आहे." उदासपणे लिपेत्सकीय गुरुजींनी त्याच्या म्हणण्याला दुजोरा दिला.

गालागिन माझ्याकडे वळून म्हणाला, "पेत्रो नावाचा माझा एक भाऊ आहे. विधूर आहे. पेत्रुशिन भूशिरावर तो मासेमारीचा धंदा करतो. नताल्का नावाची एक मुलगी आहे त्याला. आठ वर्षांची आहे. तिच्या एकटीचा फक्त लिपेत्सकीय गुरुजींवर पूर्ण विश्वास आहे. माझी शपत आहे तुम्हाला लिपेत्सकीय गुरुजी! असल्या पोकळ विचारांनी डोकं फिरवून घेण्यापेक्षा तुम्ही आपला हा मासा खा आरामात! म्हातारं माणूस तुम्ही, त्यातून निवृत्त झालेले! पोटापुरतं पेन्शन मिळतंय, आणखी काय पाहिजे?"

"मला नको आहे रे काही. लोकांसाठी हवं आहे!" जरा रागीटपणानेच लिपेत्सकीयनी उत्तर दिले." या कालव्याबद्दल ड्यूमाला लिहिले आहे मी. दोनदा लिहिले आहे. या कामासाठी एकादी जॉईंट स्टॉक कंपनी निर्माण करायला सुचवले आहे मी. पण एक अक्षरसुद्धा उत्तर नाही त्याबद्दल. एका वर्तमानपत्राला लेख पाठवला होता याबद्दल. पण असे खवचट उत्तर पाठवले आहे त्यांनी की त्याची आठवण झाली तरी शरम वाटते. "ग्रंचच्या विस्तवाने सबंध उत्तर ध्रुवाला उब पुरवण्याची किंवा वर मुळे खाली फांद्या अशी झाडे असलेल्या जंगलांची योजना तुम्ही फारच यशस्वी-

पणांने आखू शकला असतात. असल्या योजना मांडण्यापेक्षा प्लायवूडची टेबले तयार करण्याचा उद्योग करा तुम्ही!"

"असल्या चावऱ्या कुत्र्यासारख्या माणसाला चांगले चाळीस फटके मारून वर मिठाचं पाणी ओतलं असतं मी. म्हणजे त्याला अद्दल घडली असती म्हाताऱ्या माणसाची चेष्टा केल्यानं काय होतं त्याची" गालागिन त्वेषाने म्हणाला.



उन्हाळ्याच्या मध्याला मी वाक्सोवकडून रजा घेतली आणि पेत्रोकडे, गालागिनच्या भावाकडे पेत्रुशिन भुशिरावर राहायला गेलो.

लहानशा कौलारू झोपडीत पेत्रो राहायचा. भिंतींना कुबट वास यायचा. पडक्या भागाच्या ढिगाऱ्यावर गवताची बेटे वाढली होती. कोळी त्याच्या केरसुण्या बनवत. हवा जेव्हा स्वच्छ असायची तेव्हा लाटा त्याच्या उंबरठ्याला भिडायच्या. तडफडणारे मासे मागे ठेऊन लाटा ओसरायच्या

लहानशा बागेत पिवळा हॉलिहॉक फुलला होता. दोऱ्यांवर जाळी वाळत होती. समुद्रावरची उबदार मंद झुळूक सुखवीत होती.

"झापरजेच" जहाजाच्या डेकवरचे लिपेत्सकीय गुरुजींबरोबरचे संभाषण मी जवळ जवळ विसरूनही गेलो होतो. अर्थातच काही ठसे मागे ठेवल्याशिवाय ते संभाषण स्मरणातून जाणेच शक्य नव्हते. त्या संभाषणाने स्टेप प्रदेशाचा—विशेषतः आझोवच्या खालच्या भागाचा—अभ्यास करायची इच्छा माझ्या मनात उत्पन्न केली होती. सभोवतालच्या प्रत्येक गोष्टीकडे मी अगदी बारकाईने लक्षपूर्वक पाहू लागलो. आणि त्यातून नेहमी घडते तसेच घडले. त्या निरीक्षणाने माझ्या मनात त्या भागाबद्दल प्रेम निर्माण झाले. आझोव समुद्रा जवळच्या या प्रदेशाची ओळख करून घ्यायला त्यावरची कोणतीच पुस्तके माझ्या हाताशी नव्हती. मी फक्त त्या स्टेप प्रदेशात राहिलो, आझोवच्या किनाऱ्यावर राहिलो, निरीक्षण केले, लक्षपूर्वक ऐकत होतो आणि डोक्यात साठवत होतो. आणि लवकरच स्टेपप्रदेशातल्या आणि आझोव समुद्रावरच्या त्या भव्य शांततेने माझ्यावर चांगलाच कबजा केला. त्या भागाबद्दल मला प्रेम वाटू लागले. या प्रदेशाच्या बदल्यात उत्तरेकडची कुठचीही जंगले आंदण द्यायला मी तयार झालो.

सभोवतालच्या सर्वच गोष्टींनी माझ्या मनात त्या ठिकाणाबद्दल जवळीक निर्माण केली. हे ठिकाण आपल्याला कधीतरी सोडावे लागणार या विचाराने आधीपासूनच खंत वाटू लागली.

त्या वेळी माझ्याशी बोलायला एकटी छोटीशी नताल्काच होती. पेत्रो पहाटेच उठून डांबर लावलेली होडी घेऊन माशांची जाळी काढायला जायचा. परत आल्यावर अस्ताव्यस्त पसरून झोपून जायचा. संध्याकाळ झाली की तो पुन्हा जाळी

लावायला—कोळयांच्या भाषेत "रापायला" समुद्रावर जायचा. कधी कधी पेत्रो मला आपल्याबरोबर समुद्रावर नेई. असे काही थोडे दिवस सोडले तर पेत्रो माझ्या दृष्टीसही पडत नसे.

होडीच्या कुशीवर समुद्राच्या गढूळ लाटा आपटत होत्या आणि समुद्राचा भव्य विस्तार एकसुरी आवाजाने भरून राहिला होता. नंतर डॉनच्या पात्रावर सूर्य वर आला आणि स्टेपमधला सोनेरी दिवस तापायला लागला.

अंगणात नताल्का हळू आवाजात गुणगुणत चुलीजवळ काही बाही करत होती. तिने माझ्यासाठी आणि वडलांसाठी खायला केले होते. ती आपल्या अदार्का आणि गोस्पोदार्का या चिंध्यांच्या बाहुल्यांना अंगाई गात होती. ऊन आणि पाण्यामुळे त्यांचे सौंदर्य करपून गेले होते. त्यांच्या वाटोळ्या चेहेऱ्यावर डांबराने काढलेल्या जाड जाड भुवया फक्त शिल्लक होत्या.

नाताल्काच्या सोनेरी केसांची वेणी डोक्याभोवती टोपासारखी गुंडाळली होती. तिचे हिरवट निळसर, पाकदर्शक डोळे समुद्राच्या पाण्यासारखे अथांग होते. तिचे हात इतके नाजूक होते की उकळत्या बोर्श सूपचे जड भांडे ती चुलीवरून उतरायला लागली की मला भीतीच वाटायची.

पहिले काही दिवस नताल्का मला घाबरायची. पण ती लवकरच रुळली आणि क्षणभरही उसंत न घेता तऱ्हेतऱ्हेच्या अद्‌भुत कथा मला अखंड सांगत राहू लागली.

"अहो ऐका ना, मी काय सांगते ते!" अधिरेपणाने माझी बाही ओढून ती सांगू लागली. "किनई, आमच्या समुद्रात एक मासा आहे. समुद्राचं काळीज म्हणतात त्याला. कारण ना, तो माणसाच्या काळजासारखा उडतो. हे बघा, असा!" नताल्काने छातीवर हात ठेवला आणि डोळे विस्फारून आपल्या लहानशा हृदयाचे ठोके कसे पडतात ते ती विस्मयाने ऐकत राहिली.

"हे बघा, असा! ठक ठक! ठक! ठक! तो मासा फार नशीबावान आहे असं मात्र समजू नका हं. उलट, बिचारा कमनशिबीच आहे. कारण तो आंधळा आहे. गेनिचेस्कच्या एका कोळयाने त्याला डोळयात मीठ टाकून आंधळं केलंय. कारण तो मासा माझ्या बाबांसारख्या गरीब कोळयांना—ज्यांच्या जवळ एकादंच फाटकं तुटकं जाळं आहे अशा कोळयांना तो मदत करायचा."

"कशी ग मदत करायचा तो या कोळयांना?" कथेचा शेवट माहीत असूनही मी दरवेळी तिला विचारायचो.

"हा मासा त्यांच्या जाळयापर्यंत इतर माशांना हाकून आणायचा. सगळ्या प्रकारचे मासे—मग पद्सूल्का असो सिल्योद्का असो की लोबान असो—सगळे त्याचं ऐकायचे, त्याच्या मागोमाग यायचे. त्या सगळयांना हा मासा गरिबांच्या जाळयात आणायचा. अर्थातच कोळी जाळं बाहेर काढून विकायचे मासे काढून

घ्यायचे आणि ह्या लहानशा " समुद्राच्या काळजाला " परत पाण्यात सोडून द्यायचे आणि बरं का ? त्याला नमस्कार करायचे, त्याची क्षमा मागायचे त्याला त्रास दिल्या-बद्दल. गेनिचेस्केच्या कोळयानं त्याला आंधळं केलं ! खुनशीपणानं ! बापरे, तेव्हा-पासून किती कठीण झालंय् गरीब कोळयांना मासे पकडणं ! कुणी त्यांच्या जाळयात मासे आणतच नाही. गावातल्या मावश्या म्हणतात, " समुद्राच्या काळजाला " चांदीचं पाणी असलेल्या मडक्यात टाकलं की पुन्हा त्याचे डोळे नीट होतील आणि मग पुन्हा गरीब कोळयांचं नशीब उघडेल. नाही तर गरीब कोळी भुकेनं तडफडतील आणि मग भुरट्या चोऱ्या करत फिरतील समुद्रावर ! अशी चाचेगिरी करणं, वणवण भटकणं किती कठीण आहे ! देव करो आणि असं न घडो ! तुम्हाला काय वाटतं ? मी म्हणतेय् ते खरं आहे ना ? की माझं सांगणं म्हणजे उगीचच बरळणं वाटतंय् तुम्हाला ?

" कुणास ठाऊक ! " मी उडवाउडवीचे उत्तर दिले.

" हे सगळं अगदी खर्‍ऽऽरं आहे. " विश्वासाने नताल्का म्हणाली. तिचे डोळे चमकत होते. " देवा शप्पत ! सगळं सगळं खरं आहे ! "

खरे म्हणजे कोळयांच्या असल्या भाकडकथांवर, जुन्या समजुतींवर माझा विश्वास नाही. पण तरीही समुद्रात डुंबताना तळातल्या वाळूवर सुळकांड्या मारणाऱ्या माशां-कडे मी लक्ष देऊन पाहू लागलो. कुठेतरी मनाच्या कोपऱ्यात तो विचार घर करून बसला होता, की कदाचित या माशात मला " समुद्राचं काळीज " दिसेल—सोनेरी अंगाचा, निळया कल्लयांचा, लाल लाल शेपटीवाला मासा !

चाचेगिरीबद्दलच्या विचारलेल्या माझ्या प्रश्नांना उत्तरे देताना कोळयांनी नन्नाचाच पाढा लावला. किंवा उडवाउडवीची उत्तरे देऊन वेळ मारून नेली. शेवटी शेवटी तर चाचेबिचे काही नाहीतच, या सगळया बायकी कल्पना आहेत असंच म्हणायला त्यांनी सुरुवात केली.

चाचेगिरी म्हणजे काय हे मला एका दुःखद प्रसंगाने कळले. वद्य पक्षातल्या एका अंधाऱ्या रात्री !

त्या दिवशी " रापायला " गेलेला पेत्रो रात्री घरी परतलाच नाही. मी माझ्या लहानशा खोलीत झोपून गेलो होतो पण मध्यरात्री नताल्काने मला जागे केले.

" काका " तिने अगदी हळू आवाजात हाक मारली माझा हात धरून पुन्हा म्हणाली, " काका, उठता का ? "

मी ताडकन् उठलो. " काय झालं, नताल्का ? "

" बाबा बहुतेक चाच्यांबरोबर गेलाय्. " नताल्का उत्तरली. ती खाली बसली आणि मुसमुसून रडू लागली.

चिमणी शांतपणे मिणमिणत होती. छपराच्या लाकडांच्या काटेरी सावल्या खोली-

भर हलत होत्या. अनंत, गूढ चिंतनात गढलेला रात्रीचा सागर वाळूवर थडकून तालबद्ध आवाज करत होता.

" कुठल्या चाचांबरोबर ? " मी अर्धवट झोपेत विचारले. " चाचेबिचे काही नाहीत. या सगळ्या बायकी कल्पना आहेत. "

" नाही. बायकी कल्पना नाहीत. असल्याच रात्री चाचे येतात. आजच्यासारख्या अंधाऱ्या रात्री, एकही चांदणी आकाशात नसते तेव्हा ते डॉनच्या मुखाजवळच्या बंदी असलेल्या भागात येतात. अगदी हलक्या चपळ होड्यांतून. असल्या होड्या फार जोरात पळतात. पाकोळीसारख्या. "

" कशासाठी येतात ते तिथे ? "

" माशांसाठी. जमिनीवर खोलीत पसरून ठेवल्यासारखे खूप मासे असतात तिथे. चाचे तिथे जातात. माशांच्या जाण्याच्या वाटेवर जाळी फेकतात. होड्या वळवतात आणि जाता जाता जाळ्यात सापडेल तेवढं सगळं गोळा करतात. घाईघाईने धारेबरोबर वाहात घराकडे परतात. कारण त्या भागात मोटारबोटींचा पहारा असतो ना ! जरासा जरी उशीर झाला ना, किंवा शीड फडफडलं ना, किंवा होडीच्या कुशीवर काही आपटून आवाज झाला ना, की पहाऱ्यावरच्या लोकांच्या लक्षात येतं आणि ते गोळ्या झाडायला लागतात. गेल्यावर्षी त्यांनी आर्सेनेयला मरेमरेतो मारलं होतं. "

वेणीने डोळे पुसत ती मूकपणाने रडत होती. माझा तिच्या सांगण्यावर विश्वास बसत नव्हता. तरीही मी नताल्काची समजूत घालू लागलो. पण लगेचच लांबून समुद्रावरून बंदुकी झाडल्याचे आवाज आले. नताल्का झोपडीतून त्या दिशेने पळत सुटली. मीही तिच्या मागोमाग गेलो.

" बाबा ! " भान सुटून तिने हाक दिली आणि गुडघाभर पाण्यात शिरली. " बाबा ! इकडे या ! "

" ए चोमडे ! " अंधारातून दबका बायकी आवाज आला. " तुझ्या बोलावण्या-शिवायसुद्धा किनाऱ्यावर येतील ते. जातीचे कोळी आहेत ते ! "

नताल्का गप्प झाली.

समुद्रावरच्या काळोखातून होडी बाहेर आली. कोळ्यांनी न बोलता पाण्यात उड्या टाकल्या, होडी किनाऱ्याकडे ओढत आणली, जाळी गोळा केली आणि ते लपून बसले

त्या कोळ्यात पेत्रोही होता. तो झोपडीत आला आणि खालच्या आवाजात नता-ल्काला म्हणाला,

" एक स्वच्छ फडकं दे. दंड फोडला साल्यांनी ! दीप-घरापर्यंत मागे धावले आमच्या. "

तेव्हा कुठे माझ्या लक्षात आले की पेत्रोचा दंड चिंधीने बांधलेला आहे. आणि

त्यातून काळे रक्त खाली जमिनीवर ठिबकत आहे.

" जमीन पुसून टाक ! " पेत्रोने नताल्काला सांगितले आणि माझ्याकडे वळून संशयाने पाहू लागला.

" मी काहीही पाहिलेलं नाही असं समज. " खालच्या आवाजात मी पेत्रोला आश्वासन दिले.

" फार आभारी आहे. " पेत्रो उत्तरला. " पैशाच्या हावेनं नाही जात आम्ही या मार्गाला ! पण गरज आम्हाला जायला भाग पाडते ! "



थोड्या दिवसांनंतर एक दिवस पेत्रो बाजाराला गेला होता तो परत आला आणि तगानरोगमध्ये पाहिलेल्या एका थाटमाटाच्या प्रेतयात्रेचे वर्णन करून सांगू लागला. " त्या प्रेतयात्रेपुढे दोन बिशप चालत होते. आणि सर्वांत पुढे ग्रीक चर्चचा बँड वाजत होता. प्रेत म्हाताऱ्या माणसाचं नसावं. तरुण मुलगी असावी. कारण शवपेटी-वर पांढरी मलमल घातलेली होती.

गाडीच्या मागे तगानरोगमधली समदी बडी बडी मंडळी होती. मिल्ट्रीची हपिसरं —पदकं लावलेली, गावचा मुखियासुद्धा हाती दंड धरून चालत होता. मोठी थाटाची होती प्रेतयात्रा ! अशी प्रेतयात्रा निघाली असती तर मी विसाव्या वर्षीसुद्धा मरायला तयार झालो असतो. शिवाय नताल्काच्या हुंड्यासाठीसुद्धा पैसा शिल्लक राहिला असता. "

" कुणाची एवढी थाटामाची प्रेतयात्रा होती ती ? " मी विचारले.

" आत्याची वाक्सोवच्या—तुमच्या मालकाच्या. म्हणतात की पक्की होती बया अगदी. त्याला पक्का मुठीत ठेवला होता तिनं. आणि आता मोकाट सुटेल तो— वाक्सोव हो ! सगळं डबोलं जाईल आता उडून आणि सगळं वाटोळं होईल. "

वाक्सोवची लाखो रुबलची संपत्ती उधळली तरी संपणे शक्य नाही या विचाराने एक प्रयत्न करून पाहण्याची एक धाडसी कल्पना माझ्या डोक्यात आली. आत्ता ती कल्पना मला भलतीच मूर्खपणाची वाटते. त्यावेळच्या माझ्या तरुण वयामुळेच मी ते धाडस करू शकलो असे आता वाटते.

मी पेत्रुशिनं भूशिरावरून तावडतोब तगानरोगला गेलो. आणि लियेत्सकीय गुरुजीं-कडे पळालो. काहीतरी भव्य दिव्य करण्याच्या आकांक्षेने पछाडलेल्या वाक्सोवबद्दल मी त्यांना सांगितले, मला खात्री होती की आत्याच्या काचातून सुटलेला वाक्सोव तगानरोगपासून खुल्या समुद्रापर्यंत बोटी जाऊ शकणाऱ्या कालव्याच्या या आकर्षक आणि प्रसिद्धी मिळवून देणाऱ्या कामात तो नक्कीच डोके घालील. लगेच वाक्सोवकडे जायला हवे होते.

लिपेत्सकीय गुरुजींना संकोचच वाटत होता. पण मी ठाम राहिलो. शेवटी त्यांना ती गोष्ट पटवण्यात मला यश आले. आम्ही दोघे वाक्सोवकडे गेलो.

सुतक अजून संपले नव्हते म्हणून त्या बड्या घरातले आरसे अजून झाकून ठेवलेले होते. पण वाक्सोव लिहिण्याच्या टेबलाजवळ बसून हिशेबाच्या पाटीवरच्या गोट्या सरकवत बसला होता. त्याच्या कोटाच्या बाहीला एक काळी क्रेपची पट्टी लावलेली होती.

आमच्या भावी आश्रयदात्याने अश्रुपूर्ण नजरेने आमच्याकडे पाहिले आणि थोडेसे उठून विचारले, " काय काम आहे आपलं ? "

लिपेत्सकीय गुरुजी गप्पच होते. खरे बोलायचे तर वाक्सोवच्या दृष्टीवरूनच त्यांनी ओळखले होते, की यातून काहीही निष्पन्न होणार नाही. पण मी धीर करून वाक्सो-वना त्याच्या प्रगतीशिल आणि त्यागी व्यक्ती म्हणून पुढे येण्याच्या स्वप्नाची मी आठवण करून दिली. आपल्या या भागाचे तुम्ही उद्धारकर्ते झालात तर तुम्हाला केवढी कीर्ती मिळेल याचे रसभरित वर्णन मी त्याला ऐकवले. वाक्सोवने माझे म्हणणे लक्ष देऊन ऐकले. पण काहीशा उतावळेपणाने तो म्हणाला, " पण मी काय करू शकणार यात ? "

तगानरोगपासून खुल्या समुद्रापर्यंत कालवा खोदण्याच्या लिपेत्सकीय गुरुजींच्या योजना मी त्यांना वर्णन करून सांगितल्या. पण सरकार काही हे काम हाती घेणार नाही असेही म्हणालो.

" असल्या या नाकर्त्या सरकारमुळे सगळ्या योजना गाभ्यातल्या आळीसारख्या जागच्या जागीच मरून जाणार. " वाक्सोवने सुस्कारा टाकत पुष्टी दिली.

मला आनंद झाला. त्याच्या सहानुभूतीने माझ्या आशेला पंख फुटले.

" हा कालवा खोदण्यासाठी एखाद्या त्यागी, श्रीमंत वजनदार माणसानेच एकादी जॉइंट स्टॉक कंपनी स्थापन करायला हवी, " मी म्हटले.

" अस्सं ! " जरा वेळ थांबून वाक्सोव म्हणाला. आता तो आमच्याकडे पहात नव्हता. तर खिडकी बाहेरच्या डुलणाऱ्या बाभळीवर त्याची नजर खिळलेली होती. " अस्सं ऽऽ ! म्हणजे त्यागी परोपकारी बनविण्यासाठी तुम्ही माझी निवड केली आहेत ! त्याबद्दल मी तुमचा फार फार आभारी आहे, " तो लिपेत्सकीय गुरुजींकडे वळून म्हणाला. " या कामात माझा आर्थिक वाटा किती असावा असं तुम्हाला वाटतं ? "

लिपेत्सकीय गुरुजी गप्पच राहिले. त्यांनी फक्त एक उपहासगर्भ कटाक्ष माझ्या-कडे टाकला.

" तीस हजार ? चाळीस हजार की पन्नास हजार ? " वाक्सोव पुढे बोलला आणि हिशेबाच्या पाटीवरचे मणी त्याने मागे पुढे सरकवले.

" मला माहीत नाही—" हा सारा फार्स थांबवण्यासाठी मी मधे तोंड घालून बोललो. " याबाबत मी काहीच सांगू शकत नाही."

" अस्संऽऽ ! " वाकसोव पुन्हा उद्‌गारला. कोटाच्या बाजूच्या खिशातून त्याने पैशाचे पाकीट काढले, त्यातून लाल रंगाच्या दहा दहाच्या दोन नोटा काढून लिपेत्स-कीय गुरुजींच्या पुढे टेबलावर ठेवल्या. " हं, हे घ्या. राग मानू नका ! मी एवढंच करू शकतो. यापेक्षा जास्त काही मी या कामासाठी देऊ शकत नाही. मी तुम्हाला सांगतो माझा व्यापार आहे. बोटींवर देखरेख ठेवणं हे काही माझं काम नाही. तुम्हाला माहीत आहे की नाही मला माहीत नाही. पण माझे वडील तर संशोधकांना अंगणा-तूनच हाकलून लावायचे चिलटं हकलावी तसे. मरताना त्यांनी मलासुद्धा आत्याच्या ताब्यात दिलं. माझ्यावरसुद्धा विश्वास नव्हता त्यांचा, माहीत आहे ! मला फार वाईट वाटतं सांगायला, पण काही करता येत नाही मला. "

लिपेत्सकीय गुरुजी ताडकन उठले. त्यांची मान थरथरत होती. त्यांनी दहाच्या दोन्ही नोटांचे तुकडे केले, ते वाकसोवच्या अंगावर भिरकावले आणि ते चालते झाले. त्यांनी माझ्याकडे पाहिले सुद्धा नाही. संतापाने माझ्या डोक्यात कल्लोळ माजला होता.

" फारऽऽर वाईट झालं. आत्याच्या मागे तुम्ही जिवंत राहिलात हे. दुष्ट कुठले !" मी वाकसोवर खेकसलो.

" चालता हो इथून ! वेडपट कुठला ! "

दाराच्या मागे कल्लेवाल्या मिश्यांचा सुस्त चेहेऱ्याचा नोकर उभा होता.

" थांब ! " तो मला म्हणाला आणि त्याने माझी बाही पकडलीन्.

छातीत एक ठोसा लगावून मी त्याला ढकलून दिले आणि लिपेत्सकीय गुरुजींच्या मागे निघून गेलो.

या घटनेनंतर मी लिपेत्सकीय गुरुजींना कधी पाहिलेच नाही. त्यांना भेटायची मला लाज वाटत होती.

तगानरोगमधे मला आता काहीच स्वारस्य वाटेना. मी तिथून निघून जायचे ठरवले. थोडेच पैसे शिल्लक होते. पण हिशेब केल्यावर मारिओपोलपर्यंत जायला ते पुरेसे आहेत असे मला वाटले. तिथे मला बंदरात काम मिळेल अशी आशा होती.

शेवटचे भेटायला म्हणून मी गालागिनकडे बोटीवर गेलो गालागिन वाढदिवसा-निमित्त मेव्हण्याकडे गावात जायला निघाला होता. माझी ती चीड आणणारी वाकसोवची कहाणी त्याने शेवटपर्यंत ऐकून घेतली आणि डोळे किलकिले करून मला म्हणाला.

" एखाद्या फाटक्या पायताणासारखीच तुमची अवस्था केलेली दिसते त्याने ! "

" मला समजलं नाही. फाटक्या पायताणासारखी म्हणजे कशी ? "

" अगदी सोपं आहे. तो मालक सोन्याची खाणच. आणि तुम्ही आपले एखाद्या फाटक्या माणसाकडे जावं तसं त्याच्यापर्यंत जाऊन पोचलात. समजायला हवं होतं तुम्हाला. हसे होण्यासारखं वागलात तुम्ही ! शप्पत ! "

गालागिन लगेचच निघून गेला. आणि मी सबंध रात्र त्या जुन्या जहाजावर अगदी एकलेपणाने कंठली.

तो शरदृऋतू होता. किनाऱ्यावरून मधूनच हलकी, मधूनच जोराची अशी बाभळींची सळसळ ऐकू येत होती.

मी डेकवर पडून आयुष्याबद्दल विचार करत होतो. भविष्यात काय वाढून ठेवले आहे माझ्यापुढे ? पुष्कळ वर्षांनंतर मी पुन्हा या भागात येईन आणि एका महान्, अशक्य कोटीतील वाटणाऱ्या वास्तूचा साक्षीदार होईन हे त्यावेळी मला गृहीत तरी धरता येणार होते का ?

चोवीस तासानंतर मी " कोर्च " या वाफेच्या बोटीच्या डेकवर उभा होतो. हे जहाज तगानरोगहून मारीओपोलला जायला निघालेले होते.

दिवस शांत धूसर होता. गवताळ किनाऱ्यावर अंधार पसरला होता. मधूनच खालच्या दाट ढगांमधून घुसून सूर्य किनाऱ्यावरच्या उभ्या कड्यांवर आणि पाण्यात घुसलेल्या जमिनीच्या टोकांवर गेरू सारखा तांबूस प्रकाश फेकत मधूनच तळपायचा. अशावेळी किनाऱ्याजवळचे पाणी हिरवटसर दिसायचे आणि पेत्रुशिन भूशिरावरची काळी होडकी आणि घरांच्या पांढऱ्या भिंती स्पष्ट दिसायच्या.

पेत्रोच्या घराच्या उंबरठ्यावर नताल्का बसलेली दिसेल या आशेने मी डोळे दुखेपर्यंत एकटक किनाऱ्याकडे पहात होतो. पण ती काही मला दिसली नाही. बहुतेक ती जळणासाठी वाळक्या काटक्या कुटक्या गोळा करायला कुरणात गेली असावी.

काळोख दाट झाला. लवकरच काळोखात किनारा गडप झाला. काळ्या करड्या रंगाचे आभाळ आणि करड्या रंगाचे पाणी या शिवाय काहीच उरले नाही.

●

# १

हजारो वर्षांच्या कालप्रवाहात स्टेप प्रदेशातून वाहणाऱ्या वोल्गा आणि डॉन नद्यांवर रोज सूर्य उगवायचा आणि मावळायचा. सतत तेच तेच घडत राहिले होते. उंच सुकलेल्या गवताच्या तिरकस सावल्या भुरकट जमिनीवर दूरवर पडायच्या. करड्या रंगाच्या जमिनीवरच्या खारी आता इथे, तर मग तिथे अशा उन्हाच्या पट्ट्यांमधून पळायच्या आणि बिळात दिसेनाशा व्हायच्या.

या स्टेप प्रदेशात खणल्या जात असलेल्या बोटी जाणाऱ्या कालव्याच्या प्रचंड प्रकल्पाचे प्रमुख बासार्गिन यांना स्टेपप्रदेशातला सूर्योदयही कधी नीटसा समजला नाही. आणि हा स्टेपप्रदेशही कधी नीटसा कळला नाही. स्टेपप्रदेश, तिथली भयंकर उष्ण हवा, धुळीचे साम्राज्य, पाण्याचा अभाव रस्त्यांचा अभाव या सर्व गोष्टी म्हणजे काहीही करून दूर केलेच पाहिजेत असे अडथळे आहेत एवढेच फक्त त्यांना तीव्रतेने जाणवायचे.

स्टेपमधल्या या प्रकल्पाआधी बासार्गिननी दुसऱ्या मोठ्याल्या प्रकल्पांचे नेतृत्व केले होते. ते प्रत्येक काम म्हणजे मानवाच्या ज्ञानाची, आणि इच्छाशक्तीची हट्टी निसर्गावर विजय मिळवण्यासाठी चाललेली लढाई आहे हा विचार त्यांना पूर्ण पटलेला होता. मग तो प्रकल्प अक्षय धुके, पाणथळ जमीन, रोगट दलदल, बर्फ, शून्याच्या खाली जाणारे उष्णतामान, अवखळ नद्या यांनी भरलेल्या तैगातला असो की वोल्गा-डॉन यांच्यामधल्या उग्र प्रकृती स्टेपप्रदेशातला असो, ती लढाईच असायची.

आणि म्हणूनच प्रौढ अबोल बासार्गिन निसर्गाकडे आपला एक कायमचा प्रतिस्पर्धी म्हणूनच पहायचे. अनेक वर्षांच्या कामाने ते निसर्गाला पूर्णपणे आधीन करून घ्यायला—इतकेच नव्हे, तर समृद्ध सुखी सोव्हिएट राष्ट्र निर्माण करण्याच्या आपल्या कार्यात त्याला माणसाचा मदतनीस बनवायला शिकले होते.

बासार्गिन यांच्या दृष्टीने प्रकल्पाच्या कामाव्यतिरिक्त इतर सर्व गोष्टी कमी महत्त्वाच्या होत्या. म्हणूनच उगवता दिवस कसा असेल ? उष्ण धुळीने भरलेला की शीतल हे सांगणारा सूर्योदय हा निसर्गाचा दूत आहे असे ते मानीत. उन्हाच्या रंगावरून आणि इतर खुणांवरून थंड आणि ढगाळ हवेचे आश्वासन सूर्योदयाने दिले की त्यांना आनंद होई आणि सूर्योदय जर नेहमीपेक्षा प्रखर आणि नेहमीपेक्षा स्वच्छ आकाशातला असला, बिलकूल ढगाळ नसलेल्या हवेचा प्रतीक असला की बासर्गिनच्या कपाळाला आठ्या चढत.

प्रकल्पावर काम करणारे हजारो लोक या निर्दय तप्त आकाशाखाली काम करताना आज थकून जातील या विचाराने ते अस्वस्थ होत. उष्णतेचा मारा सहन करणारी हजारो यंत्रे—त्यांच्याबद्दलही त्यांना काळजी लागे. तीसुद्धा प्रकल्पावरच्या माणसांपेक्षा काही कमी त्रास सहन करत नव्हती ! यंत्रे आणि माणसे—या कालव्याचे शिल्पकार होते !

जिथे निसर्ग माणसाच्या पूर्ण काबूत आहे आणि त्याने नव्या निर्मितिक्षम जीवनाचे गुण आपल्यात बाणवले आहेत अशा निसर्गाबद्दल तेवढे बासर्गिनना प्रेम वाटे.



उन्हाळ्याच्या मध्याला मॉस्कोचे बोलावणे आले. क्रेमलीनमधे कालवा प्रकल्पासंबंधी बैठक ठरली होती.

संध्याकाळ टळून गेल्यावर बैठक सुरू झाली. उघड्या खिडक्यांतून अजून चांदण्या दिसत नव्हत्या. मॉस्को शहरावरचा वातावरणाचा प्रचंड घुमट गुलाबी प्रकाशाने भरून गेला होता. तो शहरातल्या इलेक्ट्रिकच्या दिव्यांचा परावर्तित प्रकाश होता. अशी होती मॉस्कोतली रात्र ! दबका पण समर्थ असा शहराचा आवाज क्रेमलिन प्रासादापर्यंत पोचत होता.

या उजेड आणि आवाजाबरोबरच रात्रीची शीतल हवाही खिडकीतून आत शिरत होती. या हवेत नदीच्या पाण्यावरील लहरींचे निःश्वास आणि कसलातरी मंद शीतल सुवास भरून राहिला होता. बहुधा तो वास नुकत्याच पडून गेलेल्या पावसाने शिंपलेल्या बागेमधल्या ओलसर पालवीचा असावा.

“ कुठून येतोय हा सुवास ? ” बासार्गिनच्या मनात निसटता विचार येऊन गेला. पण स्वतःच्या या प्रश्नाला उत्तर द्यायला काही त्यांना सवड मिळाली नाही. त्यांचे

सगळे चित्त त्यांना सभेत करायच्या स्वतःच्या छोट्याशा भाषणातल्या मूलभूत मुद्यांवर केंद्रित झाले होते. त्यांनी स्वतःची टिपणे पाहिली. क्षणभर त्यांनी त्या स्वच्छ हवेत छाती भरून श्वास घेतला, तेव्हा कानशिलांवरच्या शिरा ताबडतोब उडायच्या थांबल्या. थकल्याची पहिली खूण होती ती. अध्यक्ष तळव्याने डोळे झाकून घेऊन बासार्गिन यांचे भाषण ऐकत होते. मधून मधून मान डोलवत होते. जणू या अशा कृतीने वक्त्याला उत्तेजनच देत होते. आपण त्यांचे भाषण लक्षपूर्वक ऐकतो आहोत असे दर्शवीत होते.

बासार्गिन यांचे भाषण संपले तसे अध्यक्षांनी डोळयांवरचा पंजा काढला आणि ते शांतपणाने म्हणाले, " काही दिवसांपूर्वी सरकारने जो निर्णय घेतला तो योग्य वेळी घेतलेला निर्णय होता याला पुष्टी देणारेच तुमचे भाषण आहे. तो निर्णय तुम्हाला सांगण्याचा अधिकार मला देण्यात आला आहे. त्याच्याच बरोबर हेही सांगायचे आहे, की अद्ययावत नव्या तंत्रज्ञानांची मदत तुमच्या प्रकल्पाच्या कामाला असल्यामुळे सरकारने कामाची मुदत कमी करायचे ठरवले आहे. तुमची तयारी आहे का त्याला ? "

" हो, आम्ही तयार आहोत." बासार्गिन म्हणाले. " मला आशा आहे की आम्ही सगळं व्यवस्थित करू. "

" आम्हाला निश्चय पाहिजे आशा नको. "

" हो, आमचा निश्चय आहे, " बासार्गिन म्हणाले. " हे मी माझे एकट्याचे म्हणून नाही सांगत. तर समाजातल्या हजारो लोकांच्या वतीने सांगतो आहे. आमच्या वर किती विश्वास दाखवला गेला आहे ! आम्ही खरोखरच नशीबवान आहोत. "

बासार्गिननी कपाळापासून हनुवटीपर्यंत चेहऱ्यावरून हात फिरवला. आनंदी किंवा गोंधळलेले असले की असे करायची त्यांना सवय होती.

आतापासूनच त्यांना तो प्रकल्प पूर्ण झालेला, एखाद्या भूतकाळात घडलेल्या इतिहासात जमा झालेल्या घटनेसारखा दिसायला लागला. आणि विलक्षण घटनांनी भरलेला नवा कालखंड सुरू झाल्यासारखे वाटू लागले.

त्या बैठकीतच कामाला नवी गती येण्यासाठी काही तातडीच्या उपाययोजना सुचवण्यात आल्या.

चर्चा संपली होती. तरीही अध्यक्ष काही जागचे हलले नाहीत. पेन्सिल उभी धरून ते सर्वसाधारणपणे तिचे निरीक्षण करत होते. जणू काही ते काहीतरी कान देऊन ऐकत होते.

नंतर त्यांनी मान वर करून खिडकीकडे पाहिले आणि त्यांना हसू फुटले. "पाहा, आपला मॉस्कोतला लिंबारा कसा फुलायला लागलाय." ते म्हणाले. "हासुद्धा संशयात्म्यावर एक प्रकारचा विजयच आहे आपला, कॉम्रेडस ! मोठी झाडे उपटून दुसरी-

कडे लावली तर त्यांना ते सोसणार नाही, मॉस्कोतल्या रस्त्यावर ती उगीचच मरून जातील असे सांगून ते संशयात्मे माझे पाय ओढण्याचा प्रयत्न करत होते. पण उलट लिंबारे चांगले वाढताहेत, डुलताहेत, फुलताहेत."

अध्यक्ष क्षणभर थांबले. स्वतःशीच बोलावे तसे ते म्हणाले, "समृद्धी, देशाची भरभराट यांच्यासाठीच पार्टीच्या इच्छेने आम्ही प्रचंड, अद्ययावत उद्योगधंदे उभारले आणि मोठाले प्रकल्प प्रत्यक्षात उतरवले. समृद्धी म्हणजेच कम्युनिझम्! त्याच्यासाठी काही फार थांबायला नको आता." ते बोलायचे थांबले. तेवढ्यातच झाडांच्या फांद्यात वारा खेळत होता त्याचा आवाज कानी आला. नुकत्याच पडून गेलेल्या पावसाचे थेंब पानांवरून घरंगळत होते. हॉलमधला प्रकाश बाहेर अंधारात जात होता. त्याच्या झोतात ठिबकणारे तिरके थेंब स्पष्ट दिसत होते.

शेजारच्या दालनात जाण्यासाठी बासार्गिन बाहेर पडले. नुकतेच जे कळले त्याने ते उत्तेजित झाले होते. क्षणभर ते उघड्या खिडकीजवळ थांबले. आणि त्यांनी पावसाचे मोठेमोठे थेंब पडत होते त्यांच्याखाली हात पसरला. वाऱ्याने कुठून तरी आणलेला थेंबांचा एक सरच्या सर त्यांच्या हातावर ओघळला.

हात पुसण्यासाठी बासार्गिननी रुमाल बाहेर काढला. त्याचवेळी त्यांना स्वतःच्या पाठीकडून ओळखीची हाक ऐकू आली.

बासर्गिन वळले. अध्यक्ष एकाग्रतेने त्यांच्याकडे टक लावून पहात होते.

"मला पूर्ण खात्री आहे, की तुमच्यापुढे असलेले काम तुम्ही खात्रीने पार पाडाल." अध्यक्ष म्हणाले. "त्यात तुम्हाला संपूर्ण यश मिळो अशी मी शुभेच्छा व्यक्त करतो, कॉम्रेड बासार्गिन!"

अध्यक्षांनी हस्तांदोलनासाठी हात पुढे केला. पावसाच्या थेंबांनी ओलसर थंड झालेल्या बासार्गिन यांच्या तळव्याचा स्पर्श बहुधा त्यांना सुखद वाटला असावा. कारण त्यांनी त्यांच्या हातावर थोपटल्यासारखे केले आणि वळून घाईघाईने दाराकडे निघून गेले.

क्रेमलीनच्या प्रवेशद्वाराशी रजनीने बासार्गिन यांच्यावर ढगांच्या सावल्या, थर-थरणारा मंद प्रकाश, ओलसर पालवीची झळाळी यांचा वर्षाव केला. त्यांनी मोटार परत पाठवून दिली आणि पायी चालायला सुरुवात केली.

रात्र झाल्याने गॉर्की रस्ता मोकळा होता. बासार्गिन एका जुन्या लिंबाऱ्याखाली थांबले आणि त्यांनी त्याच्या खरबरीत खोडावरून हात फिरवला.

"तू सुद्धा आमची साथ करतो आहेस." त्यांच्या मनात विचार आला. "आमच्या जीवनाला शोभा देतो आहेस. हे कामही काही लहान सहान नाही."

त्या लिंबाऱ्याखाली त्याच्या बुंध्याला टेकून ते आणखीही खूपवेळ उभे राहिले असते. रात्रीच्या उत्तेजित करणाऱ्या विचारांना त्यांना काबूत आणायचे होते. पण

बासार्गिनकडे पाहून चौकातला पोलिस चुळबुळ करायला लागला होता. हा गृहस्थ मोहरलेल्या लिंबाऱ्याची एकादी फांदी तर तोडण्याच्या विचारात नाही ना ! काय परिस्थिती आहे ते पाहाण्यासाठी तो या अनोळखी सद्गृहस्थाच्या मागे जाऊ लागला. बासार्गिनला हसू कोसळले. कितीतरी दिवसांत ते दुसऱ्यांनाही हसते करणारे असे खळखळते हसू हसले नव्हते. गॉर्की रस्त्याने ते पुढे चालू लागले. पोलिस लिंबाऱ्याजवळ आला. छिद्रान्वेषी दृष्टीने तो कितीतरी वेळ त्या लिंबाऱ्याची पाहाणी करत होता. गलेलठ्ठ ऑफिस बॅग घेतलेल्या या पोक्त सद्गृहस्थाला या झाडाचे काय हवे होते हे समजून घेण्याचा तो प्रयत्न करत होता.

खरे सांगायचे तर बासार्गिनना त्या झाडाची सबंध फांदी तोडण्याची इच्छा नव्हती. पण सुवासाने घमघमणारे फक्त एकच फूल घरी नेऊन आपल्या लहानग्या मुलाच्या कॉटवर ठेवायचे होते. त्या लहानग्या जिवाला निसर्गातल्या सगळ्या गोष्टींनी आनंद व्हायचा. मग ती एकादी गवताची काडी असो, मुंगी असो, एकादे फूल असो किंवा मॉस्कोतल्या त्यांच्या फ्लॅटमधल्या खिडकीतून वाऱ्याबरोबर उडून आत आलेली म्हातारी असो. त्याला त्याचा फार आनंद वाटायचा.



जिथे प्रकल्पाच्या कामांची ऑफिसे एकवटलेली होती त्या डॉननदीवरच्या कलाच गावी जाणाऱ्या विमानात बसून बासार्गिन क्रेमालिनमधे झालेल्या बैठकीबद्दल विचार करत होते. ते सारे अगदी नुकतेच घडले होते. फक्त तीनच दिवसांपूर्वी.

शेतावर ऊन पसरले होते. आणि विमानाची लांबलचक सावली रस्त्याचे पट्टे मोठ्या आत्मविश्वासाने ओलांडत चालली होती. बासार्गिन आणि त्यांचे दोन मदतनीस यांच्याशिवाय आणखी एक प्रवासी खिडकी जवळ बसला होता. अगदी तरुण दिसणारा, किडकिडीत, दाट पिंगट केस असलेला आणि सावळ्या वर्णाचा.

" हा तरुण म्हणजे तो लेनिनग्राडचा स्तारोस्तिन तर नव्हे ना ? " त्यांच्या मनात विचार आला. " याच्याच बद्दल तर काल झिमल्यानोय बोलला नव्हता ना ? तो सैबेरियाच्या मेलिओरेशनच्या प्रश्नाचा अभ्यास करतोय म्हणे. "

बासार्गिन लक्षपूर्वक आपल्याकडे पहाताहेत हे त्या तरुण इंजिनियरच्या लक्षात आले आणि त्याचा चेहरा आरक्त झाला. मॉस्कोहून कुइबिशेव—स्तालिनग्राड आणि तिथून क्रास्नोआर्मेयेच अशी काल्व्याच्या मार्गावरची दिशा वैमानिकाने घेतली होती. बासार्गिनना काल्व्याचा मार्ग विमानातून पहायचा होता. सकाळच्या धूसर हवेने वेढलेले मॉस्को शहर मंद चंदेरी रंगाने चमकत होते. रात्रीच्या पावसानंतर राजधानीतले डांबरी रस्ते आणि बागा कोरड्या व्हायला लागल्या होत्या. त्यामुळे निर्माण होणाऱ्या वाफेमुळे ती धुसरता आली होती. उंच इमारतींचे उंच चकचकित

मनोरे ती धुसरता भेदून आकाशाच्या निळाईत शिरले होते. मनोऱ्यांवरच्या काचेच्या खिडक्या वर चढणाऱ्या सूर्याच्या प्रकाशात झगमगत होत्या.

ओलसर सावल्या जमिनीवर पडल्या होत्या. या सावल्यात, तिरकस ओलसर प्रकाशात, उंच इमारतींच्या काचेच्या तावदानांच्या आणि क्रेमलिनवरच्या ताऱ्यांच्या झळाळीत असा काही ताजेपणा भरून राहिला होता की त्याचा आस्वाद घेण्यासाठी बासार्गिननी एक दीर्घ श्वास घेतला.

ते एकटक खाली पहात होते. फक्त अधून मधून ते क्षितिजावर जमलेल्या ढगांच्य राशीकडे उत्कंठेने पहात होते. त्यांना भीती वाटत होती, की हे ढग मधे येतील आणि आपल्याला खालची जमीन दिसणार नाही. सोव्हिएट माणसाच्या हाताने बदलून टाकलेल्या जमिनीकडे सारखे पहात राहावे असे आज बासार्गिनना वाटत होते. बालपणी गाडीच्या खिडकीतून पळणाऱ्या झाडांकडे आणि शेतांकडे जेवढ्या हावरट पणाने डोळे दुखेपर्यंत आपण पहात होतो ना, अगदी तसेच आता खालच्या दृश्या- कडे पहात राहावे असे त्यांना वाटत होते.

असे पहाण्यात नुसते ढगच नाही, तर सहप्रवासीही अडथळा आणणार होते. ती माणसे फारच बडबड्या स्वभावाची होती. त्यातला विभागप्रमुख झिमल्यानोय तर फारच बडबड्या! म्हणून बासार्गिननी विचारात गढल्यासारखा गंभीर चेहरा केला. त्यांना माहीत होते की असा मुखवटा धारण केला तरच ते आपल्याला स्वस्थता लाभू देतील. आणि तसंच घडलं.

प्रकल्पाच्या काळात कपात करण्यासंबंधाने त्यांनी बांधकामावर टेलिफोनवरून काही प्राथमिक सूचना दिल्याच होत्या. त्यामुळे या पहाणीवर नेहमीपेक्षा थोडा अधिक वेळ घ्यायचा त्यांनी ठरवले होते. त्यांच्या सूचनेप्रमाणे वैमानिकाने मॉस्कोच्या उत्तरेला मोठी अर्धवर्तुळाकार चक्कर घेतली. खाली वोल्गा मस्क्वा कालव्याचा पाण्याचा मोठा खजिना निळा निळा दिसत होता. चमकदार मनोऱ्याचे प्रतिबिंब क्षणभरच चमकून गेले आणि लगेच कालव्याच्या एका दरवाजातून येणारी खेळण्यांसारखी दिसणारी जहाजे उन्हात चमकली. दूरवर डाव्या हाताला मस्कवा नदीच्या समुद्रा- सारख्या अथांग पात्रातून अभ्रकासारखे चमकते पाणी वाहात होते. हिरव्यागार, अर्धवर्तुळाकार उग्लीचवर इंद्रधनुष्य उमटले होते.

"पावसाचे ढग नसताना हे इंद्रधनुष्य कसं उमटलं?" बासार्गिनच्या मनात विचार आला. उग्लीच धरणावर त्या इंद्रधनुचे पडलेले प्रतिबिंब थरथरत होतं, चमचमत होतं. तिथून वोल्गाचा प्रवाह खाली कोसळून हजारो तुषार उधळत होते. त्या तुषारांशी खेळताना सूर्य प्रकाशाची ही किमया दाखवत होता.

रिबिन समुद्रावरच्या फेसाळ नाचणाऱ्या लाटांना वायव्येकडचा वारा पळवत होता. एक मोठी टगबोट त्या लाटा कापत पडावांची रांगची रांग ओढत नेत होती.

तेलाची वाहातूक करणारे पडाव जाताहेत हे कळावे म्हणून खुणेसाठी डोलकाठ्यांवर लावलेली वाऱ्यांमुळे ताठ झालेली त्यांची तांबडी निशाणे विमानातून स्पष्ट दिसत होती.

नंतर एकदम श्चेरबाचे हैड्रो-इलेक्ट्रिक स्टेशन खाली दिसले. जुनाट यारोस्लाव भागातले धूर ओकणारे नवे प्रचंड कारखाने क्षितिजावर दिसू लागले. वोल्गाला दृष्टि-आड होऊ न देता वैमानिकाने सफाईने दक्षिणेकडे वळण घेतले.

बासार्गिननी पाहिले, तो त्यांचे सहप्रवासीसुद्धा त्यांच्याचप्रमाणे दृष्टी न ढळवता खाली पहात होते.

प्रतिदिनी, प्रतिवर्षा भरभराटीस येणाऱ्या देशाच्या या जिवंत, सुंदर चित्राकडे पहायचे नाही, आणि ते सुद्धा अशा तरल, निळया निळया, विस्मयचकित करणाऱ्या सकाळच्या रम्यवेळी हे कसं शक्य आहे?

उजव्या बाजूचा इवानोव प्रदेश धुक्यात गुरफटला होता. विमानाच्या इंजिनांचा आवाज थांबवता आला असता तर हजारो मागांचा तालबद्ध अखंड गुंजारव विमाना-पर्यंत पोचला असता असा विचार बासार्गिनच्या मनात चमकून गेला.

स्वतःच्या या बाल सदृश विचारांचे त्यांना हसू आले आणि सीटवर मागे रेलून बसत मान वळवून ते खिडकीबाहेर पाहू लागले. समोर गॉर्की गाव होते. प्रकल्पाच्या बांध-कामावरचे नेहमीचे परिचित दृश्य दिसत होते—गॉर्की धरणाच्या चालू कामावरचे वोल्गा किनाऱ्यावरचे मातीचे ढिगारे, बाराखनमधल्या लाकडांच्या थप्प्या, पांढऱ्या, सुताच्या रिळांसारख्या दिसणाऱ्या मालाने लदलेले पडाव. पण खरं तर ती सुताची रिळे नसून कागदाची प्रचंड रिमे होती.

त्यांच्या पलीकडे नदीच्या उतारावरचा पोलादी चकालोव पूल, क्रेमलीन राजवाडा धक्के, तराफे, जहाजे. तराफे, टगबोटी, लाटांमुळे बहिर्गोल दिसणारा नदीचा आरस्पानी प्रवाह आणि गावाबाहेरची हिरव्या झाडीने वेढलेली वस्ती. एक बदकांचा थवा मुराव वृक्षांनी वेढलेल्या रस्त्यावर थबकला होता. आणि आकाशाकडे माना उंचावून कल-कलत होता. जणू ती हे विमान कुठे चाललंय याबद्दलच बोलत असावीत.

आणि बाजूने गॉर्की मोटारकारखान्यातून मॉस्कोकडे निघालेला नव्या मोटारींचा ताफा चमकत्या तुकतुकीत हमरस्त्यावरून पळत होता मोटारींच्या रियरव्ह्यू आर-शाचे कवडसे रस्त्याच्या डांबरावर बर्फाच्या पातळ थरासारखे दिसत होते.

बदकांच्या थव्यांचा परिचित रस्ता! आणि हिरव्या छपराचं लहानसं घर—तेही परिचयाचं, अत्यंत प्रिय! याच घरात बासार्गिन जन्मले आणि लहानाचे मोठे झाले. सर्वांत वाफोरावर वडलांबरोबर काम करण्यासाठी ते प्रथम गेले, ते याच घरातून!

कामा नदीच्या मुखाजवळ तराफ्यांची एवढी मोठी रांग उभी होती की तिचा शेवट दिसणेसुद्धा मुष्किल होते. नदीचा प्रवाह धुक्यात गडप झाला होता.

" हे सगळं सामान आमच्याकडेच चाललंय—आमच्या अपूर्वाईच्या प्रकल्पाकडे." बासार्गिनच्या मनात विचार आला.

विमान जसजसे प्रकल्पाच्या जागेजवळ कुईबिशेव, स्तालिनग्राड वरून डॉनकडे जाऊ लागले तसतशा बोटी, तराफे, टगबोटी, पडाव, धुळीने माखलेल्या लांबलचक मालगाड्या, मालमोटारी यांच्या हालचाली वरून जास्त स्पष्ट दिसू लागल्या. त्या सगळ्या एकाच दिशेने जात होत्या—दक्षिण दिशेला. पहाटेच्या काळोखातच तिथल्या प्रचंड कामाला गती आली असेल. त्यासाठी आगगाडीच्या इंजिनाच्या धुरालाही वाऱ्याने दक्षिणेकडचीच गती दिली होती. वोल्गाच्या लाटासुद्धा तराफ्यांना लोंबकळून त्यांचा पाठलाग करत तिकडेच पळत जात होत्या. असंख्य मोटारींच्या चाकांखालची धूळसुद्धा दक्षिण दिशेनेच वेगाने जात होती. पावाच्या लाद्यांसारखे करपट रंगाचे तुळतुळीत डोंगर, मधेमधे पसरलेल्या हिरव्या रंगाच्या जिगुलीच्या टेकड्या आता दिसू लागल्या होत्या.

पश्चिमेला काळ्याभोर शेताचा विस्तार सोनेरी पिकांनी झाकून टाकला होता.

वोल्गाच्या दोन्ही किनाऱ्यांवर कुईबिशेवचे बांधकाम पसरले होते. त्याच्या प्रचंड विस्तारामुळे विमान जणू स्वतःचा वेग हरवून त्या बांधकामावरच तरंगत राहिल्यासारखे वाटत होते. पण बासार्गिनना माहीत होते की प्रकल्पाच्या क्षेत्रावरून विमान नेहमीच्याच वेगाने जात आहे.

हेच ते जुने परिचित स्टालिनग्राड! त्या प्रचंड प्रकल्पाचा केंद्रबिंदू होता वोल्गावर!

स्तालिनग्राडमधल्या मोठ्या मोठ्या पेठा, कारखान्यांच्या लांबट चौकोनी इमारती युद्धामुळे उध्वस्त झालेल्या जागेवर नव्याने फुललेले रंगीबेरंगी फुलांचे ताटवे हे सारे एखाद्या सुस्पष्ट नकाशाप्रमाणे पुढे सरकत होते.

विमान क्रास्नोआर्मेइस्कजवळ पोहचले आणि ते उजव्या हाताला वोल्गा डॉन कालव्याच्या बाजूला वळले.

बांधकामामुळे खंडित झालेल्या मातीच्या किनाऱ्यावर हलवलेल्या वस्त्यांच्या जागा आणि भावी तलावांचे ओबडधोबड खळगे असलेला रुंद खंदक एक सुरेख वळण घेऊन वोल्गापासून दूर उत्तरेच्या दिशेने वातावरणाच्या काचेसारख्या धूसरतेत अलगदपणे शिरला होता.

योजनाकारांनी त्या उंचसखल प्रदेशातही कालव्याची आखणी किती यशस्वी रीतीने केली आहे ते इथून उंचावरून स्पष्ट दिसत होते. कालव्याच्या मार्गातले निसर्गनिर्मित सर्व अडथळे त्यांनी पार केले होते. आणि नैसर्गिक साधनांचा—विशेषतः सार्पी आणि चेर्व्लेन या स्टेपप्रदेशातून वाहणाऱ्या नद्यांच्या प्रवाहांचा जास्तीत जास्त उपयोग त्यांनी करून घेतला होता. याचा परिणाम म्हणून एकशेदोन किलो-

मीटर लांबीचा हा कालवा आपले छप्पन्न किलोमीटरचे अंतर फक्त कृत्रिम मार्गातून काटणार होता.

कालव्यावरून विमान पश्चिमेकडे वळले. उन्हाने डोळे दिपत नव्हते त्यामुळे जमिनी वरचे दृश्य अगदी बारीक सारीक गोष्टींसकट स्पष्ट व हुबेहुब दिसत होते, अगदी माती खणणाऱ्या यंत्रांच्या दिशादर्शक बाणांच्या जमिनीवर पडलेल्या सावल्यांसकट !

खंदकाच्या दोन्ही बाजूंनी पर्वताच्या दोन लाल रांगा या क्षितिजापासून त्या क्षितिजापर्यंत पसरल्या होत्या. कालव्याच्या खोदकामातून काढलेल्या मातीचे प्रचंड डोंगर होते ते !

इथून, उच्च आकाशातून प्रकल्पाचे बांधकाम एखाद्या विशाल चित्रासारखे दिसत होते. तांब्याच्या पत्र्यावर जलरंगाने काढलेल्या पुरातन नकाशासारखे भासत होते. ते निरखून पाहिले, की मातीची धरणे, धरणांच्या काँक्रिटच्या दरवाजांच्या आणि पॉवर स्टेशनच्या जाळीदार चौकटी वेगवेगळ्या ओळखता येत होत्या. त्या सगळ्या गोष्टी थोड्याशा पिवळसर थोड्याशा करड्या रंगाच्या दिसत होत्या. जणू काही स्टेप-मधले सोनसळी गवत, पिवळसर आकाश, स्टेपमधले करड्या रंगाचे पिवळसर पिसांचे पक्षी यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या स्टेप प्रदेशाची रंगसंगतीच त्यांनी टिकवून धरली होती.

खालच्या बाजूला धुराचे शेकडो स्तंभ वरवर चढत आहेत असे वाटत होते. पण तो धूर नसून माती खणणाऱ्या व ती वाहून नेणाऱ्या यंत्रांनी सतत टाकलेल्या माती-मुळे उडणारा धुराळा होता.

इथून उंचावरून सुद्धा कामातील तालबद्ध लय जाणवत होती. धूळ, धूर आणि वाफ यांचे उच्छवास टाकणाऱ्या एकाद्या अजस्र प्राण्याप्रमाणे तो सबंध प्रकल्प आपल्या अफाट ताकदीने राबत होता. प्रकल्पावरच्या उठणाऱ्या धुराळ्याच्या लोटांनी सारा स्टेप प्रदेश झाकून गेला होता. आणि जणू काही त्याला स्वतःचे स्वतंत्र अस्तित्वच उरले नव्हते. तो स्टेप प्रदेश म्हणजे फक्त माणसाच्या कर्तृत्वासाठी खुले केलेले एक प्रचंड मैदान होते.

वोल्गा नदी ते आझोव समुद्र एवढी प्रचंड जागा व्यापणारे ते बांधकाम निरनिराळ्या विभागांत विभागलेले आकाशातून स्पष्ट दिसत होते.

पहिला भाग होता वोल्गा डॉन कालव्याचा. विमान जेव्हा त्याच्यावरून जायला लागले तेव्हा झिम्ल्यानोयनी स्तारोस्तिनना आपला विभाग दाखवला. तो विभाग डॉन जवळ होता. धरणाच्या दरवाजांचे लाकडी पिंजरे, धरणाच्या भिंतींची रेषा आणि अजून कोरडा असलेला कार्पोवचा पाण्याचा खजिना हे सारे धुळीने माखलेल्या प्रतिकृतीसारखे दिसत होते.

कलाच गावाजवळ कालवा संपत होता. तिथून पुढे प्रकल्पाचा दुसरा भाग सुरू

होत होता. त्सिमलाचा पाण्याचा खजिना, चौदा मीटर लांबींचे डॉनवरचे धरण, त्सिमलाचे हायड्रो इलेक्ट्रिक स्टेशन आणि त्सिमलाच्या पाण्याच्या साठ्यातले पाणी, डॉनपलीकडच्या स्टेपप्रदेशातल्या शेतीला पाणी पुरवणाऱ्या कालव्यात टाकणारा मुख्य कालवा.

विमान कलाच गावाजवळ आले. बासार्गिननी वैमानिकाला चिठ्ठी पाठवली. "आपल्याला इथे थांबायचे नाही. त्सिमलाकडे घ्या. तिथून मुख्य कालव्यावर आणि नंतर सारायेवकडे. तिथे विश्रांती घेऊ, खाऊ पिऊ आणि परत फिरू."

वैमानिकाने मागे वळून पाहून संमतिदर्शक मान डोलावली.

डॉनचे खोरे कसेतरीच दिसत होते. मध्यभागीच फक्त थोडेसे पाणी शिल्लक राहिलेल्या एकाद्या आटलेल्या मोठ्या तळ्यासारखे ते खोरे दिसत होते. नदीच्या काठची गावे आधीच हालवून दूर, नव्याने तयार होणाऱ्या डॉन समुद्राकाठी नेली होती. आणि मधे लांबरुंद कोरडा खळगा पसरला होता—माणसाने बनवलेला नव्या समुद्राचा तळ!

नंतर त्सिमलाचे बांधकाम दिसू लागले. बांधकामाच्या अवाढव्य वाटोळ्या खळग्यात काळे हालते ठिपके विखुरलेले दिसत होते—माणसांचे आणि यंत्रांचे. वेल्डिंगच्या काटेरी चांदण्या धुळीत चमकत होत्या. पोर्टल क्रेन धरणाच्या भिंतीच्या कडेवरून पळत होते. सबंध सोव्हिएट युनियनमधे शक्तिशाली ठरणाऱ्या काँक्रिट तयार करण्याच्या कारखान्यावर हिरवट रंगाचे धुके पसरले होते.

विमानाने दक्षिण दिशेची मुख्य कालव्यांवरची वाट धरली. तिथे क्षितिजावरच्या ढगांच्या राशी बर्फाच्छादित शिखरांसारख्या चमकत होत्या.

वैमानिकाने विमान कमी उंचीवर घेतले. माणसे, रस्ते, किंबहुना वाऱ्याने डोलणाऱ्या बाभळीसुद्धा स्पष्ट दिसू लागल्या.

विमान नव्याने बांधलेल्या वस्तीच्या जवळच एकदम जमिनीवर उतरले आणि थांबण्याच्या ठिकाणाकडे पळत गेले.

"कुठे चाललाय हा?" बासार्गिन यांच्या मनात विचार आला. "सारायेवचे मुख्य ऑफिस, मोठे मार्तिनोवस्की गाव तर अजून ४० किलोमीटर दूर आहे!"

दाट बारीक गवतावर विमान उतरले आणि स्टेपचा प्रदेश बदललेलाच दिसू लागला. डाव्या उजव्या हाताला टेकड्या पळत होत्या आणि त्यावर पिवळसर सोनेरी आणि पांढरट कविल गवत वाऱ्याने लवलवत होते.

जवळच लहानसर, फळ्यांचे बनवलेले घर दिसले. त्याच्या जवळ तांबूस रंगाची धुळीने माखलेली गाडी उभी होती.

"ही गाडी सारायेवची आहे." वैमानिक म्हणाला आणि तोंडभरून हसला. "बांधकामावरच्या सगळ्यांच्या चांगली ओळखीची आहे ती! वरून २०० मीटर

उंचीवरूनच ओळखली मी ती!"

काही माणसे गाडीजवळून विमानाकडे पळत आली. त्यांच्या मागून घाई घाईने पण थोडेसे लंगडत एक पोक्त इसम येत होता. त्याच्या डोक्यावर हॅट नव्हती. घामेजलेल्या कपाळावर पिकलेल्या केसांचा झुपका रुळत होता. ते सारायेव होते—मुख्य कालव्याच्या बांधकाम विभागाचे प्रमुख. बासार्गिन यांच्या तीन मुख्य साहाय्यक अधिकाऱ्यांपैकी एक! दुसरे दोन साहाय्यक अधिकारी कालव्याचे बांधकाम आणि त्सिमला हैड्रॉलिक सेंटरचे काम पहात.

बासार्गिन विमानातून बाहेर आले आणि त्यांनी सारायेव यांच्याशी हस्तांदोलन केले.

"मी मॉस्कोहून थेट इकडेच येतोय. चला, कुठेतरी बसूया, बोलूया. खूप बातम्या सांगायच्या आहेत."

ते बाजूला गेले. अजून उभ्या न केलेल्या, गवतावर आडव्या टाकलेल्या टेलिफोनच्या खांबावर बसले. बासार्गिनने क्रेमलिनमधल्या बैठकीबद्दल आणि प्रकल्पाच्या काळात कपात केल्याचे सांगितले.

"आता तुम्ही या सगळ्या प्रदेशावर समृद्धी निर्माण करणारी आपल्यातली सर्वात महत्त्वाची व्यक्ती आहात." वाऱ्याने थरथरणाऱ्या स्टेपभूमीकडे हात करून बासार्गिन सारायेवना म्हणाले.

"मग काय, छानच झालं!" सारायेव उत्तरले आणि त्यांनी सिगरेट काढली. उत्तेजित झाल्यामुळे त्यांचे हात थरथरत होते. सिगरेट पेटवेपर्यंत किती तरी काड्या मोडल्या.

"तू उगीच अस्वस्थ होऊ नकोस" बासार्गिननी सुचवले. "तुला आपला जुना नियम माहितच आहे. समाजवादाच्या निर्माणकर्त्यांचं मन तापलेलं पण डोकं थंड हवं!"

"हे बघ मी मन स्थिर केलं!" सारायेव उत्तरले. "आता तर मला पुरी शंभर वर्षं जगायला हवं. एखादं वर्षसुद्धा कमी चालणार नाही. तेवढं आयुष्यसुद्धा कमी पडेल, पुरणार नाही या कामाला! तुला काय वाटतं?"

"होय, खरंच पुरणार नाही." बासार्गिन हसून म्हणाले. "आपल्यापुढे कितीतरी नवे प्रकल्प पडलेले आहेत."

"तेच म्हणतोय मी! खूपच, नवे नवे!" सारायेवनी पुष्टी दिली. "वोल्गा डॉन हे काही आपलं शेवटचंच काम नाही. जग आश्चर्यानं थक्क होऊन जाईल अशी आणखी काही कामं काढा की!"

"हो, हो. काढू की!"

"हो, हो, करू की!" सारायेव खळखळून हसले. त्यांनी बासार्गिनच्या खांद्यावर

हात ठेवत म्हटले.

" ओ होऽऽ ! किती छान आहे इथं ! अगदी मोकळेपणानं जगता येतं. नाही का वान्या ? अगदी मोकळेपणानं ! बांधकामाच्या वेळात कपात केली आहे काय ? छान ! फारच छान ! मी वाटच पहात होतो असं होईल याची. माझ्याकडे एक माझी छोटी डायरी आहे. त्यात मी माझे सगळे हिशेब आणि निर्णय लिहितो. नुकताच मी हिशेब केला होता. जितका काळ माझ्या हिशेबाप्रमाणे कमी लागणार होता तेवढ्याच वेळाची त्यांनी कपात केली आहे आता. त्यासाठी काय करावे लागेल त्याचा सगळा हिशेब आहे माझ्याकडे केलेला. जादा यंत्रं आणि आणखी मनुष्यबळ."

" बराच आहेस की ! " बासार्गिन म्हणाले. " सरकारचं काम आहे त्यामुळे जे जे पाहिजे ते ते मिळेल. पण अर्थातच सध्या ज्ञात असलेल्या शास्त्रीय ज्ञानाच्या कक्षेत मिळू शकेल तेवढंच हं ! नाही तर अवाच्या सवा काही मागशील." बासार्गिननी चेष्टा केली.

" आमची सध्याची यंत्रं काही सुस्त आळशी नाहीत." सारायेव उत्तरले. ते एकदम सजग झाले आणि कान देऊन ऐकू लागले.

" काय झालं ? " बासार्गिननी चमकून विचारले.

गवतात कोणता तरी शीळ घालणारा पक्षी फडफडला.

" कोण हा गवई ? " सारायेवनी विचारले. "रोज गाणं ऐकतो त्याचं. पण दृष्टीला मात्र पडत नाही. असा आवाज घुमतो साऱ्या स्टेपभर की जणू उत्कृष्ट गवयाची तानच. चल, तुला माझ्या "रेड्याची", त्या धुडाची कामगिरी दाखवतो तुला माझ्या त्या माती खणणाऱ्या चलत् यंत्राची रे ! आता वरचेवर सल्ला मसलत केली पाहिजे तुझ्याशी. सगळ्याचा आढावा दिला पाहिजे तुला. काम लवकर आटपायचं आहे ना ? "

# २

करड्या रंगाच्या जाकिटवाल्या फाटक्या अंगाच्या इसमाने पँटच्या मागच्या खिशातून एक छोटी वही काढली आणि काटकीसारख्या बारीक पेन्सिलने काहीतरी टिपायला सुरुवात केली. डबा हालत होता, पण तो न थांबता लिहीतच होता.

" आई ! " शेजारच्या बाकावरच्या १७ वर्षांच्या मुलीने हाक दिली. काळेभोर केस तिने मागे बांधले होते. " आई ग ! "

" काय ग लेल्या ? "

" तुझ्या लक्षात आलं का ? तो सारखा काहीतरी टिपून घेतोय्. बहुधा लेखक असावा तो आई. "

" नाही. " जाकिटवाला मोठ्याने म्हणाला. " मी लेखक नाही. मी वोल्गा-डॉन कालव्यावर काम करतो आणि माझं आडनाव मुळीच लेखकांपैकी नाही. कार्पोव आडनाव आहे माझं. "

" मग तुम्ही काय टिपताय् ? " लेल्याने विचारले आणि ती अशी हसली की त्याच्यापुढे गाडीच्या डब्याच्या पिवळसर भिंतीवरचे सोनेरी ऊनसुद्धा फिक्के वाटावे.

" लेल्या ! " सावळ्या चेहऱ्याच्या पोक्त बाईने तिला हटकले. " झालंय् काय तुला ? काही तरीच काय बोलतेस ? "

" असं काय ग बोलले मी आई ? " मुलीने आश्चर्याने विचारले.

" स्वभाव ! " कार्पोवने उत्तर दिले. आणि लेल्याच्या बाकाकडे वळून पहात ते बोलले, " जे लक्षात राहावंसं वाटतं ते सारं टिपून टेवायची सवय आहे मला.

सगळ्यांना असंच करायचा सल्ला देतो मी, कॉम्रेड !"

"कल्योल्निकोवा ऽ ऽ !" कंडक्टरने पुकारा केला. कुंचा आणि ओले फडके हातात घेऊन ती डब्यातून चालली होती. "गाडी पंधरा मिनिटं थांबेल इथं !"

नंतर गाडी वेगाने जाऊ लागली. गवताळ माळ एकदम संपले. त्याच्या जागी कॉंक्रिटची खडबडीत भिंत खिडकीतून दिसू लागली. कौलारू छपरे आणि धुळीने माखलेल्या बाभळींचे शेंडे पळत होते. तेलाने तुकतुकीत दिसणाऱ्या इंजिनाच्या बाजूने गाडी पुढे पळाली. ती इंजिने दाट वाफेचे गोळे आकाशात फेकत शेजारच्या रुळांवर उभी होती. त्यानंतर मोठमोठ्या शेड्स असलेले प्लॅटफॉर्म गाडीच्या दोन्ही बाजूंनी खडखडाट करत पळू लागले.

लेल्या खिडकीतून वाकून पहात होती. समुद्रातल्या खडकांना येणाऱ्या वेगळ्याच वासाने भरलेली तप्त हवा आत घुसली.

"इथे कसा हा असला वास आला ?" लेल्याला वाटले. आणि तिने तर्क केला की प्लॅटफॉर्मवरच्या वाळूलाच तो तसला तो वास येत असावा. ह्या लालसर रंगाच्या धुरळ्याने भरलेल्या प्लॅटफॉर्मनी "काळ्या" समुद्र किनाऱ्यावरची हवा या गवताळ प्रदेशात, शेकडो मैल दूर आणून पोचवली होती.

"आई ग !" खिडकीतून आत वळत लेल्या आईला म्हणाली, "ऐक ना ! या वाळूला समुद्राचा वास येतोय बहुतेक !"

"ही वाळू नव्या कालव्यात टाकण्यासाठी आहे." आईने खुलासा केला. "ती खरोखरीच काळ्या समुद्राच्या किनाऱ्यावरून इथपर्यंत वाहून आणताहेत. आणखी एक वर्षाने खुद्द डॉन समुद्रच या वस्तीपर्यंत येईल."

"खरंच इथपर्यंत पोचणार आहे तो समुद्र ?" शंका येऊन लेल्याने विचारले.

"हो, पोचणार आहे. इथे मोठा उपसागर तयार होणार आहे. त्या तिकडे रिकाम्या पेट्यांचा ट्रक उभा आहे ना ? तिथे त्याचा किनारा असेल."

"तिथे नाही, तिथे नाही." बर्थवरून जपून खाली उतरत एक पोक्त गृहस्थ म्हणाला. त्या तिकडे, ती घळ आहे ना ? तिथे त्याचा किनारा असेल." त्या गृहस्थाच्या अंगात काळा कोट होता आणि त्यावर लाल तारे असलेले दोन बिल्ले होते.

"कुठल्या घळीत ?" लेल्याने उत्सुकतेने विचारले.

"त्या ऽ ऽ तिकडल्या घळीत वासरू चरताना दिसतंय् ना ? तिथं."

"तुम्हाला काय हो माहीत ?" वरच्या बर्थवरच्या वळवळ्या, जाड भिंगांचा चष्मा घातलेल्या भाषेच्या विद्यार्थ्याने कुत्सितपणे विचारले, "किनारा ट्रक थांबली आहे तिथे नसून वासरू चरतंय् तिथे असणार आहे हे तुम्हाला काय माहीत ?"

"ते इथल्या प्रत्येक शाळकरी मुलालासुद्धा माहीत आहे." शांतपणाने तो पोक्त गृहस्थ म्हणाला. "तुम्ही खात्री करून घ्या ना ! स्टेशनवरच्या चहाच्या स्टॉलवर जा

आणि जाता जाता कुठल्याही पोराला विचारा. ते तुम्हाला सगळं नीट समजावून सांगेल."

"विचारीनच!" धमकावणीच्या सुरात विद्यार्थ्याने उत्तर दिले.

गाडी थांबली. पोक्त माणसाने आपली धुळीने भरलेली बॅग आणि ताडपत्रीचा रेनकोट घेतला आणि सगळ्यांचा निरोप घेऊन तो दाराकडे गेला.

"हे बघा," लेल्या चष्मेवाल्या विद्यार्थ्याला म्हणाली. "खरंच जाऊ या स्टेशन-वर आणि भेटणाऱ्या पहिल्याच मुलाला विचारू या. चालेल?"

"ठीक आहे!" विद्यार्थ्याने उत्तर दिले आणि धडपडत बर्थवरून खाली उडी मारली.

ते प्लॅटफॉर्मवर आले. स्टेशन, ती वस्ती आणि आसमंतातला स्टेप प्रदेश गरम गरम हवेने वेढला होता.

प्लॅटफॉर्मवर एकही मुलगा नव्हता. लेल्या त्या विद्यार्थ्याला घेऊन मुलांना शोधण्या-साठी जवळच्या चौकात गेली.

चौकाच्या मध्यभागी असलेल्या बागेत खूप जुनाट बाभळी होत्या. त्यांचा बहार आता संपला होता. फांद्यांवर मोठाल्या शेंगा लोंबत होत्या. बाभळींच्या शेजारी एक लाकडी पिरॅमिड मखमली फुलांमधून डोकावत होता. त्यावर लिहिलेले होते: "आक्रमक फॅसिस्टांबरोबरच्या रणकंदनात कामी आलेल्या आपल्या मातृभूमीच्या शूर सुपुत्रांना चिरंतन कीर्ती लाभो!"

त्या पिरॅमिडपासून जवळच दोन मुले पाण्याच्या नळातून कारंजासारखे उडणारे पाणी पीत होती. त्यांची तोंडे आणि सदरे भिजून चिंब झाले होते.

"ए पोरांनो!" विद्यार्थी त्यांना म्हणाला. "तुम्हाला माहीत आहे का रे नवा डॉन समुद्र कुठपर्यंत येणार आहे ते?"

पाणी प्यायचे थांबवून घाबरून ती मुले लेल्या व तो विद्यार्थी यांच्याकडे पाहू लागली नंतर त्यातल्या मोठ्या मुलाने सदऱ्याला तोंड पुसले आणि तो धाकट्या मुलाला म्हणाला.

"घाबरू नकोस रे तारास! हे तर अभिनेते आहेत. अहो; आम्हाला माहीत आहे कुठपर्यंत समुद्र येणार आहे ते. पण इथून दिसत नाही ते ठिकाण. स्टेशन आड येतंय. ते रस्त्यावरचं दुकान आहे ना, त्याच्या मागे एक घळ आहे. तिच्यात एक रानटी ग्रुशाचं झाड आहे. आम्ही मागेच सगळं मोजून ठेवलेलं आहे. पाणी थेट त्या ग्रुशाच्या झाडापर्यंत येणार आहे."

"हे "आम्ही" कोण?" लेल्याने विचारले.

"शाळेतले आमचे सगळे मित्र."

"पाहिलंत? अगदी वासरू चरतंय तिथंच ते ग्रुशाचं झाड आहे. ते वासरू

म्रुशाच्या झाडालाच बांधलेलं आहे. ”

“ त्याला काही किंमत नाही. ” विद्यार्थी चिडून म्हणाला.

मुलाने खिशातून एक रेघांचा कागद बाहेर काढला. बहुधा तो वहीचा फाडलेला असावा.

“ इकडे पहा. याच्यात सगळं दाखवलेलं आहे. ”

त्या पानावर कार्बन पेन्सिलने काढलेला लंब्याचौड्या उपसागराचा ओबड धोबड नकाशा होता. त्या उपसागराला फक्त एकच किनारा नव्हता, तर बरेच किनारे होते. ते सगळे किनारे एका सलग रेषेने दाखवलेले होते. पुढे जात जात ती रेषा स्टेपप्रदेशाच्या मध्यापर्यंत पोचलेली होती. आणि तिथे एक लहानसा चौकोन काढून त्यात लिहिले होते. “ कत्योल्निकोये ” त्या चौकोनाजवळचा शेवटचा किनारा निळ्या तेल्या रंगाच्या खडूने रंगवला होता.

ते चित्र नेटके नव्हते. जिथे कार्बन पेन्सिलला थुंकी लावून रेघ काढली होती तिथे ती ठळक होती, फुटली होती; आणि दुसरीकडच्या रेघा अगदीच बारीक न दिसणाऱ्या होत्या.

“रेघोट्या आहेत नुसत्या ! ” विद्यार्थी म्हणाला. “ लेल्या, ऐक. घंटा झाली गाडीची. आपल्याला इथेच राह्यचं नाही. ”

“ अजून गाडी दहा मिनिटे तरी थांबेल. ” मुलाने त्याला शांत केले. “ या रेघोट्या नाहीत. नकाशा आहे हा. याच्यात सगळं दाखवलं आहे. ज्या दिवशी त्सिमलात धरण खुलं करतील आणि पाणी वाढायला लागेल त्या दिवसापर्यंत सगळं तारीखवार दाखवलेलं आहे यात. पहिल्या दिवशी पाणी इथे येईल. हे पहा. ” मुलाने किनाऱ्याची पहिली रेघ दाखवली. “ दुसऱ्या दिवशी ते दुसऱ्या पट्ट्यापर्यंत येईल. आणि निळा किनारा—तो शेवटचा, कायमचा. ”

“ झकास ! ” लेल्या म्हणाली. “ तू स्वतःच हे ठरवलंस ? ” “ नाही. ” मुलाने उत्तर दिले. “ सुस्लिकनं माझ्यासाठी केलंन् हे सारं. सबंध दिवसभर स्वतःच्या झोपडी जवळ बसून होता. आणि विचार करत होता, ही झोपडी बुडणार की नाही ? आणि मग हा नकाशा काढायचा ठरवलंन्. रात्री-अपरात्री पाण्याने वेढायला नको झोपडी ! ”

“ म्हणजे ? तू नुसता बडबड्याच दिसतोस ? ” लेल्या म्हणाली.

“ तसं नाही काही ! ” मुलगा तोंड भरून हसला. “ मी बडबड्या नाही नुसता. फक्त माझ्यावर कुणी विश्वास ठेवत नाही. शपथ, मी कधी खोटं बोलत नाही.

“ स्त्योपका कधी खोटं बोलत नाही.” धाकटा मुलगा घोगऱ्या आवाजात बोलला. “ तो तसा नाही. प्रकल्प प्रमुख बासार्गिनना त्याने पत्र लिहिलं आहे, डॉन समुद्रात पाणी केव्हा सोडणार आहात त्याची नक्की तारीख आम्हाला कळवा म्हणून. ”

" तुम्हाला कशाला ही माहिती पाहिजे ? "

" म्हणजे काय ? आत्तापासून आम्ही पाण्यावर लक्ष ठेवू. किनाऱ्यावर कडेने तरंगत्या खुणा लावायला हव्यात. आणि हे आपले तिकडे सिमलामध्ये वेळकाढूपणा करताहेत. "

' वेळकाढूपणा करताहेत ? म्हणजे काय ? " विद्यार्थी एकदम उसळून म्हणाला. " अजून जमिनीतून पुरता वरही निघाला नाही आणि लागला आपला टीका करायला ! "

" वेळकाढूपणाच करताहेत ! " तो मुलगा आत्मविश्वासाने म्हणाला. " म्हणे अजून एक वर्ष थांबा ! बरोबर आहे का हे ? "

" जाऊ दे रे ! एक वर्ष केव्हाच निघून जाईल. " लेल्या सहजपणे म्हणाली आणि तिने एकदम विद्यार्थ्याची बाही पकडली. प्लॅटफॉर्मवर दुसरी घंटा वाजत होती.

" चला लौकर ! आभारी आहोत मुलांनो ! "

लेल्या आणि तो विद्यार्थी थंड, हिरवट रंगाच्या वेटिंग रूममधून पळत पळत प्लॅटफॉर्मवर आले आणि त्यांनी कशीतरी डब्यात उडी मारली, तेवढ्यात गाडी हलली.

आरक्त चेहऱ्याची, उल्हासित झालेली लेल्या हळूच कंपार्टमेंटमधे शिरली. फुटणारे हसू दाबून धरल्याने थरथरणाऱ्या ओठांकडे आणि अधिकच गडद दिसणाऱ्या लेल्यांच्या डोळ्यांकडे आईचे लक्ष गेले. आईने नुसतीच मान डोलावली आणि हा शुद्ध मूर्खपणा आहे, असं करणं धोक्याचं आहे, तुला आता सतरावं वर्ष आहे, तू मोठी झालीस. आता तू वेड्यासारखी पळत येते आहेस म्हणून गाडी काही तुझ्यासाठी थांबणार नाही वगैरे बोलावेसे वाटणारे शब्द न बोलता ती गपच राहिली.

सगळेच प्रवासी, तसेच नतालिया पेत्रोवना आनंदात होते. गाडी स्टालिनग्राड-कडून नोवोरोसिइस्ककडे चालली होती. सगळ्यांना माहीत होते, की काही रेल्वेमार्ग प्रवाशांची मनोवृत्ती उल्हासित करणारेच असतात. खास करून काळ्या समुद्राकडे जाणारे रेल्वेमार्ग तसे असतात. तिथे भिंतीवर दाट झाडांच्या सावल्या असतात, मोठ्या बोटींचे भोंगे वाफेच्या इंजिनांच्या आवाजाला गिळून टाकत असतात.

नतालिया पेत्रोवना गालागिन या लेल्याला बरोबर घेऊन सारातोवहून नोवोरोसिइ-स्कला चालल्या होत्या. आणि तिथून पुढे कॉकेशस पर्वतामधून लहानशा वस्तीवर जाणार होत्या.

लेल्याला नुकतीच उन्हाळ्याची सुट्टी लागली होती. तिच्या सुट्टीला जोडून नतालिया पेत्रोवनांनी आपली रजा घेतली होती.

प्रथम त्यांनी तागानरोगजवळच्या पेत्रोशिन भुशिरावरच्या कोळ्यांच्या सामुदायिक शेतावरच्या स्वतःच्या घरी विश्रांती घ्यायची ठरवले होते. तिथे त्यांचे वडील आपल्या उर्वरित आयुष्याचा काळ कंठत होते. प्योत्र सोफ्रोनोविच हे पहिले कोळी. आता थकले

होते. पण त्यांच्याकडे जाण्याऐवजी इन्स्टिटयूटमधे बरोबर शिकणाऱ्या मैत्रिणीने आपल्या कॉकेशस पर्वतातरच्या वस्तीवर बोलावले म्हणून नतालिया पेत्रोवनांनी यंदा काळ्या समुद्रावर आणि पुढच्या वर्षी वडिलांकडे जायचे ठरवले. शिवाय रजा संपल्यावर नतालिया पेत्रोवनांना लेल्यासह नोकरीच्या ठिकाणी—नव्या डॉन समुद्रावरच्या त्सिमला गावी हजर व्हायचे होते. तिथे नतालिया पेत्रोवनांना "हवामानाची माहिती देण्याचे केंद्र" सुरू करायचे होते. आणि नव्या समुद्राच्या निर्मितीमुळे हवामानात घडणाऱ्या अटळ बदलांच्या अभ्यासासाठी सारी तयारी करायची होती.

लेल्याकडे पहाताना त्यांच्या मनात विचार आला, "कुणासारखी झालीय ही ? बंडखोर, पण तरीही प्रेमळ आणि आनंदी ! हिचे आजोबा गरीब स्वभावाचे. आजी सुद्धा फार शांत, अबोल होती म्हणतात." नतालिया पेत्रोवनांना स्वतःची आई जवळ जवळ आठवतच नव्हती. ती त्यांच्या लहानपणीच वारली. भूगर्भशास्त्रज्ञ असलेले लेल्याचे वडील लेल्या तीन वर्षांची असतानाच १९३८ सालच्या बैकालच्या मोहिमेत वारले. ते आनंदी पण थंड, शांत स्वभावाचे होते.

लेल्या कुणावर गेलीय याचा विचार करताना नतालिया पेत्रोवना स्वतःला मात्र विचारात घ्यायला विसरल्या होता. नेहमी असंच होतं. लेल्या त्यांच्यावरच गेली होती —पण आताच्या ४० वर्षांच्या नतालिया पेत्रोवनांसारखी नाही, तर चपळ, सगळं जाणून घ्यायची उत्सुकता असलेल्या या मुलीसारखी, लहानगी नतालिया होती तशी !

वडलांनीच त्यांना वाढविले. लहान वयातच ती सगळे घरचे काम करू लागली. चिंध्या झालेले रशियन परिकथांचे पुस्तक हाच तिचा बराच काळचा एकमेव आनंदाचा ठेवा होता.

तगानरोगमधले वयस्क, निवृत्त भूगोल शिक्षक निकोलाय पेत्रोविच लिपेत्सकीय यांनीच नतालिया पेत्रोवनांना—तेव्हाच्या नताल्काला वाचायला शिकवले. गरिबीमुळे त्यांना उन्हाळ्याच्या सुटीत कारान्तिनमधल्या वसंत धामामध्ये जाता यायचे नाही. म्हणून ते शरदऋतूपर्यंत तिच्या वडिलांच्या घरातच ५ रु भाड्याने एक स्वच्छ लहानशी खोली घेत.

निकोलाय पेत्रोविच सगळ्या प्रकारच्या आश्चर्यजनक वस्तु स्वतःबरोबर घेऊन येत असत. जुनी गंजलेली दुर्बिण, जवळ जवळ सर्व प्राण्यांची, झाडांची चित्रे असलेले जाडजुड पुस्तक. आझोव समुद्राचा मोठा, सुंदर नकाशा त्यात असे. त्यातला समुद्राचा रंग फारच गडद होता. उजव्या कोपऱ्यात वाळूच्या किनाऱ्याच्या पिवळ्या पट्टयावर तपकिरी रंगाच्या लहानशा वर्तुळाने पेत्रोशिन भूशिरसुद्धा दाखवलेले होते.

निकोलाय पेत्रोविचनी आल्याबरोबर नताल्काच्या मदतीने अंगणात एका खांबावर वातकुक्कुट बसवला. भिंतीवर सावलीत थर्मामीटर आणि बॅरोमीटर टांगला. मनोरंजक

आणि कुतूहलपूर्ण जीवनाला सुरवात झाली.

दिवसातून बऱ्याचवेळा निकोलाय पेत्रोविच कुठून आणि किती जोराने वारे वाहत आहेत याची वहीत नोंद करायचे. ( आणि आझोव समुद्रावर तर पुष्कळच प्रकारचे वारे होते. ) आकाशात कोणते ढग रेंगाळताहेत, कोणत्या ढगांच्या सावल्या समुद्रावर पसरत पळताहेत, ऊन फार कडक आहे का, किनाऱ्याजवळून माशांचे थवे जात आहेत का, किती खोलीवरून जाताहेत, कुरणात कोणते गवत फुललेले आहेत, दरीत गाणारे पक्षी कोणते आहेत, सकाळी धुकं पडलं होतं का, रात्री दव पडले होते का, याचीही नोंद ते करायचे. निकोलाय पेत्रोविच निरनिराळ्या प्रकारचे गवत गोळा करायचे आणि पुस्तकात ठेवून वाळवायचे. नताल्का त्यांच्याबरोबर गवताचे नमुने गोळा करायसाठी हिंडायची.

निकोलाय पेत्रोविचला ती आपली सगळी सुखदुःखे आणि कल्पना सांगायची. ते वडिलांसारखे कधीच रागवायचे नाहीत. तू दांडगी, बडबडी आहेस असे म्हणायचे नाहीत, तर फक्त तिच्या फुललेल्या चेहऱ्याकडे आवेगाने पाहून मंद हसायचे.

जेव्हा निकोलाय पेत्रोविच वहीत आपला आवडता शब्द लिहायचे "नीरव शांतता!" तेव्हा दिवस लहान झालेले असायचे.

"नीरव शांतता!" कसा असायचा तो दिवस? निळसर धुक्यातून तो सोनेरी फुलासारखा उमलायचा. आणि संध्याकाळपर्यंत नीरव शांततेत फुलतच राहायचा. अगदी हलक्या लाटांच्या मंद लयीनेसुद्धा नाचायला समुद्र घाबरायचा. फक्त तळा-तल्या गवतांच्या काड्या पृष्ठभागावर आणून हळूच श्वास घ्यायचा. बोटीच्या चिमणी-तला धूर दूर क्षितिजापलीकडे एखाद्या उंच खांबासारखा उभा असायचा. पण प्रत्यक्ष बोट मात्र दिसायची नाही. मंद आवाज कुरणावर झरत होता. जणू काही तो सगळा नितळ, गोड प्रकाशचं रुणझुणत होता! का लावी आणि सुतार पक्ष्याचा मधुर आवाज होता तो? की हवेतली ऊबच किणकिणत होती? कुणाला माहीत!

निकोलाय पेत्रोविच लिपेत्सकीय गुरुजींना नताल्का विचारायची—हवेतला आणि पाण्यावरचा प्रत्येक फरक ते वहीत कशासाठी टिपून ठेवतात? कशाला पाहिजे त्यांना हे सगळं? लिपेत्सकीय गुरुजी तिला समजावून सांगायचे, या सगळ्याला हवामान म्हणतात. हवामानाचा अभ्यास करणे जरूर आहे. कारण केव्हा ना केव्हा अशी वेळ येईल की जमीन फुलवण्यासाठी आवश्यक असे हवामान माणसे स्वतः निर्माण करतील. त्यावेळी कदाचित् त्यांची ही छोटी वही शास्त्रज्ञांना उपयोगी पडेल. "जमीन फुलवणे" म्हणजे काय असे लिपेत्सकीय गुरुजींना विचारावे असे नताल्काला फार वाटायचे. पण तिला धीर होत नसे. तिला वाटायचे जमीन फुलवणे म्हणजे तऱ्हेतऱ्हेच्या फुलांच्या दाट ताटव्यांनी जमीन झाकून टाकणे. शेजारच्या गार्पिना मावशीच्या बागेत आहेत तशा फक्त पतुंल्का आणि भरगच्च पातिच फुलांनीच नाही, तर लिलॅक आणि

गुलाबांची सुद्धा फुले त्यात हवीत. तगानरोगच्या बागेत तिने लिलॅक आणि गुलाबाची फुले पाहिली होती तेव्हा ती अशी काही आनंदाने चित्कारली होती! आणि चकित होऊन आ करून किती वेळ तिथे उभी होती कुणास ठाऊक!

नताल्का मोठी झाल्यावर लिपेत्सकीय गुरूजींनी तिला तगानरोगच्या शाळेत घातले. हिवाळ्यात तिच्या गावाहून शाळेत येणे अशक्य व्हायचे म्हणून ती लिपेत्सकीय गुरुजींच्या घरीच राहायला आली. तेव्हा ते वृद्ध शिक्षक गमतीने म्हणाले, माझ्या अंधाऱ्या खोलीत जणू लहानगं सूर्यफूलच उमललंय! नताल्काच्या वडिलांनी त्यांचे इतक्या वेळा आभार मानले की शेवटी गुरुजी इतके रागावले की जळफळाट करून नताल्काच्या वडिलांना हाकलून लावायचेच बाकी राहिले. मोठ्या प्रयासाने ते गोड भांडण मिटले.

नताल्का चवथीत असतानाच लिपेत्सकीय गुरुजी वारले. नंतर असे कळले, की नताल्काचे शाळेचे शिक्षण पूर्ण व्हावे म्हणून लिपेत्सकीय गुरुजींनी आपली सगळी लहानशी पुंजी नताल्काच्या वडिलांच्या नावाने केली होती.



नतालिया पेत्रोवना आठवणीतून दचकून जाग्या झाल्या आणि कार्पोव त्या विद्यार्थ्यांशी काय बोलत होते ते ऐकू लागल्या.

" मी थोड्या दिवसांसाठी नोवोरोसिइस्कला चाललो आहे. तिथल्या स्थानिक कारखान्यात काळव्यावरच्या काही कामांसाठी नवे नमुने बनवायचे आहेत त्याबद्दल चर्चा करायला.

" कसले नमुने ? " लेल्याने विचारले.

तो विद्यार्थी कुत्सितपणाने खाकरला. पण कापोवनी शांतपणे उत्तर दिले,

" सिमेंटचा नवा प्रकार. उत्तम दर्जाचं सिमेंट. मुलांनो, सिमेंटच्या शोधाने मानवाच्या आयुष्यात विजेच्या शोधापेक्षा काही कमी महत्त्वाचं काम केलं नाही! आपल्या बांधकामांमध्ये सिमेंट आणि वीज यावर सगळं अवलंबून आहे. ती महत्त्वाची शक्ती आहे."

" तुमचं म्हणणं बरोबर आहे असं आपण गृहीत धरू " जरा नरमाईने तो विद्यार्थी बोलला. त्याचे वयच असे होते की जेव्हा प्रत्येक गोष्टीबद्दलच शंका कुशंका अगदी दोन आणि दोन चारच का अशीसुद्धा शंका यावी. " धरून चालू की तुमचं म्हणणं बरोबर आहे " असे पुन्हा म्हणून हल्ला करण्याच्या पवित्र्याने तो जाड चष्म्यातून पहात म्हणाला. " पण अशा दोन वेगवेगळ्या जातींच्या वस्तूंची म्हणजे सिमेंट आणि वीज यासारख्या गोष्टींची तुलना करणं हे..."

त्याचे बोलणे पुरे होण्याच्या आतच लेल्या उतावळेपणाने म्हणाली, " तुम्ही कॉम्रेड

कार्पोववर उगीचच का चिडता? कुणालाच ते बरं वाटत नाही."

" तुमच्या मताने कोणतं बोलणं बरं असतं?" उघड उघड छिद्रान्वेषी बुद्धीने विद्यार्थ्याने लेल्याला विचारले.

" मला कालव्याबद्दल जाणून घेण्यात जास्त रस आहे."

" मग विचारा."

" भांडणं करण्यात तुमचा काय हेतू आहे?" कार्पोव म्हणाले.

" बांधकामाबद्दल असं कुठं वर्णन करून सांगता येतं का? ते स्वतः जाऊनच पाहिलं पाहिजे! स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलं पाहिजे." विद्यार्थी म्हणाला.

" पण तरीही, तुम्हाला सर्वांत महत्त्वाचं काय वाटतं?"

लेल्याने आर्जवी सुरात विचारले.

" सगळंच!" कार्पोवनी उत्तर दिले. " सगळंच मनोवेधक आहे. सगळं महत्त्वाचं आहे. आणि सगळंच विलक्षण आहे. अर्थातच सर्वांत प्रथम " माणूस " माझं लक्ष वेधून घेतो. आणि त्यांच्या सहकार्यानेच मी काम करतो.

" कोणत्या विभागात काम करता ते आम्हाला कळेल का?" खोट्या विनयाने विद्यार्थ्याने विचारले.

" ते तुम्हाला कल्पनेनं जाणणं अवघड नाहीं. विशेषतः तुमच्यासारख्या दुर्मीळ बहुश्रुत माणसाला."

" तुम्ही पक्ष कार्यकर्ते आहात?"

" हं, असेनही."

कार्पोव क्षणभर थांबले. त्यांनी खिडकीतून बाहेर नजर टाकली. तिथून गरम, डिंकासारखी चिकट हवा आत आली. कार्पोवनी दीर्घ श्वास घेतला आणि ते बोलू लागले.

" पाण्याचं टिपूसही नसलेलं नदीचं कोरडं खोल पात्र डोळ्यांपुढे आणा. अजून कोरडी असलेली ही नदी स्टेपप्रदेशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरली आहे अशी कल्पना करा. तिच्या किनाऱ्यावरची जमीन तडकली आहे. त्या भेगांमधून तारांसारखं काटेरी गवत उगवलं आहे. उन्हानं ते गवत वाळून गेलं आहे. इतकं की बोटांनी चुरलं तर भुगा होतोय त्याचा हे सगळं पाण्याची वाट पाहतं आहे. जमीन, गवत, धगीनं करपून जाऊन चमत्कारिक करड्या रंगाचं दिसणारं आकाशसुद्धा. ज्या ठिकाणी कोरडा धुराळा आणि काळीकुट्ट वादळं राज्य करत आहेत, तिथं आता हे मानवनिर्मित धुळीचं वादळ शेवटचंच ठरणार आहे. हजारो यंत्रं जमीन फोडताहेत. माती उकरताहेत आणि आभाळापर्यंत धुराळा उडतोय. हे सारं या शापित स्टेपप्रदेशाला मोठ्या कष्टाने वर आणण्यासाठी! इथल्या भूमीवरील कल्पनातीत भयाण शांततेशी मुकाबला करण्यासाठी! या भूमीत खोल खोल खणण्यासाठी केवढं शौर्य,

केवढा भवितव्यावरचा विश्वास, केवढी जबरदस्त इच्छाशक्ती हवी!"

"हेसुद्धा तुमच्या त्या वहीतच लिहिलेलं आहे का?"

"छे हो! हे मी आपलं असंच बोललो..." कार्पोवनी उडतं उत्तर दिलं. "त्यात मी फक्त आकडे आणि घटना लिहितो."

कार्पोवनी वही उघडली आणि ते तिची पाने चाळू लागले.

"हे पहा एक उदाहरण. तुम्हाला सगळीकडे घोषणेच्या पताका आणि फलक लिहिलेले दिसतील. "कम्युनिझमची उभारणी हे जनतेचे कार्य आहे!" अर्थातच हे बरोबरच आहे. पण ती फक्त एक घोषणा झाली. पण जेव्हा मी फावल्या वेळात या कामावर सबंध सोव्हिएट युनियनमधून कोणकोणत्या गावातले आणि कारखान्यामधले लोक या कालव्यावर प्रत्यक्ष काम करताहेत आणि अप्रत्यक्षपणे मदत करताहेत याची यादी करू लागलो तेव्हा जवळ जवळ तीनशे गावं आणि कारखान्यांची नोंद झाली तरी ती संपेना. म्हणून मग मी सोडूनच दिलं यादी करणं. त्यांची यादी करणंच अशक्य आहे—मुरमान्स्क व स्वेर्दलोवपासून ओडेसा-बाकूपर्यंत आणि ताश्कंद—नोवोरोसिइस्कपासून लेनिनग्राड आणि पिटुकल्या झुग्दिदीपर्यंत. तिथल्या शाळेतल्या मुलांनी कालव्याच्या काठावर लावण्यासाठी कॉकेशसमधल्या ओकचं, बाभळीचं आणि पिवळ्या द्रोक फुलांचं बी पाठवलंय."

"फारच छान!" उत्साहाने तो विद्यार्थी म्हणाला. पण लगेच स्वतःला सावरून सुरात बोचरेपणा आणून पुढे म्हणाला, "झुग्दिदीजवळ ओक वृक्ष वाढत नाहीत तरीही."

कार्पोवनी विद्यार्थ्याच्या खांद्यावर हलकेच थोपटल्यासारखे केले. विद्यार्थ्याने कार्पोवकडे पाहिले. तो लाजेने लाल झाला आणि ओशाळवाणे हसला.

लेल्या संतापली होती. पण तिने मन आवरले. ती त्या वळवळ्या, नकोशा वाटणाऱ्या तरुणाला काहीच बोलली नाही, पण नंतर खालच्या आवाजात आईजवळ कुरकुर करत राहिली.

"बघ कसा दिड शहाणा आहे. असली दीड शहाणी मुलं मला बिलकूल आवडत नाहीत!"

लवकरच डब्यातले सगळेजण गप्प झाले. बरेचसे उकाड्यामुळे पेंगुळले. नतालिया पेत्रोवना आणि कार्पोवही पेंगुळले. शेवटी तो "दीड शहाणा" मुलगाही शांत झाला.

एकटी लेल्या वरच्या बर्थवर पडून स्टेपकडे, पळणाऱ्या खारींकडे, अंधाराकडे आणि रुळांच्या जवळून जाणाऱ्या रस्त्यावरून काही झाले तरी गाडीच्या मागे पडू नये म्हणून धडपडणाऱ्या ट्रककडे एकटक पाहात होती.

थडथडणारे चाक घट्ट धरलेल्या तरुण ड्रायव्हरचा निश्चयी चेहरा तिला दिसत होता. ती त्याच्याकडे पाहून हसली आणि तिने त्याला हात केला. चाकावरचा उजवा हात न काढता तो बाहेर वाकला आणि आगगाडीच्या दिशेने त्यानेही हात हलवायला सुरुवात केली. पण त्याच्या गाडीचा वेग मंदावू लागला, तो मागे पडू लागला. आगगाडी धुळीच्या दाट धुक्यात दिसेनाशी झाली. त्याने प्लग पहाण्यासाठी गाडी थांबवली. गाडीच्या खिडकीतला त्या मुलीचा हसरा चेहरा आठवून स्वतःशीच बराच वेळ हसत राहिला.

नंतर त्याचा चेहेरा एकदम रागाने लाल झाला. धाडकन बॉनेट बंद करून त्यावर त्याने रागाने बुक्क्या मारल्या. सीटवर बसून त्याने गाडी इतक्या जोराने सुरू केली की त्या गाडीला असला वेग स्टेपप्रदेशातल्या सरकारी शेतावरच्या सबंध हयातीत कधी माहीत झाला नव्हता.

त्याने विचार केला, इथून झिमोवनिका स्टेशनपर्यंतचे अंतर फक्त ५ किलोमीटर आहे आणि ही स्तालिनग्राड नोवोरोसिनेस्क पॅसेंजर झिमोवनिका स्टेशनवर २० मिनिटे थांबते. हा दुष्ट प्लग अडला नसता तर स्टेशनवर गाडीला गाठता आले असते. डब्याच्या जवळून गेलो असतो आणि त्या हसऱ्या पोरीकडे पाहून जुनी ओळख असल्यासारखे पुन्हा एकदा हसता आले असते. या विचारानेच त्याने गाडी एवढ्या वेगाने दामटली.

" काही झालं नव्हतं लेकाला ! आता कसा आपोआप सुरळीत चालू लागलाय !" ड्रायव्हर पुटपुटला. त्याने गाडी इतक्या जोराने मारली, की खळग्यांमधून जाताना तो टपापर्यंत उंच उडत होता.

पण झिमोवनिकामधे तो गाडीला गाठू शकला नाही. तिथे थांबून त्याने संशयित नजरेने न्याहाळत ट्रकभोवती एक चक्कर मारली. टंच हवा भरलेल्या टायरवर त्याने जीव खाऊन बुटाची लाथ मारली त्याने आणि म्हणाला,

" मला वाटलं नव्हतं बुढ्या, मला कधी असा दगा देशील म्हणून ! मी मात्र तुझी अजून पोटच्या पोरासारखी काळजी घेतो आहे. "

ड्रायव्हरने खिशातून चुरगळलेले वोल्ना ( लाट ) सिगारेटचे पाकीट काढले आणि राग शांत करण्यासाठी सिगारेट ओढायला सुरुवात केली.

लेल्या अजूनही वरच्या बर्थवरच पहुडली होती आणि बाहेर पहात होती.

लांब कुरणामधे करड्या रंगाचा अक्राळ विक्राळ ढग वर उठला.

" छाऽन ! " लेल्या दीर्घ श्वास घेत म्हणाली, " पाऊस येणार असं दिसतंय ! "

काळा ढग भराभरा मोठा होत गेला, फुगीर दिसायला लागला आणि त्याने सूर्य झाकून टाकला. त्याचा रंग गढूळ पिवळा दिसू लागला.

" चला, तोंडं बिंड धुवावं " असा विचार करून लेल्यानं बर्थवरून उडी मारली.

तिने टॉवेल घेण्यासाठी हात लांब केलान् तोच खिडकीतून आत येणारी धूळ डोळ्यांत गेली.

काचेवर वाळू तडातडा आपटत होती आणि छताचे व्हेंटिलेटर्स करकरत कण्हत होते.

" खिडक्या बंद करा " एका घट्ट बसलेल्या खिडकीच्या दाराशी झटापट करत डब्याची कंडक्टर ओरडली. बाहेर धुळीचे वादळ गुरगुरत होते. या धुळीबरोबर आणि वाळूबरोबर गाडीही जमिनीवरून उडते की काय असे वाटत होते.

बर्थवरचे प्रवासी घाबरून जागे झाले आणि खाली उडी टाकून काय झाले म्हणून विचारू लागले.

त्या पिवळ्या अंधारात मधून मधून मातीचे काळे स्तंभ उठत होते. गाडीला वेढून टाकून ते तिरके पळत होते. गाडीच्या भिंतीतून त्यांचा जोरदार आवाज आत घुसत होता. पक्ष्यांची पिसे, मातीची ढेकळे, मेलेले उंदीर वर फेकत ते धुळीचे स्तंभ धावत होते.

एका स्तंभाने त्या डब्यावर हल्ला केला. काचा खडखडल्या. धुळीचे मोठेमोठे झोत गाडीच्या सगळ्या फटींमधून आणि व्हेंटिलेटरमधून आत घुसले. गाडीने लक्षात येण्याइतका वेग वाढवला. गाडी फारच करकरत होती. सगळे रूळ वाळूच्या थराने भरले असावेत.

धुळीचे वादळ जसे अनपेक्षितपणे आले तसेच ते अचानक नाहीसे झाले. तरीही नंतर कितीतरी वेळ बोचरा अंधार हवेत दाटलेला होता. घशात जळजळत होते, कानशिलाच्या शिरा उडत होत्या, घशाला कोरड पडली होती. सगळे उतारू सारखा कोरा चहा पीत होते. कॉकेशसमधल्या त्या उतारूजवळ एक मोठे लिंबू होते. त्याचा सर्वांना थोडा हेवाच वाटत होता.

गाडी क्रोस्नोदारवरून पहाटेला गेली. लेल्या झोपलेली होती. त्यामुळे तिला स्टेप-मधला सूर्योदय दिसला नाही. दूरच्या कुबान स्टेशनवरच्या काचेच्या खिडक्या कशा झगमगत होत्या हेही तिला पाहायला मिळाले नाही.

नतालिया पेत्रोवना क्रास्नोदार स्टेशन येण्याअगोदर बराच वेळ आधी जाग्या झाल्या. लेल्याला उठवावे की नाही याबद्दल मात्र त्यांचा निश्चय होईना. लेल्या इतकी शांत झोपली होती आणि तिच्या पापण्यांवर इतकी सुंदर स्वप्ने दाटली होती की त्यांनी लेकीला न उठवायचाच निर्णय घेतला.

पहाट निरभ्र आणि थंड होती. कझाक बायांनी गाडीने नेण्यासाठी आणलेल्या प्रोस्तोकवाशच्या मातीच्या घड्यांवर दवाचे थेंब जमलेले होते. टोमॅटोच्या पानांचा वास येत होता. सकाळ होऊनही चंद्राची कोर आकाशात तरंगत होती. या दृश्यामुळे मन ताजेतवाने आणि प्रसन्न होत होते.

नोवोरोसिइस्क येण्यापूर्वी तासभर आधी नतालिया पेत्रोवनांनी निश्चय करून लेल्याला उठवले.

खडखडाट करत बोगद्याबाहेर येत गाडीने पिवळे डोंगर पार केले. एकदम अफाट

विस्तार आणि गहिरी निळाई यांनी डोळ्यांत भरणारा समुद्र दिसू लागला. त्याबरोबर लेल्या खिडकीकडे पळाली. आनंदाने चित्कारत तिने आईकडे पाहिले तेव्हा नतालिया पेत्रोवनांच्या डोळ्यात तिला अनपेक्षित अश्रु दिसले. धुक्याने आच्छादलेल्या समुद्राचा विस्तार निळ्या ढगासारखा वाढतच गेलेला दिसत होता. समुद्राच्या निळाईवर नाजूक सुवर्णरंगी गुलाबी ढग उतरले होते. जणू काही लेल्याने नुकताच पाहिलेला परिकथेतला देशच तिथे झगमगत होता.

नतालिया पेत्रोवनांनी उदासमधुर आनंदाने लेल्याकडे पाहिले. समुद्राच्या अद्वितीय सुंदर दर्शनाने भांबावलेली लेल्या किती सुरेख दिसत होती!

नतालिया पेत्रोवनाच फक्त लेल्याच्या सौंदर्याचा आस्वाद घेत नव्हत्या, तर कार्पोव आणि मध्यम उंचीचा, रापल्यामुळे ताम्रवर्णी झालेल्या तरतरीत चेहऱ्याचा खलाशी नॅव्हिगेटर रुमाराही तिच्याकडे कौतुकाने पहात होते. त्याने माफक हसून लेल्याकडे पाहिले. जणू काही आपल्या या समुद्राने त्या तरुण जिवाला इतका आनंद दिला याचा त्याला अभिमान वाटत होता.

तिने दाखवलेल्या लाजऱ्याबुजऱ्या उत्साहामुळे त्याला कृतज्ञता वाटत होती. काही काळाच्या विरहानंतर ज्यावेळी त्याला आपल्या या समुद्राचे दर्शन होई त्या प्रत्येक वेळी त्याला असाच आनंद होई. नोवोरोसिइस्क स्टेशनवर सर्वात प्रथम तो खलाशी खाली उतरला. त्याने स्टेशनच्या चौकात फुलाचा गुच्छ विकत घेतला आणि जो पहिलाच मुलगा भेटला त्याच्या जवळ गुच्छ देऊन तो लेल्याकडे पाठवला. कुणी गुच्छ दिला आहे हे न सांगण्याबद्दल त्याला बजावून सांगितले.

यावेळी लेल्या नतालिया पेत्रोवनाबरोबर बसची वाट पहात बाकावर बसली होती.

मुलाने खलाशाकडे बोलक्या समजदार नजरेने पाहिले आणि जणू आश्वासनच दिले की जसं पाहिजे तसंच सगळं घडेल. रुमारा एका लहानशा केशकर्तनालयात शिरला. न्हावी वस्तरा साफ करत होता तोवर तो टक लावून खिडकीतून बाहेर पहात होता.

मुलगा अगदी सहजपणे लेल्याजवळ आला आणि त्याने गुच्छ पुढे केला. लेल्याने संभ्रमित मनाने गुच्छ घेतला, खाली झुकून त्याचा वास घेतला आणि नजर वर करून विचारले, "कशाबद्दल?"

मुलाने काहीच उत्तर न देता पळ काढला आणि तो वळणावर दिसेनासा झाला. लेल्याने ओलसर फुलांवर अलगद गाल टेकवला आणि सुखाच्या चंचल आणि क्षण भंगुर अस्तित्वाच्या जाणिवेतून निर्माण होणाऱ्या भीतीच्या छायेपासून मुक्त अशा तारुण्याच्या अननुभवी आणि कल्पना रम्य सुखात ती मग्न झाली. ही भीती खूप सोसलेल्या प्रौढ व्यक्तींच्या मात्र चांगलीच परिचयाची असते.

# ३

प्रथम विमानातून सगळे बांधकाम पहायचे आणि नंतर आपल्या गाडीतून काल-व्याच्या नियोजित मार्गावरून हिंडायचे असे बासार्गिननी ठरवले होते. मॉस्कोतल्या सभेनंतर नुसत्या अहवाल आणि पत्रांनी कामावर लक्ष न ठेवता समक्ष सगळे पाहून घ्यायला हवे होते. इंजिनियरांच्या मताप्रमाणे सगळ्याच कामाला नवी गती द्यायला हवी होती.

दिवस फारच कठोर बनले होते. त्या कठोर दिवसांचा अग्रदूत असे क्षितिजावरचे करड्या रंगाचे धुके, अतिउष्ण हवा आणि पिसाट वारा असला तरी पावसाळा आणि वसंत ऋतूपेक्षा उन्हाळ्यात काम करणे सोपे होते. कारण पावसाळ्यात आणि वसंत ऋतूत यंत्रे चिकट चिखलात रूततात आणि पुराचे पाणी झालेले बांधकाम वाहून नेते.

प्रकल्पावर काम करणाऱ्यांना गेलेल्या कठीण दिवसांच्या आठवणी काढायला बिलकूल आवडायचे नाही. पण बासार्गिनना मात्र धरणाचे पहिले दार बसवताना कामगार किती झगडले, दुथडी भरून वाहाणाऱ्या डॉनला कसे अडवले आणि पहिले माती खणणारे प्रचंड यंत्र ओल्या मातीत कसे रुतले, त्याचे ते हजारो टनांचे धूड त्यातून वाचण्याची बहुतेकांनी आशाच सोडली असताना कुशल पित्रोशिनने मोठ्या प्रयासाने त्या चिकट गाळातून कसे बाहेर काढले आणि कामाला लावले याच्या आठवणी चांगल्या आठवत होत्या.

विस्मृतीत जमा झालेले असे कितीतरी विजय त्यांच्या गाठीला होते. " हे सगळं

टिपून ठेवलं पाहिजे" त्यांच्या मनात विचार आला. "नाही तर ते सारं लोकांपर्यंत पोचायचंच नाही."

संध्याकाळच्या सुमाराला बासार्गिन झिमल्यानोयूच्या विभागात आले. सबंध दिवस लांबलचक आणि मेहनतीचा गेला होता. पण तरी त्यांना थकवा जाणवत नव्हता. अंगावर घेतलेल्या कामाच्या व्याप्तीच्या जाणिवेने त्यांना मॉस्कोत असतानाच घेरून टाकले होते. ती भावना अजून ओसरलेली नव्हती. उलट ती आणखी बळकटच झाली होती. आणि कोणत्या तरी मार्गाने व्यक्त होऊ पाहत होती.

उपसलेल्या मातीचे ढिगारे बांधकामाच्या जागी सतत वाढतच होते. ठरलेल्या कामापेक्षा जास्त काम होत होते. पण तरीही ते पुरेसे नव्हते.

बासार्गिनना झिमल्यानोय माती खणणाऱ्या यंत्रांजवळ सापडले.

"काय, कसं काय चाललंय्?" त्यांनी विचारले. "तुमच्याकडची कामं ठीक चालली आहेत हे माहीतच आहे मला. पण तरीही काही अडचण नाही ना?"

"जमीन फार कठीण आहे. अशी माती खणणाऱ्या यंत्रावरचे कामगार तक्रार करत होते." झिमल्यानोयनी उत्तर दिले.

"फक्त कठीण जमिनीबद्दलच तक्रार करताहेत? स्वतःबद्दल नाही? तुमची आता सुट्टी आहे का? माझ्याकडे पाठवा त्यांना."

माती खणणाऱ्या यंत्रांवरचे कामगार अंगरख्याच्या बाहीने चेहऱ्यावर उडलेल्या मातीचा थर पुसत बासार्गिनजवळ आले. त्यांनी बासार्गिनना अभिवादन केले आणि घाबरून आपल्याला कशाला बोलावले आहे याचा अंदाज करण्यासाठी एकदा झिमल्यानोयकडे एकदा बासार्गिनकडे असे पाहत राहिले.

"कॉम्रेड्स!" बासार्गिन बोलले. "जमीन फार कठीण आहे—खरंच आहे ते. पण इथं लोण्याचा थर असेल असं आश्वासन आपल्याला कुणीच दिलेलं नव्हतं. पण कठीण जमीन हा काही मुख्य प्रश्न नाही. किंवा माझ्याकडून मिळणारी मदत—प्रमुखांकडून मिळणारी मदत हाही मुख्य प्रश्न नाही. तुम्हाला आम्ही सगळं सगळं पुरवू—एका वेळा शिवाय सगळं! पण वेळ मात्र तुमच्या हातात आहे. मी नुकताच मॉस्कोहून आलो. आपलं काम पुरं होण्याची सारा देश मोठ्या अधिरेपणाने वाट पाहत आहे. शासनाने आपल्यावर फार मोठा विश्वास व्यक्त केला आहे. आपल्याला फार मोठा मान दिलेला आहे. कामाच्या काळात त्यांनी कपात केली आहे."

सगळे कामगार बासार्गिनच्या भोवती गर्दी करून आणखी जवळ सरकले.

"आपण फक्त माती खणण्यातच कुशल नाही, तर आपण वेळ वापरण्यातही कुशल झाले पाहिजे हे विसरू नका. सध्या आपल्याला प्रत्येक क्षणच नाही तर प्रत्येक क्षणाचा प्रत्येक भागही पकडला पाहिजे. त्या प्रत्येक क्षणाला माती बाहेर काढण्याचा वेग वाढवला पाहिजे. या कामाचा आणि आपल्या देशाच्या भवितव्याचा फार

निकटचा संबंध आहे हे विसरता कामा नये. तुम्ही आम्ही सगळे कोण आहोत ? कम्युनिझमचे शिल्पकार ! कम्युनिझमच्या दिशेनं कासवाच्या गतीनं सरपटत जाऊन, एक एक पाऊल, एकएक पाऊल जाऊन चालणार नाही. तर परिकथेतल्या बुटातून जायला हवं ! माती काढायचं काम चांगलं चाललं आहे. पण माझं तेवढ्यानं समाधान होत नाही. उत्तम काम करता येत असताना फक्त चांगल्या कामावर समाधान मानता उपयोगी नाही. तुम्हाला मी दोन दिवस देतो. नंतर मी रिपोर्ट पाहतो."

"चालेल !" फाटक्या अंगाच्या उंच प्रोखोरोवने उत्तर दिले. "माझ्यापुरती मी खात्री देतो कॉम्रेड बासार्गिन !"

"तू स्वतः पुरतं सांगितलंस. पण ते पुरेसं नाही." माती खणणाऱ्या यंत्रांच्या ड्रायव्हरांनी गोंगाट केला.

"प्रत्येकजण स्वतःपुरती आणि सगळ्यांच्यावतीने जबाबदारी घेईल." बुटक्याशा, विशाल मनाच्या कामगार पालेयने उत्तर दिले.

"हा प्रोखोरोव नेहमी सगळ्यांपासून वेगळा समजतो स्वतःला."

"आत्मकेंद्री दृष्टिकोण आहे त्याचा !" मागून कुणीतरी शेरा मारला.

"माझा मातीचा उतारा दाखवेल माझा कसला दृष्टिकोण आहे ते !" प्रोखोरोव चिडून म्हणाले.

"ठीक आहे !" बासार्गिन म्हणाले आणि संकोचाने हसत म्हणाले, "तुमच्यापैकी कोण मला आपलं यंत्र देतंय ? जरा हात तापवले पाहिजेत. मीसुद्धा एकेकाळी हे काम केलेलं आहे !"

सगळे कामगार गोंधळून गप्प झाले. प्रथम पावेल ओरडला "हे माझं यंत्र इथं बाजूला उभं आहे. घ्या ना ते !"

"हं, रूतलेलं दिसतंय ! थोडाच वेळ हं ! नाहीतर फजिती व्हायची."

बासार्गिन झटकन् यंत्राजवळ गेले. तेवढ्यात त्यांच्या मनात विचार चमकून गेला —प्रत्येक माणसात खोलवर रुजलेल्या अशा काही बालिश वृत्ती असतातच, मग तो माणूस ७० वर्षांचा वृद्ध असो अगर उच्च अधिकारी असो !

बासार्गिननी जाकिट काढून यंत्राच्या बाहेरच्या हुकाला अडकवलं आणि ते लोखंडी शिडीवरून केबिनमध्ये शिरले.

"प्रत्येक सेकंद पाहा" त्यांनी झिमल्यानोयला सांगितले.

बासार्गिन ड्रायव्हरच्या सीटवर बसले. त्यांनी इंजिन सुरू केले. यंत्र धडधडू लागले. कामगारांनी एकमेकांकडे पाहिले. प्रथम बासार्गिननी कामाच्या सगळ्या कृतींचे एक चक्र पूर्ण केले. प्रत्येक कृति पूर्ण झाल्यावर जणूकाही पूर्णविराम देऊन ते दुसरी कृती सुरू करत होते. ते चक्र असे होते; बकेट खाली यायचे, माती गोळा करायचे लोखंडी हाताने बकेट उचलले जायचे, वळून माती ओतायच्या जागी ठेवले जायचे,

कलंडून माती ओतायचे, परत लोखंडी हाताकडे बकेट यायचे आणि पुन्हा माती भरण्यासाठी पहिल्या जागी आणले जायचे. प्रत्येक चक्रानंतर बासार्गिन कळे नकळेसा विसावा घेत होते.

" खरोखर, उत्कृष्ट प्रतीच्या कामाचं दर्शन झालं." झिमल्यानोय म्हणाले. पण ते मनापासून बोलले की चेष्टेने ते मात्र कळेना.

" बरं बरं ! कसला उत्कृष्ट दर्जा घेऊन बसलाहेस ? " बासार्गिन म्हणाले. आणि त्यांनी पुन्हा अगदी सफाईने वेगाने लक्षात येण्याच्या आतच सगळी चक्रे अशी पुरी केली की जणू काही गोल गोल फिरणाऱ्या एकाद्या यंत्रानेच ती एकामागोमाग एक पुरी करून टाकली आहेत.

" यापेक्षाही अधिक माती काढणे अजून शक्य आहे." यंत्रातून बाहेर येत बासार्गिन म्हणाले.

" अगदी जीव ओतून केलेलं काम होतं हे ! " पालेय उद्गारला.

" आणि वेळाचं काय ? " बासार्गिननी विचारलं

" त्याचं काम त्यानं केलंय. " झिल्यानोयनी कोड्यात उत्तर दिले.

" असं आहे तर ! म्हणजे फजितीच झाली म्हणायची ! " बासार्गिनना वाटले आणि ते पालेयला म्हणाले,

" तुमचं काम कसं होतं ते पाहायला मला आवडेल कॉ. पालेय ! "

" असंच होईल ते ! " गोंधळून जाऊन त्याने उत्तर दिले. उघडच दिसत होते की आता या वेळी त्याला आपले काम दाखवायची इच्छा नव्हती.

पण तरीही तो यंत्रावर चढला आणि माती खणून वाहून नेण्याच्या कामाचे सगळे चक्र पूर्ण केले. पण बासार्गिनपेक्षा जरा सावकाशच ते पूर्ण झाले.

" फारच नाजूकपणा करतोय ! " बासार्गिनना वाटले.

बासार्गिननी कामगारांचा निरोप घेतला आणि ते गाडीकडे निघाले वाटेत ते झिमल्यानोयना म्हणाले.

" तुमच्या पालेयनं लबाडी केलीन् ! प्रमुखाची दया आली त्याला ! "

" काही लबाडी केली नाही त्याने " शांतपणे झिमल्यानोयनी त्यांचे म्हणणे खोडून काढले. " खरोखरीच तुम्ही कामाची उत्कृष्ट प्रत दाखवलीत. "

बासार्गिन थांबले. " खरंच ? "

झिमल्यानोय हसून म्हणाले, " आवेशाच्या भरात कधी कधी असं घडून येतं. पण तुम्हाला कल्पना आहे का ? उद्यापासून बांधकामावर काय सुरू होईल त्याची ? "

" काय ? "

" वेळाच्या बाबतीत प्रत्येक जण तुमच्यावर मात करण्याचा प्रयत्न करील. "

" असा विचार माझ्या मनातही आला नाही " बासार्गिन म्हणाले पण झिमल्यानोयच्या नजरेतून त्यांना असे जाणवले की आपण झिमल्यानोयवर अविश्वास दाखवतो आहोत असे त्यांना वाटलेय. " तू मला बनवू नकोस! शीः! काय पण शक्कल काढली आहे डोक्यातून! म्हणे कामाची उत्कृष्ठ प्रत! वृथा स्तुती करून आंधळे बनवू नका प्रमुखाला."

झिमल्यानोय छातीवर हात धरून खो खो हसू लागले.

" तुम्ही बसा असेच हसत इथे. मी जातो. तुमचं हसणं होईपर्यंत थांबायला मला वेळ नाही मला." रागावण्याचे नाटक करून बासार्गिन म्हणाले.

" तुम्ही तर नवीन रेकॉर्ड प्रस्थापित केलं आहे!" हसण्यामुळे लागलेला ठसका देत देत झिमल्यानोय म्हणाले. " आणि वर पुन्हा रागावताहात. माफ करा हं मला!"

बासार्गिननी झिमल्यानोयचा निरोप घेतला आणि ते गाडीत बसले.

" भारीच गमत्या आहे. पण कामाला मात्र अप्रतीम!" झिमल्यानोयबद्दल ते स्वतःशीच बोलले.



बासार्गिन कलाचच्या प्रकल्पाच्या ऑफिसमधे परत आले ते आनंदी, उत्तेजित मनःस्थितीत, गडगडात करीतच! प्रकल्पाच्या काळात केलेल्या कपातीसंबंधात बैठक घेण्याची त्यांनी आज्ञा दिली. त्यांचे दुय्यम सहकारी आपल्या अहवालांसह त्यांच्या खोलीत गोळा झाले. दोन्ही बाजूनी टेलिफोन सारखे खणखणत राहिले. स्वागत कक्ष निरनिराळ्या आवाजांनी भरून गेला. मोटारींचे कर्णे अधिरेपणानं वाजत राहिले. ड्रायव्हरना एका जागी बसवत नव्हते. आपल्या सुस्तपणाने आणि आळशीपणाने बासार्गिनना चीड आणणारे पिवळे ढगही आकाशात हालचाल करू लागल्याचे आणि गुण्यागोविंदाने पूर्वेकडे सरकू लागल्याचे खिडकीतून दिसत होते. जणू आकाशातला जहाजाचा काफिलाच चालू लागला होता!

बासार्गिन झिमल्यानोयच्या विभागात गेल्याची आणि त्यांनी तिथे यंत्रावर काम केल्याची बातमी त्याच वेळी ऑफिसात पसरली. माती खणणाऱ्या कामगारांना त्यांनी मागे सारले असे बोलले जात होते. सगळ्या विभागात झिमल्यानोयनी सांगून टाकले की "माती खणणाऱ्या यंत्रांच्या कामगारांनी प्रमुखांचे रेकॉर्ड मोडायचेच अशी उचल खाल्लीय." प्रकल्पाच्या काळात कपात केल्याची बातमी कालव्याच्या सबंध मार्गावर कल्पनेबाहेर वेगाने पसरल्यामुळे " उचल खाल्ल्या "ची बातमी लवकरच विसरून गेली.

रात्री बासार्गिन आपल्या छोट्याशा घरात परत आले. ते घर डॉननदीपासून

जवळच होते. ते तिथे एकटेच राहात होते. त्यांचे कुटुंब मॉस्कोतच होते.

बासार्गिननी सगळे दिवे लावले आणि खिडक्या पुरत्या उघडल्या. रात्रीचा सुखद गारवा खोलीत सांडला आणि त्याने सगळ्या खोल्या भरून टाकल्या. दूरवर कुठेतरी डॉनच्या पात्रातून चाकाचा आवाज करत चाललेल्या जहाजाचा आवाज स्पष्ट ऐकू येत होता.

ऑफिसमधल्या इतर अनेक पत्रांच्या ढिगात बासार्गिनना एक लहान मुलाच्या हस्तक्षरातले पाकिट दिसले होते. ते त्यांनी जाकिटाच्या खिशात दडवले होते आणि सगळी कामे संपवून घरी परतल्यावर वाचायचे ठरवले होते.

त्यांनी ते पाकिट काळजीपूर्वक उघडले. त्यातून एक वहीचा कागद बाहेर पडला. बासार्गिन वाचू लागले: "प्रिय कॉम्रेड बासार्गिन, कृपा करून आम्हाला—कत्यो-लिनकोवातल्या शाळेच्या मुलांना तुम्ही डॉन नदी केव्हा अडवणार आहात आणि डॉन समुद्रात पाणी केव्हा भरणार आहात ते लिहून कळवा. पाणी कसं वाढत जाईल याच्यावर लक्ष ठेवण्यासाठी आम्हाला ते कळणं फार महत्त्वाचं आहे. कारण अशी अद्‌भुत घटना आमच्या आयुष्यात बहुधा पुन्हा कधी घडणार नाही."

बासार्गिनना हसू आले. त्यांनी ते पत्र टेबलावर ठेवून त्यावर ग्रॅनाईटचा तुकडा ठेवला. या पत्राला उत्तर लिहिलेच पाहिजे.

"रशियातील वनस्पती" या नावाचे जाडजूड माहितीचे पुस्तक सापडेपर्यंत ते चवड्यावर बसून पुस्तकाच्या शेल्फमध्ये डोकं खुपसून बसले होते. त्यांनी माहिती पुस्तकात "लिपा" (लिंबारा) हा शब्द शोधून काढला आणि त्या झाडासंबंधी जे जे त्यात लिहिलेले होते ते सर्व मोठ्या उत्साहाने वाचून काढले. मोहरलेल्या लिंबाऱ्याचा वास प्रत्यक्ष त्या झाडाखाली येतो त्यापेक्षा त्याच्यापासून काही अंतरावर जास्त जोराने "कानावर" येतो या गोष्टीचे बासार्गिनना विशेष नवल वाटले.

"आमच्या कामाचंही तसंच आहे," बासार्गिन म्हणाले "दुरून ते जास्त डोळ्यात भरतं."

त्या वनस्पती शास्त्राच्या पुस्तकाच्या वाचनात गुंगून जाऊन ते कितीतरी वेळ टेबलाशी बसून होते.

सकाळी पहारेकऱ्याने ऑफिसमधून फोन केला आणि सांगितले की माती काढ-ण्याच्या कामाला गती आली आहे. ती गती आणखी आणखी वाढवण्याची प्रगती-शील वृत्ती वाढते आहे.

"आभारी आहे" बासार्गिन म्हणाले. "तू जेव्हा रशियन बोलायला शिकशील तेव्हा ही बातमी दिल्याबद्दल तू इतके दिवस त्याबाबतीत दाखवलेल्या प्रतिगामी वृत्तीबद्दल मी तुला माफ करीन."

●

# ४

नेहमीचा परिपाठ सोडून बासार्गिननी संध्याकाळ ऐवजी सकाळी सभा ठरवली होती.

मॉस्कोहून परत आल्यापासून बासार्गिन जणू तरुण झाले होते. आपल्या सहकाऱ्यांबरोबर ते पूर्वीपेक्षा अधिक हसत विनोद करायचे. त्यांच्या खोलीतून वरचेवर हसण्याचे आवाज ऐकू यायचे. कामाचा भलताच उरक असलेली पण बुजरी सेक्रेटरी झिनाइदा फिलिपोवना अगदी चोरट्या आवाजात सगळ्यांना सांगायची, की वासिलिय इवानोविच बासार्गिन यांचे तिला काही कळतच नाही. प्रकल्पाच्या काळात कपात करण्यात आली म्हणजे जास्त काळजी, जास्त पत्रव्यवहार, जास्तवेळा मॉस्कोशी टेलिफोनवरून संभाषणे, प्रवास, सर्व प्रकारच्या चिंता अधिक ! पण प्रमुखांना जणु त्याचाच आनंद झालाय.

“ए झिनाइदा !” झिमल्यानोय तिला म्हणाले. “तुला काही कळत नाही. प्रकल्पाचा शेवट जवळ येतोय. मग त्याचा आनंद नाही होणार ? उत्कट इच्छापूर्तीचा क्षण अजून आला नाही पण आता तो नजिक आलाय. त्यात सगळं भरून मिळेल !

आपल्या विभागाच्या पक्ष संघटनेच्या सेक्रेटरी कार्पोव आणि नुकतेच नोवोरोसिइस्कहून परत आलेले स्तारोस्तिन यांच्यासह झिमल्यानोय कलाचला सभेसाठी आले. झिमल्यानोयच्या विभागापासून त्या बांधकामाच्या अभ्यासाला स्तारोस्तिननी सुरुवात केली. अगदी सकाळीच ते कलाचला आले. रस्त्यावरच्या धुळीच्या जाड थरांवर तोपलवृक्षांच्या सावल्या पडल्या होत्या.

सभेला अजून एक तास होता. ते तिघे गाडीतून सरळ डॉन नदीवर गेले. स्टेप-मधल्या उकाड्यानंतर आणि धुरळ्यानंतर नदीच्या थंड पाण्यात डुंबावेसे वाटणे स्वाभाविकच होते.

उथळ जागी खळखळ आवाज करत डॉन सरळ वाहात जात होती. प्रवाहात पडलेली राकितची पाने आणि वाऱ्याने उठणाऱ्या लहरी यामुळे नदी चंदेरी दिसत होती. गुलाबी ढगांच्या सावल्या नाहीशा होत तिच्या भोवऱ्यात बुडत होत्या. डॉनच्या पाण्याने धुऊन निघालेले वालुकमय भुशार उन्हामुळे, कझाक स्त्रियांनी वाळत घातलेल्या घागऱ्यासारखे पांढरे दिसत होते.

आंघोळीनंतर ऑफिसकडे येताना वाटेत ते बाजारातून आले. कझाक स्त्रियांनी अहमहमिकेने त्यांचा काइमाक देऊन पाहुणचार केला. प्रत्येकीला वाटत होते, की त्यांनी आपलंच काईमाक घ्यावं–थेट तळघरातून थंडगार सुरयात भरलेलं !

स्वच्छ, वाहात्या पाण्याची आंघोळ, वारा नसल्यामुळे अगदी स्वच्छ राहिलेली हवा, कझाक स्त्रियांचे उन्हामुळे रापलेले तांबूस हसरे चेहरे या सगळ्यामुळे झिमल्यानोयची मनःस्थिती उल्हासित झाली होती.

प्रकल्पाच्या ऑफिसमधल्या वातावरणाने ती टिकूनच राहिली. नुकत्याच पुसलेल्या ओलसर फरशीमुळे ताजेपणा पसरला होता. हलक्या, न कळत जाणवणाऱ्या वाऱ्याच्या झुळकीने खिडकीवरचे पडदे शिडासारखे फुगले होते. रात्रीच्या उष्ण हवेनंतर पहाटेच्या सुखद गारव्याने भरलेल्या कॉरिडॉरमधे पावले उडती आणि उल्हसितपणे पडत होती.

बासार्गिन आपल्या खोलीत आधीच येऊन बसले होते. आणि इतरांची वाट पाहात होते. त्यांच्या स्वच्छ, दाढी केलेल्या चेहेऱ्यावर स्टेपप्रदेशातला चढलेला राप एरवी-पेक्षा स्पष्ट दिसत होता. सकाळच्या प्रहरी प्रकल्पाचे प्रमुख आज अगदी शांत दिसत होते. इतकेच नव्हे तर थोड्याच्या उत्सवी मनःस्थितीत होते.

बासार्गिनच्या मागच्या भिंतीवर टांगलेल्या नकाशावर सूर्यप्रकाश पडला होता. नकाशावर एका लहानशा पाखराची सावली नाचत होती.

झिमल्यानोयनी खिडकीबाहेर दृष्टी टाकली. नुकत्याच लावलेल्या मॅपल वृक्षाच्या फांदीवर बसून एक गंभीर चेहेऱ्याची चिमणी डोलत होती.

बासार्गिननी झिमल्यानोयच्या दृष्टीच्या रोखाने पाहिले, नकाशावरची हालती सावली पाहिली, नंतर लहानशा मॅपलवर बसलेल्या चिमणीकडे पाहिले. नंतर एक कागद जवळ ओढला आणि त्यावर लिहिले.

"सारायेवच्या भागातलं आणि त्सिमलाच्या पाण्याच्या खजिन्याजवळचं जंगल-लावणीचं काम कसं चाललं आहे ते पहाणे."

आतापावेतो सभेत भाग घेणारे सर्वजण बासार्गिन यांच्या खोलीत जमा झाले होते.

झिमल्यानोयनी सारायेव आणि इंजिनियर रायेवस्कींकडे पाहिले. ते साल टेकड्यां-जवळच्या बोगद्यांचे शिल्पकार होते. या बोगद्यातून डॉनचे पाणी स्टेपमधल्या शेतीला पाणी पुरवणाऱ्या कालव्यात पडणार होते.

बासार्गिन उठले. हाताने टेबलाचा आधार घेत शुभ्र होत जाणारे मस्तक थोडे खाली झुकवून क्षणभर गप्प उभे राहिले.

" तुम्हाला सांगायला मला आनंद होत आहे की शासनाने प्रकल्पाचा काळ कमी करण्याचं ठरवलं आहे. हा निर्णय का घ्यावा लागला ते तुम्हाला माहीतच आहे. आपलं तांत्रिक ज्ञान आता अशा उंचीवर पोचलं आहे की कमी केलेल्या कालखंडा-तही प्रकल्प प्रत्यक्षात उतरेल. या एका वर्षात मोजदाद करता येणार नाही इतक्या आपल्या शक्ती वाढल्या आहेत. तुम्हालाही ते माहीत आहेच. माती उपसण्याऱ्या चालत्या प्रचंड यंत्रांचंच उदाहरण घेऊ. १४ क्यूबिक मीटर माती काढणाऱ्या "बाल्शाकां"च्या मदतीनं आपण काम सुरू केलं. आता १८ क्यूबिक मीटर माती काढणारी यंत्रं आपल्या इथं कामं करताहेत. २५ क्यूबिक मीटर माती काढणा-ऱ्यांची योजना तयार आहे. तेव्हा, साधं गणित आहे. यंत्रांच्या वाढलेल्या शक्तीमुळे कामाच्या गतीत वाढ आणि खर्चात बचतच संभवते. किंवा असं म्हणू या की आपल्याकडे सध्या २५ टन माती उचलणारी स्वयंचलित यंत्रे आहेत. पण बांध-कामावर लवकरच याच्यापेक्षा अधिक मोठी असली यंत्रं येणार आहेत. इथं हजर असलेले वास्तुशास्त्रज्ञ आणि जंगलशास्त्रज्ञ सोडून तुम्हाला सगळ्यांना चांगलं माहीत आहे की यंत्रशक्तीत होणारी वाढ जमीन खणणारी यंत्रं, स्क्रेपर यासकट बांधकामा-वरच्या सगळ्या यंत्रांतच होणार आहे.

" फार कुशल आहेत आपली यंत्रं ! " सारायेव बोलला. " त्यांचं गुणगान करताना मला कधीच कंटाळा येत नाही. माफ करा हं ! मी तुम्हाला मधेच थांबवलं. " बासा-र्गिनकडे पहात सारायेव बोलला.

" बरं ! प्रत्येक कॉम्रेड याबद्दलच बोलतोय. तेव्हा सर्वांना माहीत असणाऱ्या गोष्टींची पुनरावृत्ती करण्याचं कारण नाही. " बासार्गिन म्हणाले. " पण मी फार वाईट माणूस आहे. आपल्या प्रकल्पाच्या भव्यतेबाबतची जाणीव नाहीशी होऊ नये म्हणून पुन्हा पुन्हा हे सांगत राहणं जरुरीचं आहे.

" आपल्या प्रकल्पाचं काम इतर प्रकल्पांच्या कामासारखं नेहमीचच आहे. " झिमल्यानोय म्हणाले.

" बरोबर आहे. " बासार्गिननी दुजोरा दिला.

सभेला कामकाजाच्या चर्चेचे स्वरूप येऊ लागले. अनेक वर्षांच्या अनुभवाने प्रकल्प-प्रमुखांना माहीत झाले होते की कामाचे नुसते लांबलचक अहवाल सादर केले जाणाऱ्या सभेपेक्षा अशी चर्चाच जास्त फलदायी होते.

"बरोबर आहे." बासार्गिन पुन्हा म्हणाले. "त्याबद्दल बोलायलाच नको. आपल्यापुरतं ते नेहमीसारखंच आहे. पण पश्चिमी देशातल्या किंवा अमेरिकेतल्या प्रकल्पांशी तुलना करून पहा आणि मग पहाल आपण किती पुढे धाव मारली आहे ते! अमेरिकेतल्या असल्या प्रकल्पाबाबतचे बरोबर आकडे तुम्हाला कॉम्रेड कार्पोव देऊ शकतील."

"नेहमीसारखेच!" झिमल्यानोय पटकन् म्हणाले.

सारायेवने थोड्याशा असूयेनेच म्हटले "अफाट स्मरणशक्ती आहे या गृहस्थाची!"

कार्पोव हसला आणि मनापासून बोलू लागला.

"चांगली आकडेवारी सगळया शंकांचं एकदम निरसन करते. तिथे वादाला जागाच नसते. आपल्या वोल्गा-डॉन प्रकल्पावर मातीचं बांधकाम जवळजवळ १६४ मिलियन क्यूबिक मीटर इतकं आहे. पनामाच्या कालव्यावर ते थोडं जास्त आहे—१८० मिलियन क्यूबिक मीटरच्या आसपास. पण त्यांनी पनामाचा कालवा ३५ वर्षात बांधला आणि आपला प्रकल्प ४ वर्षात जवळ जवळ १० पट वेगाने! मला वाटतं इतकी आकडेवारी आत्ता पुरेशी आहे ना?" कार्पोवनी विचारले.

"आत्ता मी झालेल्या बांधकामाचा आढावा घेत बसत नाही. पण एका गोष्टी-बद्दल मात्र मी आग्रहानं सांगू इच्छितो. आपला प्रत्येक अनुभव टिपून ठेवून तो चिरंजीव करण्यासाठी आपला प्रत्येक रिकामा क्षण उपयोगात आणा. बांधकाम पूर्ण होईपर्यंत हे काम बाजूला टाकू नका. इथे या बांधकामावर डॉनच्या तीरावर साऱ्या जगात प्रथम आपणच अनेक गुंतागुंतीचे तंत्रज्ञानविषयक प्रश्न सोडवले आहेत. जमिनीच्या थराखाली खूप पाणी असलेल्या मऊ जमिनीवर आपण धरणं बांधत आहोत. पॅनिंग आऊट पद्धतीनं आपण प्रचंड मातीची धरणं बांधत आहोत. या धरणांची धूप थांबवण्यासाठी आणि त्यांचं संरक्षण व्हावं म्हणून आपण अनेक पद्धतींचा उपयोग केला आहे." बासार्गिन बोलत होते. "जाता जाता सांगतो, त्या सुप्रसिद्ध अमेरिकनांजवळ मातीची धरणं वाहून गेल्याची जवळ जवळ दीड हजार उदाहरणे आहेत."

"बघा! आणि आपण बांधकामासाठी नवी सामग्री शोधून काढली. पाणी साठव ण्याच्या पाण्याच्या खजिन्याच्या खळग्यासंबंधीच्या प्रश्नावर आपण खूप काम केलं. यंत्रांचं कार्य जास्त वेगानं व्हावं म्हणून आपण शेकडो पद्धती वापरात आणल्या. पूर्वी माती खणणारी यंत्रं पूर्ण वळण न घेता काम करत. आपल्या ड्रायव्हरनी प्रथमच पूर्ण वळण घेऊन काम करायला सुरुवात केली आणि माती काढण्याचं प्रमाण वाढवून दाखवलं. सगळ्याच गोष्टी सांगत बसणं शक्य नाही. पण आता आपल्या पुढे खूपच नवी आणि मोठमोठी कामं आहेत. किंवा खरं बोलायचं तर एक मूलभूत कार्य आहे. ते म्हणजे वेळाशी झगडा! प्रत्येक सेकंद वाचवणं. या सेकंदांनी यंत्रांच्या संख्येला

आणि कामाच्या तासांना गुणा. म्हणजे उपसलेल्या मातीच्या डोंगरांच्या रूपानं उत्तर मिळेल. ठरवलेल्या योजनेपेक्षा जास्त!"

बासार्गिन बोलताना थोडे थांबले. त्यांनी कपाळापासून हनुवटीपर्यंत चेहऱ्यावरून हात फिरवला.

"भविष्याच्या जडण-घडणीत एवढी मोठी उडी घेण्याचं काम सर्वांत प्रथम आपल्यावरच सोपवलं गेलं आहे. साऱ्या देशाची नजर आपल्यावर लागलेली आहे. प्रत्येक मिनिटाला हे आपल्या लक्षात असलं पाहिजे. या योजनेच्या निर्जीव आरेखनांच्या, तक्त्यांच्या पलीकडे असलेल्या उद्दिष्टांवर आपली दृष्टी असली पाहिजे." भिंतीवर टांगलेल्या तक्त्यांकडे हात करून ते म्हणाले, "जे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आपण प्रयत्न करतो आहोत त्या कामाकडे—समाजाची सुस्थिती, निसर्गाच्या आणि मानवाच्या उत्पादक शक्तींचा पूर्ण विकास यांच्याकडे पहायला आपण शिकलं पाहिजे! आपल्या कामाची मूलभूत किंमत आपण कधीच कमी लेखता कामा नये. आपलं ध्येय कधीच नजरे आड होऊ देता कामा नये! लोकांच्या मानसिक स्थितीशी संबंधित असं हे अतिशय महत्त्वाचं काम आहे. हे काम आमचं, पक्षाच्या लोकांचं आहे."

बासार्गिननी प्रथम कार्पोववर, नंतर खिडकीबाहेर दिसणाऱ्या स्टेपप्रदेशावर नजर टाकली. क्षितिजाच्या मागून डोळे दिपवणारे झगमगीत ढग बाहेर पडत होते. ते आकाशमध्याकडे आले. पृथ्वीने डोक्यात घातलेल्या पांढऱ्या गजऱ्यासारखे दिसत होते ते! एकसुरी वारा मोठ्या आत्मविश्वासाने ढगांचा पाठलाग करत होता.

"भविष्याचा पहिला किरण आपल्यावर पडणार आहे. इतरांपेक्षा आपण भविष्याच्या जास्त निकट उभे आहोत. भविष्यकाल अनेक गोष्टी करायला लावतो. तो नवा मानव घडवतो आहे—नवे स्वभाव, नवे गुण घडवतो आहे!

बासार्गिन गप्प झाले आणि हसले.

"सभेचा औपचारिक भाग संपलेला आहे. आता आपण अनौपचारिक—व्यावहारिक प्रश्नांकडे वळू. कामाच्या वेळात कपात होण्याच्या दृष्टीने आपल्या विभागात कोणते उपाय योजले पाहिजेत यासंबंधीचे विचार मांडावेत अशी मी प्रत्येकाला विनंती करतो. त्या सगळ्या सूचना आम्ही एकत्र करू आणि त्यानुसार सबंध बांधकामासाठी एक ठोस आराखडा तयार करू. मात्र त्यापासून एक मिलिमीटरसुद्धा इकडे तिकडे सरकायला वाव दिला जाणार नाही कुणाला. थोडक्यात बोलण्याची विनंती करतो. ख्रिमला हैड्रोलिक केंद्रापासून सुरुवात करू या."

बासार्गिन आपल्या सहकाऱ्यांचे विचार ऐकत होते. काही काही टिपून घेत होते. क्वचित वक्त्याला थांबवून अचूक आकडेवारीची मागणी करत होते. रेडिओ हियरिंग मशीनने जेनरेटरची गती मोजतात तसे ते त्या भाषणामधून प्रकल्पाची तपासणी करत होते. अगदी बारीकशी चूकसुद्धा बासार्गिन यांच्या बोलण्याच्या सुरातून व्यक्त होत

होती. सहकाऱ्यांच्या कामात घडलेली लहानात लहान चूक मग ती अति सावधगिरी घेतल्याने घडलेली असो अगर फुगवून सांगितलेली आकडेवारी असो–तिचे प्रतिबिंब ताबडतोब बासार्गिनच्या चेहेऱ्यावर उमटे. त्यांच्या कपाळावर तेव्हा आठ्या दिसायच्या आणि ते पेन्सिलीने टेबलावर हळूहळू टकटक करायचे.

त्यांनी वरून दाखवले नाही, तरी सभा ज्या पद्धतीने चालली होती त्यावर ते खूष होते.

धरणाच्या दरवाजावर आणि पंपिंग स्टेशनवर बांधकाम पूर्ण होईपर्यंत न थांबता यंत्राची उभारणी करणे शक्य आहे तेथे ते काम सुरू करावे ही सूचना त्यांना सर्वात महत्त्वाची वाटली. आतापर्यंत बांधकाम संपूर्ण उभे राहिल्यावरच यंत्रांच्या उभारणीला सुरुवात होई.

" ज्याची रचना अगदी साधी-सुलभ असते. ते टिकावू असते ! चाकाइतकी साधी दुसरी कोणती वस्तू आहे का ? आज हजारो वर्षे ते सेवा देत आहे. यावरून हेच दिसतं की साध्यासुध्या गोष्टींपासून महत्त्वाच्या गोष्टींकडे जायला फक्त एक पाऊल पुरेसं असतं असं म्हणतात ते खरं आहे. "

सभेच्या शेवटी परिसराच्या हरितीकरणासंबंधी आणि वास्तु शिल्पशास्त्राच्या दृष्टीने बांधकामाच्या सौंदर्याच्या दृष्टीने बोलणे झाले. ज्या आवेशाने आणि ज्या पद्धतीने कार्पोव आणि झिमल्यानोय आलेल्या वास्तुशिल्प शास्त्रज्ञांपैकी एकाबरोबर वादविवाद करत होते त्यावरून स्तारोस्तिनना समजले की ते या कामाचीही किंमत प्रत्यक्ष बांधकामापेक्षा मुळीच कमी लेखत नाहीयेत.

" अहो महाशय, तुमच्या हे कसं लक्षात येत नाही, की बांधकामाच्या भव्यतेच ठसा हा त्याच्या अवाढव्य आकाराने होत नाही, तर त्याच्या प्रमाणबद्धतेमुळे होतो ! आणि तोसुद्धा मोजक्याच साध्यासुद्धा शोभिवंत भागांनी प्राप्त होतो. आपल्याला भव्य शैली हवी आहे, पण असिरियन शैली नको " झिमल्यानोय चिडून बोलले.

झिमल्यानोय आणि कार्पोव यांच्या बाजूने सारायेव झाला आणि वाद चांगलाच तापला. पुरेशा वेळाअभावी बासार्गिनना तो वाद निग्रहाने थांबवणे आणि त्या प्रश्नाची चर्चा बाजूला ठेवणे भागच होते.

●

५

जमीन म्हणजे काय हे समजावे लागते आणि हा समज अनुभवानेच येतो. जमीन निरनिराळी असते. यंत्राच्या फाळाखाली ती आपली वेगवेगळी रूपे दाखवते. एखादी जमीन अशी असते की माती खणणाऱ्या यंत्राचे जाड लोखंडी पातेसुद्धा मोठ्या कष्टानेच माती उकरू शकते. इथलीच लाल माती पहाना ! त्या जमिनीवरून फाळ फिरला की ती इतकी चमकदार दिसू लागते की तिच्यावरून आरशासारखा प्रकाश परावर्तित होतो. त्यात पहावे आणि खुशाल भांग पाडावा ! मातीची भाजलेली खण-खणीत वीटच जशी काही ! अशा जमिनीतून माती बाहेर काढण्यासाठी आधी ती सैल करणारे यंत्र पाठवावे लागते. ते असली जमीन प्रथम फोडते. आणि मगच माती खणणाऱ्या यंत्राला काम करता येते. ही माती अती त्रासदायक ! पण अशा जमिनीवरसुद्धा गवत उगवते तरी कसे याचे आश्चर्यच वाटते.

क्लावा गुसेवाने कपाळावरची बट मागे सारली आणि ती हसली. ती आता काही तरी गंमतशीर बोलणार असे वाटून सभेत असलेले जमीन फोडणाऱ्या यंत्रांचे ड्रायव्हरही हसू लागले. पण क्लावा थोडावेळ थांबून म्हणाली,

" इथलं काय हे गवत आहे ! काय गवत असतं आमच्याकडचं ! खांद्याइतकं उंच ! असं फुलतं, असं फुलतं की डोळे भरून पहातच राहावं !

" पण तू स्वतः कुठली आहेस ? " धुळीने माखलेली टोपी घातलेल्या, मागल्या ओळीत बसलेल्या काळयासावळया तरुणाने विचारले.

" कालिनिनजवळची ! आई मला सकाळीच कुरणात पाठवायची श्रावेल गवत

आणायला. गवतात गारवा अजून दडलेला असायचा. उन्हानं दव अजून गोळा केलेलं नसायचं आणि खरोखरीच नदीत आंघोळ केल्यासारखं दवानं भिजायला व्हायचं- ”

“ आल्तायमधल्यासारखं गवत जगात कुठेच नसेल ! ” दुर्मुखलेल्या चेहऱ्याचा बुलडोझर ड्रायव्हर जागेवरूनच बोलला. “इतकं दाट ! यंत्रं काही कापू शकत नाहीत. ती मोडून जातात. त्या आल्तायच्या गवतात मीच दोन यंत्रं मोडीत काढलीत.”

“ गुसेवा, कामाचं बोला ! ” असंतुष्टपणाने माती खणणाऱ्या यंत्राचा ड्रायव्हर प्रोखोरोव ओरडला. ” आपली ही सभा काही आठवणी सांगण्याची नाही !

“ कामाचे नाही तर काय बोलले मी ? ” क्लावाने विचारले. तिचे डोळे रागाने चमकले “ रूक्ष आहेस अगदी तू प्रोखोरोव ! ”

“ खुलासा कर, समजलं नाही मला. ” वाकडेपणाने प्रोखोरोवने विचारले.

“ करतेच खुलासा ! ” क्लावा उत्तरली. “ कालच संध्याकाळी आपण सोळाव्या विभागात माती उचलत होतो. तिथे जवळच वस्ती आहे. अर्थातच वस्तीतून मुलं पळत आली, यंत्राभोवती गोळा झाली. त्यांचे डोळे असे काही आनंदाने चमकत होते ! जशा काही चांदण्याच ! शप्पत ! मोठी माणसं मुलांच्या सदऱ्यांना धरून मागे ओढून दुरूनच आमचं काम पहायला सांगत होती. सगळी आनंदाने हसत खिदळत होती ! एवढं चांगलं यंत्र पाहून आनंद न होणं कसं शक्य आहे ? आणि खरोखरच त्यांच्याकडे पाहून उत्तरादाखल हसावंसं वाटावं, एखादा विनोदही करावासा वाटावा असंच वातावरण होतं सगळं. पऽण ! हा प्रोखोरोव स्वतःच्या यंत्रावर पुतळ्यासारखा बसून होता ! पोलादी चेहेरा आणि थिजलेले भावहीन डोळे ! जणू काही म्हणताहेत “मी हे जबाबदारीचं काम करत असताना या सरकारी वातावरणात दुसऱ्या कशानेही माझे हृदय दुसऱ्या कोणत्याही गोष्टीने विचलित होणे अशक्य आहे. ” विश्वास तरी बसेल का तुमचा ? पण मुलांच्या बरोबर हसायचं सोडून त्यानं त्यांच्यावर ओरडायलाच सुरुवात केली “ बाजूला घ्या ती मुले ! त्यांचे इथे मुळीच काम नाही ! ” अगदी लाज आणण्यासारखं, कमीपणा आणणारं ओरडणं होतं ते त्याचं. शप्पत ! ”

ड्रायव्हरांनी मोठ्यांदा हसायला सुरवात केली.

“ क्षुल्लक गोष्टीत लक्ष घालतेस गुसेवा ! टिंगल करण्यात ! ” थंड स्वराने प्रोखोरोव म्हणाला.

“ ए, त्याबद्दल माफी मागते मी तुझी. क्षुल्लक गोष्टी म्हणे ! ” क्लावाने रागाने उत्तर दिले. “ ज्यावेळी मी या स्टेपवर या भयानक रखरखीत प्रदेशावर दृष्टी टाकते तेव्हा माझं मन खिन्न होतं. वाटतं, आजवर कशी राहिली असतील माणसं इथं ? इथली जमीन म्हणजे सोनं आहे. पण त्या सोन्याचं पाणी काढून घेतलेलं आहे. नाही!” क्लावा प्रोखोरोवकडे वळून म्हणाली, “तू हास, नाही तर काही कर. पण मी तुला

सांगते, आपलं काम असं आहे की भावनेच्या ओलाव्याशिवाय ते पुरे करणेच शक्य नाही!"

"माणूस काम चोख करत असेल, तर त्याच्या स्वभावावर बोट ठेवू नकोस फक्त!" धूळभरल्या टोपीतला तरुण रागाने ओरडला.

आणि प्रोखोरोवने जागेवरूनच उत्तर दिलं,

"गुसेवा, तू माझ्याएवढी हो आणि मग वयस्क पिढीबद्दल बोल. हवेत वार करते आहेस उगीच!"

"बरं, बरं!" क्लावाने उत्तर दिले. "मला गवताची आठवण उगीच नाही झाली! आपल्या डोक्यात विचार स्पष्ट असला पाहिजे. तो डोळ्यांपुढे तरळला पाहिजे आणि कल्पनेनं साकार करता आला पाहिजे! मी ते करू शकते! आपलं कालव्याचं काम झाल्यावर हा स्टेपप्रदेश कसा फुलून येईल! नुसता डुलू लागेल! आणि जेव्हा जमीन बर्फानं दगडासारखी होते तेव्हा हिवाळ्यातल्या कामाबद्दल काय बोलणार? जमीन फोडण्याच्या यंत्राच्या मदतीशिवाय या जमिनीवर काहीच करता येणार नाही. माती खणणाऱ्या दोनतीन यंत्रांना एक जमीन फोडण्याचं यंत्र दिलं पाहिजे. आणि त्याच्यासाठी आग्रह धरला पाहिजे. आणि शरद् ऋतूतल्या कामाबद्दलही मला एक विचार सुचला आहे. असं होतं की कालव्याच्या खंदकात चिखलात रुतलेल्या माती खणणाऱ्या यंत्रांना ओढून काढणारे ट्रॅक्टर घसरतात, त्यांना ते ओढून काढू शकत नाहीत. एकाद्या ठिकाणी माती काढणारं यंत्र घुसवलं तर काही काम न होता नुसता चिखलच होतो. माती न उपसता नुसता वेळच वाया जातो. म्हणून मी सुचवते की अशा ठिकाणी माती खणण्याची यंत्रं ओढणाऱ्या ट्रॅक्टरच्या मागे कोरड्या जमिनी-वर दुसरा ट्रॅक्टर उभा करावा. घसरणारा ट्रॅक्टर दोरखंडानं त्याला बांधावा आणि दुहेरी शक्तीनं काम करावं म्हणजे काम ठीक होईल."

"कदाचित हे खरंही..." प्रोखोरोव बोलत होता. पण सगळ्यांच्या पसंती दर्शक उद्गारात त्याचे शब्द बुडून गेले.

क्लावाने त्रास देणारी कपाळावरची बट मागे सारली. ती उघड्या खिडकीपाशी आली आणि खिडकीच्या कट्ट्यावर बसली. कुरणावरून उबदार वारा वाहत होता. क्लावाच्या लगेच लक्षात आले, की त्या विभागाचा प्रमुख, इंजिनियर झिमल्यानोय कुठल्यातरी अनोळखी माणसाला घेऊन माती खणणाऱ्या कामगारांच्यामधे बसला आहे. अनोळखी माणसांना तो काय सांगत होता ते तिने ऐकले.

"मुलगी अगदी निग्रही आहे!"

क्लावाने खांदे उडवले, अजब आहेत झिमल्यानोय! उत्तम पक्ष कार्यकर्ता आणि उत्तम इंजिनियर आहेत. दुसऱ्याकडून काम करवून घेणारे आणि जाणते आहेत. पण कधी कधी त्यांना नाटकी, पुस्तकी शब्द वापरून बोलायची लहर येते! कसली ही

सवय !

खरोखरच इंजिनियर झिमल्यानोय तसे बोलायचे. सहकारी पुढच्या कामाची कागदपत्रे घेऊन दररोज सकाळी जेव्हा त्यांच्याकडे यायचे तेव्हा ते एकच एक प्रश्नाने त्यांचे स्वागत करायचे.

" भावी दिवस आम्हाला काय संदेश देतो आहे ? "

झिमल्यानोय यांची बोलण्याची ही तऱ्हा नव्या माणसाला सतर्क करायची. पण लवकरच त्यांना तिची सवय व्हायची, त्यांना ती आवडायलाही लागायची. हाताखालच्या माणसांना वागायची अतिरूक्ष कामसूपणा ही एकमेव पद्धत आहे असे काही प्रमुखांचे मत असते. पण इथे त्याचा मागमूसही नव्हता.

झिमल्यानोयशेजारी बसलेला, तांबूस वर्णाचा, करड्या सुटातला तरुण कोण आहे याचा कलावा विचार करत असतानाच आनंदी चित्कारांची लाट उसळली. लठ्ठ आणि रागाने लाल झालेला सुपरिंटेंडेट कॉम्रेड गर्माश टेबलाकडे धावला.

अशा गर्शमासारख्या कॉम्रेडसना " पेटलेली माणसं " असे म्हणायची पद्धत होती त्या बांधकामावर. आणि गर्माश पूर्णार्थाने पेटलेला होता. तो ओरडून बोलत होता, संतापत होता तसाच अति-आनंदितही होत होता. त्याच्याबरोबर बोलणाऱ्या माणसाला त्याने खांदे धरून गदागदा हालवले, तक्रारी सांगितल्या आणि आपल्याच विभागाकडे सर्वात जास्त लक्ष पुरवण्याची मागणी केली. वरच्या बाजूला मोठे बटन असलेली तांबूस पडलेली टोपी मोठ्या कष्टानेच त्याच्या डोक्यावर राहात होती.

गर्माशने टोपी काढली आणि टेबलावर फेकली. तिच्यातून धुळीचा ढग निघाला. गर्माश ओरडला,

" कॉम्रेडस ! आणि मुख्यतः कॉम्रेड झिमल्यानोय ! " कुरणात ओरडावे तसं गर्माश ओरडत होता. माती काढणाऱ्या आणि माती खणणाऱ्या यंत्रांच्या खडखडाटातून ऐकू येण्यासाठी उंच आवाजात बोलायची त्याला सवय झाली होती.

" तुम्हाला विचारतोय मी कॉम्रेड झिमल्यानोय ! थोडीशीही सदसद्विवेक बुद्धी नसलेला माणूस आपल्यामध्ये इथे राहू शकतो का ? "

गर्माशने कठोरपणाने झिमल्यानोयकडे पाहिले. झिमल्यानोय फक्त गूढ हसले तेव्हा गर्माश पुरताच तापला आणि त्याने टेबलावर मूठ आपटली. अनपेक्षित आघाताने ग्लास थरथरला आणि काचेच्या जारवर आपटून किणकिणला.

" असला माणूस नक्की आहे. " गर्माश गरजला. " नक्कीच आहे ! कल्पनासुद्धा करता येणार नाही असलं रत्न सापडलंय ! कॉम्रेड झिमल्यानोय, मी माझ्या शेजाऱ्याबद्दल बोलतोय ! असले शेजारी नसते तर मी शंभर वर्षाहून अधिक जगू शकलो असतो. आणि मला अशी दुःखाची कडवट चवही माहीत झाली नसती. "

" कशाबद्दल तक्रार करताय कॉम्रेड गर्माश ? " धुळीने माखलेल्या टोपीतल्या

काळयासावळ्या तरुणाने शांतपणे विचारले.

सगळे हसले. पण गर्माशने त्या तरुणाला उत्तर दिले नाही.

" कर्ज परत करायला हवं की नको ? " दाटलेल्या गळ्याने तो ओरडला. " समजा मी किंवा दुसऱ्या एखाद्याने कष्टाने मिळवलेला रुबल उसना दिला आणि तो त्याने परत द्यायचंच नाकारलं तर बरोबर आहे का ते ? हेच मी केलं असतं तर जगातला सर्वांत हलकट माणूस म्हणून सगळ्यांनी माझी छीः थू केली असती. पण झेन्झिनोवला मात्र सगळे गुन्हे माफ ! झेन्झिनोवनं गेल्या हिवाळ्यात माझ्याकडून दहा हजार क्यूबिक मीटर माती उसनी घेतली होती. खरखरीत ओकची वाळू ! ही तर दुर्मिळ वस्तु आहे हे माहीत आहे ना ? ही वाळू त्यानं माझ्या कोट्यातून घेतली. उसनी घेतलीन आणि शपथेवर आश्वासन दिलंन ती एक महिन्यात परत करण्याचं. आणि आता दीडवर्ष झालं. ती परत देण्याचं नाव नाही. आणि माझ्यापासून तोंड लपवतो लेकाचा ! इथं या सभेत सुद्धा तो दिसत नाहीये. आणि ती वाळू मला आत्ता धरणासाठी अतिशय आवश्यक आहे. माझा प्लॅन पुरा करायला हवा की नको ? तुम्हाला विचारतोय मोठे साहेब ! "

" करायला हवा ! " झिमल्यानोयनी शांतपणाने उत्तर दिले.

" तर मग कृपा करून माझी वाळू परत करायचा हुकूम झेंझिनोवला करा. झेंझिनोव सर्वांत मिसळणारा, उत्तम कामगार आहे असं म्हणतात. तसं असेलही. पण असला या बोटावरची थुंकी त्या बोटावर करणारा कॉम्रेड मला अजूनतरी भेटला नव्हता. "

गर्माश बोलायचा थांबला. त्याला धाप लागली होती.

" बरोबर आहे ना कॉम्रेड झिमल्यानोय ? " खालच्या आवाजात त्याने विचारले आणि प्रश्नार्थक हलकेच हसत त्याने विचारले, " तुमचा निर्णय काय आहे ? "

" काय तुम्ही ? " झिमल्यानोय म्हणाले. "तुम्हाला असं म्हणायचंय का की झेंझिनोयनं तुमची दहा हजार क्यूबिक मीटर वाळू स्वतःच्या खिशात घातली ? का ती कामावर गेली ? "

" उघडच आहे, ती कामावरच गेली ! त्याच्याबद्दल कोण वाद घालतंय ? "

" मग बस करा तर ! " झिमल्यानोय निग्रहीपणाने म्हणाले, " ती वाळू जमेला न धरता प्लॅन पुरा करा. सध्या आपल्याला कर्ज बिर्ज परत करत बसायला वेळ नाहीये. "

" मग मला करण्यासारखं राह्यलंच काय ? " गर्माश दर्दभऱ्या आवाजात ओरडला.

" तुम्हाला माहीत आहे ना ती म्हण " अपयशी माणसाला देवाला दोष देत खुशाल रडू द्यावं ? शिवाय आज सर्वांत महत्त्वाचं आहे ते काम आणि काम !

कुठलीही अपेक्षा न धरता या कालव्याची स्वप्नं माणसं शेकडो वर्षं पाहात आहेत. झेंझिनोवही त्यातलाच आहे. त्याच्यावर तुम्ही अन्याय करताहात. कळलं ? का नाही कळलं ?"

"कळलं !" गर्माशने होकार दिला आणि अपराधीपणाने हसत आपली धुळीने माखलेली टोपी डोक्यावर ठेवत म्हणाला, "झेंझिनोव मला कुत्र्याच्या पिलासारखा बाजूला टाकायचा ते फक्त मला चमत्कारिक वाटायचं. माझ्या कामात काही खंड पडणार नाही हं, मोठे साहेब !"

"ते मला माहीतच आहे कॉम्रेड गर्माश ! थांबा. इथे आपल्याकडे लेनिनग्राडहून पाहुणे आले आहेत. आपल्या प्रकल्पाचा आणि आपल्या कामाच्या पद्धतींचा संपूर्ण परिचय करून घेण्यासाठी इंजिनियर स्तारोस्तिन आपल्या इथे आले आहेत. प्रथम त्यांना धरण दाखवा..." झिमल्यानोयनी सबंध खोलीभर नजर फिरवली आणि क्लावावर स्थिर केली. क्लावा मान फिरवून खिडकीबाहेर पाहू लागली. तिथे आता पाहाण्यासारखे काहीच नव्हते. फक्त धुळीने माखलेली गाडी उभी होती. ती ड्रायव्हर ओल्या फडक्याने पुसत होता.

"आणि कॉम्रेड गुसेवाही तुमच्याबरोबर येतील." झिमल्यानोयनी सांगितले. उत्तम माती खणणाऱ्या कामगारांची प्रतिनिधी आहे ती ! तिला फायद्याचंच होईल तुमच्याबरोबर जाणे !"

"किती गोष्टी लक्षात ठेवतात हे झिमल्यानोय !" क्लावाच्या मनात विचार आला आणि तिने कृतज्ञतेने झिमल्यानोयकडे पाहिले. हे बांधकाम संपल्यावर आपण हेड्रॉलिक इंजिनियर होणार आहोत असे ती त्यांना म्हणाली होती, ते त्यांनी बरोबर लक्षात ठेवले होते.

"माझ्याजवळ धरणावर जायचा परवाना नाहीये." ती प्रकटपणाने म्हणाली.

"मुलींना कधी कुठे दारं बंद असतात का ? आत जायला तुला परवानगी लागते काय ? ते काही नाही तू जाच त्यांच्याबरोबर ! करू व्यवस्था काही तरी !" झिमल्यानोयनी सांगितले.



स्तारोस्तिन गर्माश आणि क्लावा लांबलचक लाकडी घरातून बाहेर आले तेव्हा काँक्रिटच्या कामावरची पाळी संपलेला कोंद्रातीय सिदेरेको त्यांच्याजवळ येत म्हणाला,

"तुम्हाला त्रास देतोय त्याबद्दल आगाऊच क्षमा मागतो. पण मला फक्त तुमच्या बरोबर यायची परवानगी द्या. कारण मी इथला सर्वांत जुना रहिवासी आहे. लोकांच्या डोक्यातसुद्धा कधी आलं नव्हतं, की कधी तरी इथं कालवा होईल किंवा शेतीला पाणी मिळेल म्हणून. त्यावेळेपासून मी इथे राहातोय्. म्हणून भूतकाळातल्याही

काही गोष्टींबद्दल मी सांगू शकेन."

स्तारोस्तिन शांत आणि अबोल माणूस वाटला. ते फक्त प्रश्न विचारत होते. पण स्वतः मात्र अगदी कमी बोलत होते. ते फार गोड पण किंचित् लाजून हसायचे. अतिशय नम्र होते ते! सदोदित क्लावाला प्रथम जाऊ द्यायचे आणि त्यामुळे ती गोंधळून जायची.

धरणाबद्दल, कॉंक्रिटचा थर देण्याच्या नव्या पद्धती, पंपिंग स्टेशन, फिल्ट्रेशन याबद्दल गर्माशला आणि माती खणण्याच्या कामाबद्दल क्लावाला स्तारोस्तिन माहिती विचारत होते. क्लावाला अगदी स्पष्ट कळून चुकले, की स्तारोस्तिन हे स्वतः मोठे इंजिनियर आहेत, प्रकल्पाचे प्रणेते आहेत. गर्माशपेक्षा त्यांना खूपच माहिती आहे. त्याहीपेक्षा बांधकामावरच्या कामगारांच्या जीवनक्रमातल्या बारीक सारीक गोष्टींबाबतही ते फार बारकाईने लक्ष घालत आहेत. त्याने क्लावा चकित झाली.

गर्माशने पुष्कळ आकडे सांगितले. दाण्यासारखे आकडे पेरत होता तो आपल्या संभाषणात! सुपरिंटेंडेंटला स्वतःचे भाषण आकडेवारीने सजवायला फार आवडायचे. त्याची क्लावाला सवय होती. पण आकडेवारी अगदी जपून वापरली पाहिजे, विशेषतः जेव्हा आपण आपल्या प्रकल्पात आणि योजनात प्रचंड प्रमाणात साधनसामग्री वापरतो तेव्हा तर आकडेवारी जास्तच काटेकोरपणे, लक्षपूर्वक वापरली पाहिजे असे जेव्हा स्तारोस्तिननी सुचवले तेव्हा ती आणखी चकित झाली.

"बरोबर आहे!" गर्माशने दुजोरा दिला. पण क्लावाला नक्की माहीत होते, की स्तारोस्तिन यांचे म्हणणे त्याला मुळीच कळलेले नाही.

"हे आमच्या पक्ष संघटनेचे सेक्रेटरी कॉम्रेड कार्पोव." क्लावाने ओळख करून करून दिली. "आकडेवारीच्या बाबतीत अजोड माणूस आहे. एवढंसं काही झालं, की ताबडतोब स्वतःच्या छोट्या वहीत पहातील आणि असे काही आकडे सांगतील की तुम्ही जन्मभर विसरणार नाही. त्यांनी नुकताच एक हिशेब सांगितला. मोठ्या स्वयंचलित माती खणणाऱ्या यंत्राच्या १० कामगारांनी कामाच्या पहिल्या वर्षी इतकी माती काढली की हातांनी जमीन खणणाऱ्या १७ जणांना तितकी माती काढायला पाचशे वर्षे लागली असती."

क्लावाला स्तारोस्तिन आणखी एका कारणासाठी आवडला. भोवतालची यंत्रे आणि माणसेच फक्त त्यांचे लक्ष वेधून घेत नव्हती, तर प्रत्येक चांगल्या गोष्टीकडे त्यांचे लक्ष जात होते.

ते जेव्हा धरणावर उभे होते तेव्हा सूर्य कुरणाच्या काठावर अस्ताला जात होता. सगळी पश्चिम दिशा सोनेरी प्रकाशाने झळाळत होती. त्याकडे पाहून ते म्हणाले,

"पहा, पहा, किती सुंदर प्रकाश! काय सामर्थ्य आहे प्रकाशाचं!"

पण गर्माश कुरकुरणाऱ्या सुरात म्हणाला, बांधकामामुळे उठणाऱ्या [illegible]

प्रकाश थोडा गढूळ झालाय्! क्लावा मान बाजूला वळवून हसू लागली. खरोखरच स्टेपमधे आता फारच छान दृश्य होते. सूर्यास्ताच्या पट्ट्यावर माती खणणाऱ्या यंत्रांचे दांडे समुद्रातल्या जहाजांच्या डोलकाठ्यांसारखे दिसत होते. सिदेरेन्को आदब्रीने जरा खाकरला आणि बोलला,

" कुठलाही अडथळा न येता साऱ्या स्टेपभर प्रकाश नुसता सांडत असतो. दिवसभर सूर्य सगळं कुरण पालथं घालतो. त्यामुळे तो किती थकून जात असेल!

स्तारोस्तिनना हसू आले. नंतर त्यांनी सिदेरेन्कोंना त्याच्या जीवनाबद्दल विचारायला सुरुवात केली. गर्माशने निरोप घेतला आणि तो निघून गेला. पण क्लावा थांबली. स्तारोस्तिनला आणि क्लावाला आपल्या घरी बोलवायचे सिदेरेन्कोने ठरवले. त्याचे घर घळीच्या उतारावर कुरणातल्या वस्तीच्या सीमेवर होते.

स्तारोस्तिन जायला तयार झाले. ते पडीक जमिनीवरून वस्तीकडे गेले. आकाश आता विझले होते. गुलाबी जांभळे दिसत होते. कुरणातून चेब्रोत्सचा वास दरवळत होता. विझणाऱ्या आकाशाच्या पोकळीतून कुठे कुठे चांदण्या डोकवायला लागल्या होत्या.

सिदेरेंकोच्या घरात खोलीच्या मध्यभागी एका टबात लावलेले, फिकट पानांचे छपरापर्यंत फांद्या वाढलेले " चायना "चे झाड होते.

सिदेरेंकोची म्हातारी बायको पाहुण्याकडे पाहून हळूच हसली. तिथे टेबलावर घातलेल्या क्रॉस विणलेल्या टेबलक्लॉथवरच्या सुरकुत्या नीट केल्या आणि सुरकुतलेला रापलेला हात टेबलक्लाथवरून फिरवत राहिली.

" आमची पाखरं सबंध देशात उडून गेली आहेत. " सिदेरेंको म्हणाला. " पण जेव्हा त्यांना कळेल की आपल्या भागात कालवा होतोय्, तेव्हा ती परत घराच्या ओढीनं परत येतील. तुम्ही माझ्या आयुष्याबद्दल मला विचारलंत. पण मी काय सांगू? मला साठावं वर्ष आहे म्हणून सांगू? जसं या स्टेपमधे पहाण्यासारखं काऽऽही नाही, तसंच माझ्या आयुष्यात सांगण्यासारखं काही नाही. बी पेरलं, लावणी केली. अर्ध्या उन्हाळ्यातच विहिरीचं पाणी संपणार नाही अशी काळजी घेऊन तिच्या पाण्यानं मोठ्या कष्टानं बागा शिंपल्या. ऊनच ऊन! तीन तीन महिन्यांत एकही काळा ढग दिसायचा नाही. फक्त सूर्य! वारा आपला वाहातोय्, वाहातोय्! दिवसपाळीचा कामकरीच जसा! इथे वारा अंगावरचं काम करतो. जमीन पहाल, तर ओलाव्याच्या अभावी कशी तडकतेय्. झाडांकडे पहाल तर उन्हाळ्याच्या मध्यावर पानं कशी करपून जाताहेत आणि गळून पडताहेत ते दिसेल. मुळं खणून काढली तर तीसुद्धा सगळी सुरकुतून गेलेली दिसतात. आणि मग मनात येतं, कशा करता मी इथं यातना भोगत राहिलोय्? जगाच्या पाठीवर दुसरी चांगली ठिकाणं नाहीत का राहायला? आमच्या वाडवडिलांनी राहाण्यासाठी ही जागा निवडली यात माझा काय दोष?

इथली जमीन खरोखरच चांगली आहे, सुपीक आहे. अगदी खरं आहे ते! फक्त तिला पाणी हवं होतं. आणि पाणी तर इथं मुळीच नव्हतं. माफ करा हं! जगाच्या प्रारंभापासूनचं काहीतरी सांगत बसलो मी आपला! व्होल्गा नदी जवळून वाहाते, डॉन नदी जवळून वाहाते, आणि आम्हाला मात्र एकही नदी नाही की पावसाचा थेंब नाही! नाही म्हणायला एक दुबळी नदी आहे. उन्हाळ्यापर्यंत तिच्या जागी फक्त घाण पाण्याचं डबकं शिल्लक राहातं. सगळाच आनंद! हे असं होतं आमचं जिणं. जिप्सी—फार धाडसी जात! पण तेसुद्धा इकडे यायला धजावले नाहीत कधी. आणि कोरडा “ आस्त्राखान ” वारा कसा वाहातो? सगळं उडवून लावतो, दृष्टीच्या पली-कडे उडवून लावतो. वाळूचे सपकारे मारतो. विश्वास बसणार नाही तुमचा, पण वाटतं कोणत्याही क्षणाला घर मोडून तोडून जमिनदोस्त करील. कणसं आलेली ताटं मुळा-सकट उन्मळून टाकतो, दूर उडवून लावतो. या असल्या वाऱ्याला मुळी अंतच नाही रात्री आडवं झालं, झोप लागली की जरा हलका पडतो. पण सकाळी जागे होऊन पहावं तर पुन्हा घोऽऽघोऽऽ ओरडत असतो. आणि खिडकीतून बाहेर पाहावं तर अंधारून आलेलं. त्या धुरकट प्रकाशात लाललाल सूर्य अधांतरी लोंबत असल्या-सारखा दिसतो. आपल्या एकाच क्रूर डोळयानं या बिचाऱ्या स्टेपप्रदेशाकडे पहात असल्यासारखा वाटतो. ”

सिदेरेंको वर्णन करत होता आणि म्हातारी आपला काळवंडलेला तळवा टेबलक्लॉथ वरून फिरवत राहिली होती. मधून मधून मान डोलवून नवऱ्याच्या शब्दांना दुजोरा देत होती.

स्तारोस्तिननी तिच्या सुरकुतलेल्या बोटांकडे पाहिले. आणि त्यांना वाटले, ही बोटे सुद्धा रखरखीत हवेने वाळून गेली आहेत—इथल्या वाऱ्यामुळे पाने करपून जातात तशी! बहुधा कधी काळी हे हातही गुबगुबीत सुंदर असतील!

शेकडो वर्षे दरसाल पूर्वेकडून हे वादळ धुळीच्या लाल लाल जिभल्या चाटत या भागावर चाल करत राहिलंय! आक्रमक, मोकाट सुटलेले, दुष्ट, जिवंत दिसेल त्या सगळयाचा नायनाट करणारे वाळवंट! “ इथली फक्त एकच गोष्ट ते नष्ट करू शकले नाही! इथली माणसं आणि त्यांच्या मनातली नवनिर्मितीची इच्छा, कष्ट करण्याची इच्छा! ” स्तारोतिनच्या मनात विचार आला.

सगळेजण विचारात गढून जाऊन गप्प झाले होते. कशामुळे कोण जाणे पण या बुटक्या, अंधाऱ्या घरात बसून त्यांना आपल्या बांधकाम खात्याच्या हवेशीर दालनाची, नीवा नदीवरच्या धुक्याने आच्छादलेल्या आकाशाची, नकाशांची आणि पुन्हा पुन्हा तपासून बनवलेल्या प्लॅन्सची आठवण आली.

किती झपाट्याने दिवस संपताहेत! तीन दिवसांपूर्वी मी लेनिनग्रामधे होतो. नंतर बासार्गिनबरोबर विमानाची सफर. भव्य बांधकाम, वेगाने चाललेल्या कामाची दृश्ये,

कलाचमधली सभा आणि अखेरचे दिवस मोजणारे हे घर, त्यातले वेडेवाकडे वाढलेले हे टबातले चायनाचे झाड !

सिदेरेंकोने काळजीपूर्वक काळया तंबाखूची एक बिडी वळली. आणि जमिनीवर दृष्टी खिळवून ती ओढू लागला. दिवसभरातल्या साऱ्या घटनांनी उत्तेजित झालेली क्लावा टेबलावरचा " अगन्योक " (आग ) चा जुना अंक चाळू लागली. ती आपल्या कडेच चोरून पहाते आहे असे स्तारोस्तिनला उगीचच वाटायला नको म्हणून नजर वर करून पाहायचीही तिला भीती वाटत होती.

उन्हाळयातली वीज अंधारात चमकत होती तिच्याकडे स्तारोस्तिन खिडकीतून पहात राहिला.

" फक्त मायेपोटी मी इथलं कठीण आयुष्य कंठलं. " अचानक म्हातारी खालच्या आवाजात बोलली. फक्त डोळयाभोवतीच्या सुरकुत्यांच्या हालचालीमुळे ती हसल्यासारखी दिसली. " आयुष्यभर या कठीण स्टेपप्रदेशात राहिले. कोंद्रातची मला कीव यायची. दुसरीकडे कुठं जाणार तो इथून ? आणि मी पण तरुण होते तेव्हापासून ती थेट आजतगायत सतत त्याच्याबरोबरच राहिले. मुलांची नाही मला कीव येत. त्यांच्यावर प्रेम करायचं मला कळतं. पण त्यांची कीव करणं—ते काही मला जमत नाही. मुलांचा मार्ग त्यांना मोकळा आहे. त्यांनी आमच्याबरोबर राहिले पाहिजे असं नाही. तीन मुलं होती आम्हाला. आणि चवथा बंक्या—तो मागेच २० वर्षांच्या खालीच वारला.

" ए बये ! " सिदेरेंको बोलला. " पाहुण्यांपुढं कशाला त्या दुःखाच्या कहाण्या आठवतेस ? काय मिळणार त्यातून ? "

" मला नाही ठाऊक. काही मिळेल किंवा मिळणार पण नाही. त्यांचं तेच ठरवतील. " अपराधी सुरात म्हातारी उत्तरली.

" सांगा ना आजी तुम्ही ! तेवढंच तुमचं दुःख जरा हलकं होईल, " क्लावा म्हणाली.

" हंऽऽ, होईल कदाचित् ! " त्याने कबूल केले.

" काय सांगू ? मी स्वतः तगानरोगमधून इथं आले, आझोव समुद्राच्या भागातून. आमचा भाग समुद्रकिनाऱ्याचा. मजेदार आनंदी जीवन तिथलं ! त्यामुळं इतर बायकांपेक्षा जास्तच जड गेलं हो मला इथं ! आमच्याकडे, तगानरोगमधे झोपडीभोवती सगळीकडे फुलझाडं लावतात. बारविन्की, तबाक, सूर्यफुल. माळावरची सूर्यफुलं असतात तसली नाहीत हं, पण त्याच प्रकारातली दुसरी सूर्यफुलं असतात. ती फक्त शोभेसाठी लावतात. आमचा बंक्या सूर्यफुलासारखा होता. अति खेळकर हसरा आणि वाऱ्यासारखा चपळ ! आता इथं तर क्षणात तिकडं. कधी म्हणून घरात नसायचा. सारखा काहीतरी गुणगुणत राहायचा. चिमणी सारखी चिवचिव चालायची

त्याची. सगळ्या गोष्टींची उत्सुकता त्याला! प्रत्येक गोष्ट कळली पाहिजे त्याला! तो तिकडे तगानरोगमधे असायला हवा होता, समुद्राच्या सान्निध्यात! पण ते काही आमच्या मर्जीवर अवलंबून नव्हतं. एकट्या बंड्यासाठी सारं घरदार का सोडायचं? आणि त्यावर्षी असा काही दुष्काळ पडला की कुणी जन्मात पाहिला नव्हता. काळ्यासावली-सारखी उपासमार सगळ्या स्टेपभर पसरली. विहिरी सगळ्या आटून गेल्या. त्यावर्षी आम्ही पाण्याऐवजी गाळच घरी आणायचो घागरीमधून. माझा बंड्या आजारी पडला. धुळीमुळं. छातीत त्याच्या सूज आली.

"धुळीमुळे न्युमोनिया झाला त्याला?" स्तारोस्तिन बोलले.

"पुष्कळ जण त्या धुळीनं आजारी पडली, पण बाकीची वाचली. हा दोन दिवस नुसता तापला होता. कोंद्रात घरी नव्हता. दुसऱ्या दिवशी बंड्याला उचललं आणि क्रिवाया मूझ्गाकडे धावत सुटले. कुणीतरी सांगितलं होतं, तिथं डाक्टर आहे. वाळूच्या वादळानं मला चारी बाजूंनी घेरलं. काऽऽही दिसत नव्हतं. वाळक्या जाळ्यांमधे वारा घोंघावत होता. आता आकाश अंधारून आलं. मी आपली पळतेय. काहीच कळत नव्हतं मला काय होतंय ते! शिवाय आभाळात जोरजोरानं गडाडायला लागलं नुसतं घाबरवण्यासाठी. पाऊस नाही तो नाहीच! माळावरच रात्र झाली. एकदम वीज चमकली. सगळं उजळून टाकणारी. सगळीकडे पाऊलवाटाच दिसायला लागल्या. वेगवेगळ्या दिशांनी जाणाऱ्या. एका वाटेवरून दुसऱ्या वाटेवर अशी मी पळतच होते. माझी स्मरणशक्तीच नाहीशी झाली. कुठं जावं, काय करावं काही कळेनाच. दिसत होतं की वाट चुकतेय. थांबायचं, बंड्याचा श्वास चालू आहे का पहायचं आणि पुन्हा धावायला लागायचं! उजाडेपर्यंत अशी सगळ्या स्टेपभर फिरले. धुरळ्याच्या पड्या तून सूर्य वर आला. पण बंड्याचा श्वास थांबला होता. चहुबाजूला नजर टाकली— काहीच ओळखीचं नव्हतं. स्टेपमधे सगळं सारखंच दिसतं."

"त्याऽऽ तिथं आम्ही त्याला मूठ माती दिली," म्हतारीने खिडकीत पलीकडे मान वळवून दाखवले. "तिथे एक टेकाड आहे. त्या टेकडावर एक झुडूप वाढतंय. सगळ्या ओसाडीत एकुलतं एक झुडुप. दोन वर्षांमागे इथे मोजणीवाले आले होते. मोजमापं घेतली–कुठं कालवा होणार, कुठं धरण होणार, कुठं तलाव होणार त्याची आखणी केली. त्यांच्याबरोबर एक माणूस होता. त्यांचा मुख्य दिसत होता. केस पिकलेला, बुटकासा, चष्मा घातलेला. त्याची दृष्टी फार चाणाक्ष होती सगळं हेरणारी. सकाळीच तो आमच्या घरापाशी आला आणि म्हणाला. "तिथं माळावर तुमच्या कुणाचं थडगं नाही ना?" आम्ही त्याला सगळं सांगितलं. तो म्हणाला, "तर मग ते दुसरीकडं हालवलं पाहिजे. कारण जिथं ते आहे ती जागा पाण्याखाली जाणार आहे तिथं पाण्याचा खजिना होणार आहे."

"कोंद्रातनं ते हालवायची तयारी केली. पण मी म्हटलं, मी मुळीच त्याला तयार

नाही. आमचा बंड्या जिथं झोपलाय तिथंच असू दे. ते तळं खुशाल त्याच्यावर भरू दे. लोकांना अन्न देणारं ते स्वच्छ पाणी खुशाल त्याच्यावर नाचू दे! त्याच्या थडग्या वर त्याचं नाव नाही राहिलं म्हणून कुठे बिघडलं? लढाईनंतर या स्टेपमधे अशी किती तरी सैनिकांची थडगी आहेत! कुणाला माहीत आहेत काय नावं होती त्या सैनिकांची? पण ती सगळी थडगी आम्हाला आपलीच वाटतात, आमच्या आप्तां· चीच वाटतात!" म्हातारी गप्प झाली.

खिडकीबाहेर खूपच जोरानं विजा चमकत होत्या. दूर कुठेतरी मुली गाणं गात होत्या. त्यांचे आवाज जवळही येत नव्हते किंवा दूरही जात नव्हते. बहुधा त्या एकाद्या टेकडीवर बसून आकाशातले लखलखीत दिवे कसे तेवताहेत ते पहात गात असाव्यात. गाणं जुनंच होतं. सगळयांच्या परिचयाचं.

उषा स्वागत करते आपलं सुखद गारव्यानं,
नदी स्वागत करते वाऱ्याच्या नर्म झुळकीनं.

जेव्हा स्तारोस्तिन क्लावासह आपल्या विभागात परत आले तेव्हा क्षितीजावर प्रकल्पावरचे दिवे झगमगत होते. साऱ्या माळावर शांतता होती. सुकलेल्या वर्मवुडचा वास दिवसापेक्षा अधिक जोराने घमघमत होता.

रस्त्यातून येताना क्लावानं भीतभीतच विचारले इथे त्यांचे काम काय आहे. स्तारो स्तिननी सांगितले, ते ज्या प्रकल्पाचे काम करत आहेत त्यातल्या स्पष्ट न झालेल्या काही प्रश्नांसंबधी इथे पाहाणी करण्यासाठी ते आलेले आहेत.

झिमल्यानोय अजून घरी आले नव्हते. जवळ जवळ रोजच रात्री खूप उशिरा ते आपल्या विभागातून घरी परत येत.

स्तारोस्तिननी खिडक्या उघडल्या. ते आडवे झाले आणि लांबून येणारा आवाज कान देऊन ऐकत राहिले. ना दिवसा ना रात्री थांबणारा तालबद्ध, कणखर आवाज! वाटत होते की अखंडपणे वर काढल्या जाणाऱ्या मातीचाच तो आवाज आहे!

रात्रीची शांतता काळोख्या क्षितिजापर्यंत मागे हटली होती. माणसाच्या अपार श्रमापुढे ती नमली होती. प्रकल्पाच्या पलीकडच्या बाजूला, जिथं चांदण्या जास्त ठळक दिसत होत्या तिथून, वर्मवुडच्या निर्मनुष्य पोकळीतून सावधचित्त झालेली ती शांतता माणसाच्या उद्योगीपणाकडे लक्षपूर्वक पहात होती.

स्तारोस्तिन इतर तरुण इंजिनियरांप्रमाणेच सैबेरियातील जमिनीच्या पाणथळ-पणाच्या प्रश्नावर काम करत होते.

त्यांना कल्पना होती की भविष्यकाळात त्यांना इथेच—या वोल्गा डॉन कालव्या-वरच काम निर्माण होणार होते. इथे बांधकामातल्या कुशल कारागिरांची फौजच निर्माण होते आहे. इथे माणसे कामाच्या नवनव्या पद्धतींचा शोध घेत आहेत. इथे सर्वांत मोठा अनुभव जमा केला जातोय! काहीही हातचे न राखता त्या सगळ्या

अनुभवाचा उपयोग नंतर नव्या प्रकल्पांवर केला जाणार आहे.

आपण नुसते प्रेक्षकच नाही, तर या लोकविलक्षण ऐतिहासिक घटनेचे प्रत्यक्ष भागिदार आहोत या विचाराने स्तारोस्तिनची पाठ कधीच सोडली नाही. मागल्या शतकातल्या लेखकांनी आताच्या ह्या कालखंडाबद्दल "इतिहासाची आगेकूच" करणारा कालखंड असे वर्णन केले होते. पण ती कल्पना मात्र काही केल्या त्यांच्या अंगवळणी पडत नव्हती. भविष्यकाळाचा इतिहास त्यांना जास्त निकटचा वाटत होता, भूतकाळाचा नाही.

आत्ता, इथे असे आडवे पडून, लांबून येणारा यंत्रांचा आवाज ऐकत स्तारोस्तिन त्याबद्दलच विचार करत होते. प्रकल्पावर जळणाऱ्या दिव्यांचा प्रकाश दूरवरून खोलीत शिरला होता.

"ठीक आहे!" स्तारोस्तिन स्वतःशीच म्हणाले "हे विचार माझ्या पासून कधीच अलग व्हायचे नाहीत असं दिसतंय!"

जमिनीखालच्या पाण्याने होणारी धरणाची धूप थांबण्यासाठी कोणती नवी साधने इथे वापरली जाताहेत ते समजून घेण्याची त्यांना तीव्रतेने इच्छा झाली. "ठोकळे-बाजपणाने ती आपल्या प्रकल्पात वापरता उपयोगी नाहीत" त्यांच्या मनात विचार आला.

# ६

मला वोल्गा-डॉन प्रकल्पावर जाण्याचा प्रथम योग आला तो १९५१ सालच्या शरदऋतूत ! माझ्या प्रवासाला मी स्टालिन ग्राडपासून सुरुवात केली.

स्तालिनग्राडमध्ये माझी खात्री पटली की आपल्या देशातले सगळे प्रकल्प एकमेकांशी इतके निगडित आहेत की जिवंत व्यक्तीचे जसे तुकडे करता येत नाहीत तशी ही बांध-कामेही अलग करणे शक्य नाही. सर्व प्रकल्प अशा तऱ्हेने तयार केले आहेत की ते सुसंगतपणे परस्परावलंबी व परस्पर पूरक व्हावेत.

हा विचार इथे स्तालिनग्राडमध्ये अधिक स्पष्टपणे प्रत्यक्षात उतरलेला दिसतो. महायुद्धात फॅसिस्टांना चारीमुंड्या चीत केल्याने मिळालेल्या कीर्तीच्या हवेने भारलेले स्तालिनग्राड आता निसर्गाच्या पुनर्रचनेच्या कार्याचे मुख्य केंद्र बनले आहे.

स्तालिनग्राडजवळ वोल्गावर सर्वात मोठे धरण, सर्वात मोठे हैड्रोइलेक्ट्रिक पॉवर स्टेशन बांधण्याचे काम चालू आहे. शिवाय स्तालिनग्राडजवळ, पूर्वीच्या सऱ्येप्ताच्या पलीकडे वोल्गा-डॉन कालवा सुरू होतो.

या काळपट तपकिरी रंगाच्या स्टेपप्रदेशात इमारती, मनोरे, स्तंभ, दुतर्फा झाडी असलेले प्रशस्त रस्ते यांनी सजलेले सुंदर स्टालिनग्राड इतक्या भरभर उभे राहात आहे की जणू समुद्र फेस गोठून त्यातूनच ते अलगदपणे नव्यानं वर येतंय !

या शहरातल्या नव्या रस्त्यांच्या आणि चौकांच्या प्रशस्त जागांवर सफेद स्वच्छ सूर्यप्रकाशाचे रुंद पट्टे उमटतात. त्यांच्यावर रस्त्यांच्या कडेच्या आणि गॅलऱ्यात लावलेल्या दाट फुलांच्या सुवासाने भिजलेल्या शीतल सावल्या पहुडलेल्या असतात.

वाऱ्यावर फडफडणाऱ्या सैनिकी कोटातला ब्रांझचा सैनिक ग्रॅनाईटच्या चबुतऱ्यावर अभयदर्शक हात उंचावून खडा आहे. नव्याने उभारणीच्या कामात गुंतलेल्या आमच्या मातृभूमीवर येऊ पाहाणाऱ्या शत्रूंच्या हालचालींना तो जणू त्यांची मर्यादा दाखवून देत आहे. सूर्याचे कोवळे किरण जेव्हा त्या उंचावलेल्या हातांवर चमकू लागतात त्या वेळी सबंध शहर मात्र अजून पहाटेच्या अस्फुट अंधारात आणि पानांच्या मंद सळसळीत गुरफटलेले असते.

हे सबंध शहर पहायचे असेल तर मार्केटपासून क्रास्नोआर्मेइस्कपर्यंत वोल्गा डॉन-कालव्याच्या मुखापर्यंत ६० किलोमीटरचे अंतर काटले पाहिजे. ६० किलोमीटर ही नव्या स्टालिनग्राड शहराची लांबी आहे. वोल्गाच्या किनाऱ्याला समांतर अशा नव्याने बांधल्या जाणाऱ्या "स्टालिन मार्गा"ची लांबी इतकीच आहे. सर्व जगातला सर्वात लांब शहरी रस्ता आहे तो!

टँक बसवलेले ठिकठिकाणचे ग्रॅनाइटचे चौथरे महायुद्धाच्या काळातली संरक्षण रेषा दाखवून देतात. ती नागमोडी असून कुठे ती वोल्गाच्या किनाऱ्याला भिडलेली आहे तर काही ठिकाणी ती थेट शहरात घुसलेली आहे. चौथऱ्यांच्या पायथ्याशी रानफुलं उगवलेली असतात.

स्मारके उभारून गतकाळाची स्मृती चिरंतन व्हावी असा प्रयत्न आम्ही नेहमी आवर्जून करतो. अशा त्या स्मारकांवर—भूतकाळाच्या साक्षिदारांवर, मानवी शौर्याचे तेज चढलेले असते.

स्टालिनग्राडमधल्या वोल्गाच्या किनाऱ्यावरून स्फोटाच्या धगीने एकमेकींना घट्ट चिकटलेल्या काही गोळ्या मी गोळा केल्या. त्या अजूनही मांझ्या लिहिण्याच्या टेबलावर कवी आणि लेखकांच्या छायाचित्रांच्या, पुस्तकांच्या सानिध्यात विसावलेल्या आहेत. त्यांचा तो अधिकारच आहे. कारण वोल्गा किनाऱ्यावरचे वाळूचे कण चिकटलेल्या त्या धातूच्या तुकड्यांवर आमच्या मातृभूमीचे रक्षण करण्याचे कार्य सोपवलेले होते. त्यांनी त्या संस्कृतीचे रक्षण केले, ही पुस्तके वाचवली आणि पुष्किन–गेईनच्या, टॉलस्टॉय-बाल्झाकच्या, गॉर्की–शेक्सपीयरच्या ग्रंथांचा वारसा जराही धक्का लागू न देता भावी काळाच्या स्वाधीन केला.

स्टालिनग्राड हे वोल्गा-डॉन कालव्याचे प्रवेशद्वार आहे. हा कालवा स्टालिनग्राड-पासून सुरू होतो म्हणूनच केवल त्याला प्रवेशद्वार म्हटले जात नाही, तर हे शहर सदोदित उत्साहपूर्ण नवनिर्माणाच्या कार्याने काठोकाठ भरलेले असते. निसर्गाच्या पुनर्रचनेत गुंतलेल्या इथल्या लोकांचा तो सहजभावच आहे. म्हणून हे शहर कालव्याचे प्रवेशद्वार मानले जाते.

अशाच एका व्यक्तीशी माझी गाठ स्टालिनग्राडमध्ये पडली. वोल्गा-डॉन कालव्यावर ते प्रत्यक्ष काम करत नव्हते. पण आमच्या देशात सुसूत्र नियोजनासाठी असलेल्या

नियमांनुसार त्या व्यक्तीचे काम कालव्याच्या बांधणीशी अतिशय जिवंत सूत्राने निगडीत होते.

ही व्यक्ती मोठ्या सरकारी हुद्यावर होती. स्टालिनग्राडजवळचे वोल्गावरचे धरण आणि हैड्रोइलेक्ट्रिक पॉवर स्टेशन याचा शिल्पकार होता तो !

“ तसे म्हटले तर आम्ही सगळेच—मी आणि तो समोरच्या इमारतीला रंग देणारा रंगारी आजकाल एकच काम करतो आहोत, ” स्टालिनग्राडच्या हैड्रोइलेक्ट्रिक पॉवर स्टेशनचा शिल्पकार म्हणाला.

सारे शहर आणि वोल्गा नदी यांना वेढून टाकणाऱ्या भरपूर सूर्यप्रकाशात एक केस पिकलेला माणूस पांढऱ्या पातळ रंगाने समोरच्या नव्या इमारतीच्या खांबांना पहिला हात देत होता. त्याच्याकडे हात करून तो शिल्पकार म्हणाला,

“ माझी कागदपत्रे, टेलिफोन, नकाशे, आरेखने आणि अहवाल या साऱ्यांतून बाहेर पडून एखादा क्षण आम्ही एकमेकांशी खुणांनी बोलतो. मी विचारतो, “ काय म्हातार-बाबा रंग देताय का ? ” ते विचारतात, “ काय रे पोरा, बांधतोयस वाटतं काहीतरी ? ” अशा प्रकारचं काहीबाही बोलतो आम्ही. हे संभाषण मोठं गंभीर आहे असं नाही. पण असल्या संभाषणानं काम करायला आणखी आनंद वाटतो, काम हलकं वाटतं. वाटतं की नाही ? तुम्हालासुद्धा पटेल ते. एखादेवेळी आपण पोरकटपणानं काही तरी गुणगुणत असतो, शीळ घालत असतो आणि एकदम आपले आपणच भानावर येतो आणि स्वतःला सावरतो. पण एखादेवेळी नेमक्या त्याच क्षणी एखादा हाताखालचा इंजिनियर किंवा तुमच्यासारखा लेखक अचानक टपकतो आणि मग इतकं चमत्कारिक वाटतं ! एखाद्या फडतुस डेअरीचं नाही, तर जगातल्या एका मोठ्या धरणाच्या आणि विद्युत् ग्रहाच्या प्रकल्पाचा शिल्पकार म्हणून तुम्ही काम करता ! शीळ कसली घालता पोरकटा सारखी ? थोडा तरी गंभीरपणा हवा ! ” असं म्हणून त्याने मोठ्यांदा हसायला सुरूवात केली. त्याचा बांधा खेळाडूचा होता. पाहिल्याबरोबर कळत होते, की त्याची शक्ती अफाट आहे. त्याच्या बारीक केलेल्या डोळ्यात त्याचे उदार मन स्पष्ट दिसत होते. पण त्यामुळे त्याच्या निश्चयी आणि आग्रही स्वभावात काही अडथळा येत नव्हता. त्याचे हाताखालचे अधिकारी म्हणत त्याप्रमाणे त्याच्या नसानसांत निश्चयी वृत्ती आणि आग्रहीपणा भरून राहिलेला होता.

हा प्रकल्पाचा शिल्पकार आपल्या कामाबद्दल अगदी सहज पण समर्पक शब्दांत बोले. कुवत आणि कल्पनाशक्ती कमी असलेल्या माणसांप्रमाणे तो बारीक सारीक गोष्टींवरच थांबत नसे. प्रथमदर्शनी समजायला अतिशय अवघड भासणाऱ्या बांध-कामाच्या गुंतागुंतीच्या विश्वात तो मला अगदी सहजपणे घेऊन गेला. त्याने बारीक-सारीक तपशील देत बसून त्या बांधकामाची रूपरेषा बिघडू दिली नाही. तर मोजक्याच वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी सांगून त्याने त्या वास्तूचा प्रचंड आवाका नजरेस आणून दिला.

आम्ही त्या वास्तूच्या विस्ताराबद्दल नाही बोललो, तर या वास्तूमुळे देशाला काय काय मिळेल याबद्दल बोललो.

या धरणामुळे सहाशे किलोमीटरपेक्षा जास्त लांबीचा आणि जवळ जवळ ३० किलोमीटर रुंदीचा पाण्याचा खजिना निर्माण होईल. त्याला भूमीअंतर्गत समुद्र म्हणायचे धाडस करायला काही हरकत नाही. या शुष्क पट्टयात एवढा मोठा कायमचा पाण्याचा साठा निर्माण होईल.

स्टालिनग्राडचे हैड्रॉलिक स्टेशन हे एक देशातले शक्तिमान विद्युतशक्तीनिर्मितीचे साधन होईल. आणि विद्युतशक्ती निर्मितीच्या साखळीतील अनेक मोठ्या दुव्यांपैकी ते एक दुवा बनेल.

" ऊर्जा ही पायाचा पाया आहे. ती मानवी जीवनाचा श्रीगणेशा आहे. कोणतीही औद्योगिक किंवा शेतीची योजना मोठं विद्युतशक्ती निर्मितीचे केंद्र असेल तरच यशस्वी होईल. जेव्हा आपण जमिनीची नांगरट विजेच्या मदतीने करून हल्लीच्या जमीन मशागतीच्या साधनांची हकालपट्टी करू तेव्हाच आपण मोठ्यात मोठा विजय संपादन केला असं ठरेल. " प्रकल्पाचा शिल्पकार म्हणाला.

" आम्ही आमच्या कल्पनेनं वारंवार अप्रतिम शहरं, चौक इत्यादी निर्माण करतो, कल्पनारम्य बगिचे उठवतो, मोकळ्या खळग्याचं रूपांतर तलावात करतो. आणि त्यात नाजूक, तलवारीच्या पात्यासारखं ताठ पाणगवत प्रथम केव्हा उगवेल म्हणून श्वास रोधून वाट पाहात असतो. "

" जगातल्या अगदी वेगवेगळ्या फळांचा वास आणि चव ज्यात एकत्र आली आहे अशा नव्या फळांचा, मनगटासारख्या जाड भरदार गव्हाच्या लोंब्यांचा, धूर नसलेल्या कारखान्यांचा, पावसाळी ढगांची हालचाल स्वतःच्या इच्छेनुसार घडवून पृथ्वीवर पाऊस हवा तेव्हा पाडण्याचा विचार आम्ही करतो. "

" आमचं हे स्वप्न आहे. पण ज्याला ही स्वप्नं प्रत्यक्षात आणण्याची संधी दिली जाते तो कितीतरी भाग्यवान असतो ! " प्रकल्पाचा शिल्पकार बोलत होता.

अशाच भाग्यवंतांपैकी एक आत्ता माझ्यासमोर बसलेला होता ! त्याने आतापर्यंत २० मोठाली जलविद्युत केंद्रे उभारली होती. पण आत्ता तो त्या केलेल्या कामांबद्दल नाही बोलला ! तो बोलत होता वोल्गाच्या डाव्या तीरावर वसवल्या जाणाऱ्या नव्या सुंदर शहराबद्दल ! आरामशीर सुंदर घरे, सुंदर शिल्पे, बागा आणि स्टेडियम उभारण्याबद्दल, झुळझुळत्या पारदर्शक पाण्याचे कालवे या शहरातल्या रस्त्यांच्या कडेने सोडण्याच्या आपल्या फार काळ जोपासलेल्या स्वप्नांबद्दलच तो बोलत राहिला.

प्रकल्पाचा शिल्पकार मूक झाला. जणू तो स्वप्नात हरवला होता. स्वच्छ प्रकाशाने भरून गेलेल्या चौकातून वहात येणारा वारा खिडकीतून आत आला.

खिडकीच्या कट्ट्यावर ठेवलेल्या कुंडीतले ठिणगीसारखे लाल लाल फूल वाऱ्यावर

झुलत होते. कामवाल्याबाईने त्याला नुकतेच पाणी घातल्यासारखे दिसत होते. नाजूक शेवाळाने हिरवट दिसणाऱ्या मातीवर हवेचे बुडबुडे उठून कसे फुटत होते ते मी पाहात होतो. पाणी त्यांना मातीतून वर ढकलत होते. कसला तरी सौम्यसा नाद ऐकू येतोय असं मला वाटत होतं. मातीत मुरणाऱ्या ओलाव्याचा तर तो आवाज नसेल ना? का मुळं पाणी पीत होती त्याचा आवाज होता तो? मृतप्राय स्टेपची जमीन वोल्गाचं जीवनदायी पाणी असंच पिऊन तृप्त होईल. चुरचुर आवाज करत पाणी अलगद तिच्यात मुरेल, माती फुगीर होईल आणि ओलावा प्यालेल्या सुप्त बीजातून पाहाता पाहाता रोप झुलू लागेल, हिरव्यागार पालवीने फळाफुलांनी सुवासाने बहरणाऱ्या वृक्ष जन्माचं महान् आश्चर्य या भूमीवर घडून येईल!

"आता आपण शेवटी साहित्याबद्दल बोलू या!" प्रकल्पाचा शिल्पकार म्हणाला.

"साहित्य मला फार प्रिय आहे. नव्या पुस्तकांच्या मागावरच असतो मी! पण पुस्तकं कशी लिहिली जातात, लेखकाला त्यासाठी किती कष्ट होतात याबद्दल फारच थोडी माहिती आहे मला. मी जाणतो की अतिशय गुंतागुंतीचं पण तितकंच चित्तवेधक काम आहे ते! पण त्याबद्दल कधीच लिहिलं जात नाही. पोलाद घडवणारे, इंजिनियर, कृषितज्ज्ञ, कलावंत खलाशी यांच्या कामाबद्दल पुस्तकं सापडतात. पण लेखकांच्या श्रमाबद्दल मात्र अगदी कमी बोललं जातं. कीव येते त्यांची! उदाहरणार्थ तुमचंच पाहा ना! तुम्ही वोल्गा–डॉन प्रकल्पावर जाणार आहात. बहुधा लिहिणार असाल त्यावर?"

"वाटलं लिहावंसं, तर लिहीनही."

"तुमचं हे भावी काम नक्कीच कठीण आहे." प्रकल्पाचा शिल्पकार म्हणाला.

"नेहमीपेक्षाही अधिक कठीण आहे! मला वाटतं की ज्यांना या अवाढव्य बांधकामाचा संपूर्ण अभ्यास करायला सवड आणि संधी मिळेल अशा लोकांकडून त्यानंतरच त्याच्यावर खरेखुरे ग्रंथ लिहिले जातील. हा प्रकल्प, त्याचं ऐतिहासिक महत्त्व आणि त्याची ताकद यांची सर्वतोपरी ओळख असेच ग्रंथ करून देतील." "हे सगळं खरं असलं, तरीही आत्तासुद्धा त्याच्यावर लिहिलं पाहिजे. कदाचित तितकं चांगलं नाही होणार. पण लिहिलं हे पाहिजेच. तुम्ही प्रयत्न कराच." प्रकल्पांचा शिल्पकार म्हणाला,

"या प्रकल्पाच्या प्रथम दर्शनानं मला जे भावलं ते मी शक्य होईल तितकं लोकांपर्यंत पोचवायचा प्रयत्न करीन. पण त्यात ऐतिहासिक पुरावे शोधू नका. ते काम अधिक सामर्थ्यवान माणसं करतील. म्हणून तुम्ही जर या कथेत आलात तर तुमचं खरं नाव, तुमच्या जीवनातल्या ठळक गोष्टी, तुमचं वर्णन त्यात सापडणार नाही. पण तुमची काही वैशिष्ट्ये आणि विचार तुम्हाला कदाचित ओळखीचे वाटतील." मी म्हटले.

"मग काय बिघडलं त्यात? मला अपमान नाही वाटणार त्यात." प्रकल्पाचा

शिल्पकार बोलला. " मग काय ? आपलं ठरलं ना ? "

" त्या रंग देणाऱ्या माणसाशी जमलं तसंच ना ? " मी विचारलं.

" हो हो ! तसंच का म्हणाना ! " प्रकल्पाचा शिल्पकार हसत म्हणाला. आम्ही एकमेकांचा निरोप घेतला.

मी बाल्कनीत आलो. वोल्गाचे अफाट संथ पाणी शहराजवळून वाहात होते. माझ्या मनात विचार आला, आता, इथे, कुंडीतले फूल डुलतंय त्या माझ्या पाठीमागच्या खोलीत आरेखनात मग्न झालेला, ज्याच्यावर देशातले हे अद्वितीय काम सोपवले आहे असा माणूस बसला आहे. त्याचे शब्द मला आठवले " आपल्या देशाला ऊर्जा-शास्त्रातला खूपच अनुभव आहे. त्यामुळे अती कठीण अशा अडचणी या धरणाच्या आणि विद्युत गृहाच्या बांधकामात येतील असं मला वाटत नाही. " ते शब्द त्यांनी अत्यंत शांतपणाने आणि आत्मविश्वासाने उच्चारले होते. प्रत्यक्ष कार्यात सहभागी असलेल्या तंत्रज्ञाचे शब्द होते ते ! माझ्या मनात विचार आला की जणू हे बोलणे जगातल्या अवाढव्य प्रकल्पाबद्दल नसून एखाद्या खेड्यातल्या लहानशा विद्युत्‌गृहाबद्दल असावे इतक्या सहजपणे त्या प्रचंड प्रकल्पाबद्दल त्याचा शिल्पकार बोलतो तेव्हा त्या देशाने किती मोठी ताकद संपादन केली असेल, तिथले लोक किती प्रगत झालेले असले पाहिजेत आणि तिथले शास्त्रीय आणि तांत्रिक ज्ञान किती उंचीवर पोचले असले पाहिजे !

मी वोल्गावर नजर टाकली. तिचा दुसरा किनारा मोठ्या प्रयासानेच दिसत होता. आमच्या जनसागरासारखीच ही नदी आहे ! विशाल !

# ७

दररोज रात्री आपल्या विभागातून परत आल्यावर झिमल्यानोय दाढी-आंघोळ करायचे आणि टर्किश टॉवेलने अंग पुसत स्तारोस्तिनना म्हणायचे, " कुठेच दिवस गेला ! दिवसभर तरंगत्या धुरळ्यातून यंत्रं ढगांसारखी जात होती. धरणाच्या दिशेनेच ! "

" तुम्ही नेहमी रात्री का दाढी करता ? " स्तारोस्तिन विचारायचा " सकाळी वेळच नसतो, " झिमल्यानोयनी उत्तर दिले. " शिवाय प्रकल्पांवरचे ते पहिले दिवस इतिहास जमा झाले आहेत. तुम्ही लहान आहात. आपल्या देशातली पहिली कामं तुम्हाला आठवत नसतील. ती तुमच्या किशोरवयात झाली. त्यांच्याबद्दल तुम्हाला आठवत असतं तर त्यातून तुम्ही पुष्कळ गोष्टी शिकला असतात. पहिली पहिली बांधकामं म्हणजे गोंधळ होता नुसता ! प्लॅस्टरच्या शिंतोड्यांनी चितारलेल्या भिंती, उखणलेली जमीन, ट्रकने तुडवलेले मातीचे ढिगारे, भुशाचे ढीग, पसरलेल्या, फरशांच्या चिपा गंजलेल्या तारा, डांबर फासलेले पत्रे, चुन्याचे डोंगर, खड्डयांचा चक्रव्यूह या असल्या साऱ्या पसाऱ्यातून कारखान्यांच्या भक्कम इमारती आणि शहरं कशी उभारली गेली याचंच आता आपल्याला नवल वाटतं. बांधण्याचं जेवढं काम, तेवढंच साफसफाईचं काम असे पूर्वी ! तरुण माणसा ! ही अशी कामाची परिस्थिती होती पूर्वी ! आणि आता बांधकामावर फिरा. बराकीच्या ठिकाणी काय दिसेल ? सुंदर, आरामशीर घरं आणि फुलांचे ताटवे ! माझ्या इच्छेवर असतं ना, तर मी सामानाची तात्पुरती गुदामे आणि काँक्रिटच्या फॅक्टरीची इमारतही या हलक्या फुलक्या आल्हाददायक दक्षिणी पद्धतीच्या

घरांच्या धर्तीच्याच बांधल्या असल्या. साऱ्या बांधकामावर बोटीतल्यासारखी स्वच्छता आणि टापटीप हवी! त्याचा परिणाम बांधकामाच्या गतीवर नक्कीच दिसून येतो. पडलेल्या पसाऱ्याने, अव्यवस्थेमुळे होणारा मनाचा गोंधळ चिडचिड टळते. कामावर जाताना माणसानं स्वतःसुद्धा अवव्यस्थित असता कामा नये. म्हणून तुम्ही माझ्या रोज रोज रात्री दाढी करण्याची टिंगल करू नका. कुणी तरी म्हटल्याचं मला आठवतंय, कुणी ते नक्की आठवत नाही, बहुधा एका मोठ्या लेखकानं म्हटलेलं असावं ते. पण कुणी म्हटलंय ते महत्त्वाचं नाही इथे. तो म्हणतो, "दाढी केल्याशिवाय आणि हात स्वच्छ धुतल्याशिवाय मी लिहायला बसू शकत नसे." मलाही ते पटतं. आपलं जीवन म्हणजे काम! आपण जर कचऱ्यात काम करू लागलो तर काय मिळणार? तुम्हाला फक्त धरणाच्या कामात आणि पाईपलाईन पाहाण्यात रस आहे. पण तुम्ही माझ्या कामगारांची वस्ती पाहायला हवी होतीत. ती पाहिली नाहीत तुम्ही अजून. उद्या मी तुम्हाला दाखवतोच ती!"

स्तारोस्तिनना झिमल्यानोय फार आवडले. दररोज नितळ दाढी करून स्वच्छ राहायचे. तरतरीत, सुरेख दिसायचे. आपण केलेल्या कामाबद्दल फारच कमी बोलायचे. त्याबद्दल बोलायला वेळच नसायचा त्यांना! बांधकामाशिवाय उरलेला सगळा रिकामा वेळ (आणि असा वेळ जवळ जवळ नसायचाच) झिमल्यानोय तावातावाने वादविवाद करण्यात घालवायचे. त्यांचे लग्न झालेले नाही आणि त्यांना एक गायिका असलेली बहीण आहे. एवढेच स्तारोस्तिनला त्याच्या खाजगी आयुष्याबद्दल माहीत होते. झिमल्यानोयचा ऑपेराच्या संगीताकडे आणि साक्यांकडे कल होता तो त्यांच्या बहिणीमुळे!

हायड्रोडायनॅमिक्स, काँक्रिट, भूमिअंतर्गत पाणी यावरची पुस्तके, धरणाचे हिशेब, ट्रेसिंग पेपर यांच्या जोडीनेच पुष्कळशा जाड जाड वह्यानी त्यांची खोली भरून गेलेली होती. भिंतीवर एक गिटार लटकत होते.

दुसऱ्या दिवशी झिमल्यानोयनी स्तारोस्तिनना आपल्याबरोबर आपल्या विभागात नेले.

सर्वात आधी झिमल्यानोयनी स्तारोस्तिनना कालवा आणि पाण्याचा भावी खजिना यांच्या मधल्या पट्टीवर असलेली वस्ती दाखवली. वस्ती खरोखरच अतिशय सुंदर बांधलेली होती. पण झिमल्यानोयनी स्तारोस्तिनना कौतुक प्रकट करायला सवडच दिली नाही. त्यांनी स्वतःच बालसदृश आनंदाने तिचे कौतुक करून आपला आनंद व्यक्त केला.

"पाहा, पाहा! कुरणामधून जेव्हा या वस्तीकडे यायला लागता तेव्हा या वस्त्या कशा चकीत करून सोडतात! लाल पांढऱ्या फुलांच्या ताटव्यांसारख्या! शुभ्र भिंती लाल लाल कौलांची छपरं! किती साधी पण शोभिवंत! खांबाच्या ओळीनी नटलेले, सुरेख हवेशीर व्हरांडे! आम्ही पाहुणे आहोत या घरातले. प्रकल्पाचे बांधकाम

झाल्यावर कालव्यावरचे, नदीतल्या वाहतुकीवरचे कामगार राहाणार इथे त्यांचा अगदी हेवा वाटतो मला! वोल्गा–डॉनचे काम आणि नवं काम यांच्यामध्ये मला थोडी सुटी मिळाली तर काहीतरी लांडी लबाडी करून एक दोन महिने या वस्तीत राहयला येईन. आराम करीन!" झिमल्यानोय म्हणाले.

साबणाच्या पाण्याचे मोठे तसराळे हातात घेऊन एका घराच्या व्हरांड्यातून एक तरुण स्त्री बाहेर आली आणि तिने ते पाणी अंगणात झोकून दिले. पाण्याच्या शिंतोड्यांनी भिंत थोडी ओली झाली. ती तरुणी झिमल्यानोयकडे पाहून हसली.

"कॉम्रेड पेतुखोवा, हसायला काय झालं? हसण्यासारखं काहीही झालेलं नाही. ती भिंत बघा! स्वतः बांधता आणि स्वतःच घाण करता! तुमच्यासारख्या तरुण तंत्रज्ञानं तरी असं करायला नको होतं."

तरुणीने वळून पाहिले. साबणाचे बुडबुडे भिंतीवर चिकटले होते.

"मी पुसून घेते हं!" अपराधी सुरात ती म्हणाली. "सगळ्या गोष्टींकडे अवधान राहात नाही. आमच्यानंतर राहायला येतील ते टिकवतील हे सौंदर्य! आम्हाला नाही वेळ ते करायला. आम्ही कामगार लोक!"

ते ऐकून झिमल्यानोय रागाने लाल झाले.

"तुम्हाला वाटेल मी चुकाच काढतो सारख्या!" ते म्हणाले, "ठीक आहे! आमच्यानंतर चांगली माणसं येतील आणि ती राखतील हे सौंदर्य. ठीक आहे! तसं का होईना? आम्ही इतरांसाठी बांधायचं काम करतो, त्यानंतर काय होतं ते पाहायची आम्हाला जरूरी नाही असं म्हणून स्वतःच्या दोषांवर पांघरूण घालायची आपल्याला सवयच जडली आहे. आपण अजून आडाणी कामगारांसारखेच आहोत. पण ही सगळी बडबड निरर्थक मूर्खपणाची आहे. भविष्य काळ, भविष्यकाळ! आम्ही भविष्य काळातल्या माणसांसाठी इतके कष्ट करतो असं गाणं गात बसायला तुम्हा सर्वांना फार आवडतं आणि हे मात्र विसरता की तुम्ही स्वतःही क्रांतीनंतरच्या भविष्य काळांतलीच माणसं आहात. तुमच्यासाठीही इतरांनी काम केलेलं आहे. आम्ही भावी पिढ्यांसाठी राजवाडे बांधू आणि स्वतः मात्र अडगळीत अडचणीत राहू असा का विचार करता तुम्ही कॉम्रेड पेतुखोवा? जाऊ दे, माफ करा मला!"

झिमल्यानोय खूप वेळ तापलेलाच होता. जेव्हा त्यांना राग येई तेव्हा ते तुम्ही काय बोलताय ते आपल्याला कळतच नाही असे दाखवीत. आणि चुका काढून बरोबरच्या माणसाला पुन्हा पुन्हा त्याच त्याच गोष्टींबद्दल विचारत राहात.

आताही तसेच झाले. कॉंक्रिटच्या कारखान्यापाशी शेजारच्या विभागातला एक इंजिनियर त्यांच्या जवळ आला आणि त्याने अतिशय विनयाने त्यांना विचारले की कुठलीशी एक दुर्मिळ केबल त्यांना उसनी मिळेल का?

झिमल्यानोय त्याच्याकडे इतका वेळ आणि असे काही पाहात राहिले की तो बिचार

शरमेने लाल झाला. तेव्हा झिमल्यानोय सावकाश आणि तुटक शब्दात म्हणाले.

" म–ला स–म–ज–त ना–ही ! "

" आमच्या विनंतीत न समजण्यासारखं काय आहे तेच मला समजत नाही ! " चिडून त्या इंजिनियरने उत्तर दिले.

" मला स–म–ज–त–नाही ! " झिमल्यानोय पुन्हा बोलले.

" इथे बांधकामावर दररोज आठशे वॅगन सगळ्या तऱ्हेचा माल घेऊन येत असतात. आठशे वॅगन्स ! आ–ठ–शे–! आणि तरी तुम्ही हात पसरत हिंडताय. कृती केली पाहिजे कॉम्रेड ! अळंटळं करता उपयोगी नाही. कृती करणे ऐकला आहे हा शब्द कधी ? ठीक आहे, गाडी पाठवा. आत्ता मी ती केवल तुम्हाला देतोय. पण केवळ गेल्या दहा दिवसांत तुमच्या विभागात मरगळ नाहीशी होऊन कामाने नवा वेग घेतला आहे हे मला दिसतंय म्हणूनच आत्ता ती देतोय ! "

इंजिनियरने कोरडे आभार मानले आणि खांद्रे उडवून तो निघून गेला. उलट झिमल्यानोय एकदम शांत होऊन स्तारोस्तिनला म्हणाले,

" बांधकामाचं ठिकाण म्हणजे सुखुमीचे देखावे भिंतींवर शोभत असलेलं तुमचं बांधकामखात्याचं ऑफिस नाही. योजना तयार करणं हे काम निराळं आणि ती प्रत्यक्षात उतरवणं निराळं. हे काम जास्त गुंतागुंतीचं आहे. तिथे इंजिनियरच्या कल्पना शक्तीला आकडेवारीची आणि माहितीची जोड असते, पण इथे जिवंत आणि वेगळ्या प्रकारच्या साधनाशी–माणसांशी, तुमचा संबंध असतो ! पोरा, असं आहे हे सगळं प्रकरण ! "

—

तयार झालेल्या, दगडांनी बांधून काढलेल्या डॉनच्या कालव्याच्या कडेने झिमल्यानोय आणि स्तारोस्तिन धरणाकडे आणि पंपिंग स्टेशनकडे गेले.

स्तारोस्तिननं कालव्याच्या तळाकडे पाहिले आणि त्याना आत्ता, या क्षणाला, या कोरड्या पात्राच्या जागी खोल, स्वच्छ पाणी दिसावं असे वाटले. स्क्रेपरने तळावरून शेवटची फेरी केली तेव्हा पिवळ्या मातीवर उठलेली फणी अजून स्पष्ट दिसत होती तिथे.

" इथूनच पाणी प्रथम कालव्यात शिरेल. " झिमल्यानोय म्हणाले. खाली वाकून त्यांनी हाताचा तळवा दगडावरून फिरवला. धुळीने माखलेल्या दगडातले निळे कण उन्हात चमकू लागले.

" लवकर येऊ दे पाणी ! " स्तारोस्तिन म्हणाले.

धगधगणारे ऊन स्टेपभर पसरले होते. त्या धगीने आकाशाची निळाई, गवताचा ताजा हिरवेपणा सारं सारं करपून गेलं होतं ! आणि सर्वत्र उरला होता फक्त दुष्काळाचा रंग ! फक्त स्वच्छ, खेळतं, थंडगार विपुल पाणी तहानेल्या जमिनीला जीवदान देऊ शकत होते ! या इथे पाण्याच्या काठावर थोडावेळ विसावायला त्यात हात बुडवून

भाजून निघालेल्या शरीराला हळूहळू पाणी कसं शीतल बनवतंय त्याचा अनुभव घ्यायला किती सुख वाटेल! आणि तळातल्या ओल्या मातीचा हाताला होणारा स्पर्श म्हणजे तर आगळा वेगळा अनुभव असेल!

स्तारोस्तिनने कालव्यावरून दृष्टी फिरवली. तो दुपारच्या उदासीनतेतून निघाला होता आणि तिच्यातच लुप्त झाला होता. त्याच्याकडे पाहून एखाद्या आटलेल्या मोठ्या नदीच्या पात्राची आठवण होत होती.

या कालव्यात पाणी कुठून व कसे भरणार हे इंजिनियर म्हणून स्तारोस्तिनना माहीत होते. पण आत्ता त्यांचे मन द्विधा झाले होते. माहीतगार इंजिनियर असूनही आता त्यांना वाटत होते की ज्या सामान्य माणसासाठी या कालव्यावर सगळे नवीन आणि त्याच्या जीवनावर परिणाम घडवणारे घडत आहे तसलाच एक साधासुधा माणूस आपण आहोत!

त्या तिथे–पलीकडे, वोल्गा–डॉनमधल्या चार किलोमीटर धरणाच्या मागे अजून पाणी नसलेला विशाल कार्पोवचा पाण्याचा खजिना पसरलेला होता. शक्तिशाली पंपिंग स्टेशन डॉनच्या पाण्याने हा खजिना भरून काढेल. जवळ जवळ तीन मीटर व्यासाच्या नळातून ते पाणी ग्रेसिस्लोवच्या खजिन्यात दुसऱ्या पंपिंग स्टेशनवरून सोडले जाईल. दूरवर दिसणारे ते नळ तेलवाहू टाक्यांच्या आगगाडीसारखे दिसत होते.

प्रॉपेलर पंपांनी २४ तासांत चार मिलियन क्यूबिक मीटर पाणी पाण्याच्या खजिन्यात टाकले जाईल. याशिवाय जिथून पाण्याचे वाटप होणार आहे तिथे आणखी एक पाण्याचा खजिना डॉनच्या पाण्याने भरला जाईल–वार्वाराचा पाण्याचा खजिना! धरणाच्या दरवाज्यातून जेव्हा बोटी जायच्या असतील त्या वेळी कालव्यातील पाण्याची कमी असलेली पातळी वाढविण्यासाठी आणि येर्गेनिनमधल्या शेतीला पाणी पुरवण्यासाठीही हे साठे उपयोगात आणले जातील.

पंपिंग स्टेशनच्या आणि पाणी खेचण्याच्या ठिकाणाच्या प्रचंड इमारतींच्या कॉंक्रिटच्या भिंतीवर त्या उन्हाने तडकू नयेत म्हणून कामगार पाणी मारत होते. दूर, खजिन्याच्या खळग्यात माती खणणाऱ्या यंत्रांची रांग एकमेकांना चिकटून दात करकरा वाजवत धूळ उडवत सरपटत होती.

झिमल्यानोय आणि स्तारोस्तिन तिकडे जायला निघाले. कवच असलेल्या मोठ्या किड्यासारख्या दिसणाऱ्या यंत्रांना अवजड ट्रॅक्टर्स ओढून नेत होते. माती खणणाऱ्या यंत्राचे रुंद पाते जमीन चिरत होते. उकरलेली माती मोठ्या बकेट मध्ये पडत होती. माती घेऊन यंत्र बाजूला जात होते. आणि बकेटमधली माती दूर नेऊन टाकत होते.

धुराळा वाढला. स्क्रेपर आणि ट्रॅक्टर यांच्या खडखडाटाचे रूपांतर न थांबणाऱ्या पोलादी आवाजात झाले. स्तारोस्तिनना क्लावा दिसली. ती चाकावर ओणवून, दात ओठ खात स्क्रेपर चालवत होती.

" बघा आमची क्लावा कशी काम करतेय ! " झिमल्यानोय म्हणाले. " आपण इथंच उभे राहू म्हणजे आपण तिला दिसू. "

ज्या पट्टयात ती काम करत होती त्यापासून दोन तीन मीटर अंतरावर ते उभे राहिले. तिच्या यंत्राच्या पात्याने जी माती निघत होती त्यावरून स्पष्ट दिसत होते की ती अगदी योग्य तऱ्हेने आणि मोठ्या आत्मविश्वासाने यंत्र चालवत होती.

क्लावाचे यंत्र झिमल्यानोय आणि स्तारोस्तिन जवळून गेले. धूळ आणि धुराने त्यांना वेढून टाकले. पण क्लावाचे लक्ष काही त्या दोघांवर गेले नाही. क्लावाच्या यंत्रामागून बाकीची यंत्रे दबक्या चालीने गुरगुरत चालली होती.

" तो बेजबाबदार माणूस बघा ! " झिमल्यानोय बोलले.

स्तारोस्तिननी आश्चर्याने त्यांच्याकडे पाहिले, वळणावरून यंत्र वळवणाऱ्या घामाने थबथबलेल्या लठ्ठ बुटक्या ड्रायव्हरकडे झिमल्यानोय कुचेष्टेने रोखून पाहात होते.

" बघा किती निष्काळजी आहे तो ! " झिमल्यानोय पुन्हा म्हणाले आणि वळणाऱ्या यंत्राकडे निघाले. स्तारोस्तिनही त्यांच्या मागोमाग गेले.

पण ते तिथे पोचायच्या आतच क्लावाने भरभर आपले यंत्र वळणाऱ्या यंत्राजवळ आणले, खाली उडी टाकून हूकवरचा लोखंडी दोरखंड फेकला, पुन्हा आपल्या केबिनमध्ये बसली. यंत्र चालू केले आणि अगदी सहज, आवाज न करता, फारशी धूळही न उडवता तिने वळणावरचा स्क्रेपर उचलला आणि मार्गावर आणला.

" साखळी काढून टाक आता ! " त्या बुटक्या ड्रायव्हरला ती ओरडून म्हणाली आणि ताबडतोब स्वतःचे यंत्र स्तारोस्तिन आणि झिमल्यानोय यांच्यापुढून चालवत नेले.

दुसऱ्यांदा क्लावाचे यंत्र झिमल्यानोय आणि स्तारोस्तिन यांच्या पुढे आले.

अनपेक्षितपणे तिने मान फिरवली आणि ते तिच्या दृष्टीस पडले. तिच्या मोठ्या मोठ्या डोळ्यात आकस्मित उमटलेल्या आश्चर्याची जागा आता मनमोकळ्या चमकदार स्मिताने घेतली. यंत्र जरा बाजूला गेले; पण क्लावाने ते लगेच पुन्हा मार्गावर आणले. पुन्हा एकदा त्यांच्याकडे नजर टाकून त्यांचे स्वागत केल्यासारखा हात केला.

" किती उत्कृष्ट ड्रायव्हर आहे ही मुलगी ! " झिमल्यानोय म्हणाला. " असल्या तीस ड्रायव्हर मुली असत्या तर या जमिनीच्या बाबतीत कुठलाच प्रश्न आला नसता मला ! "



स्तारोस्तिननी कालव्याच्या मार्गावर थोडे दिवस काढले, निरनिराळ्या विभागात वेळ घालवून ते कालव्याच्या बाजूने जाणाऱ्या मोटार रस्त्याने पुढे निघाले.

स्तारोस्तिननी जे सगळे पाहिले त्याने त्यांना प्रकल्पाबाबत विचार प्रवृत्त केले. त्यांच्या पूर्वीच्या कल्पनांत आता खूपच गोंधळ माजला, जे पूर्वी प्रत्यक्षात आणणे

अगदी सोपे वाटत होते ते कठीण वाटू लागले आणि उलट जे प्रश्न अवघड भासत होते ते इथे अगदी सहज साध्या पद्धतीने प्रत्यक्षात उतरत होते.

बांधकामावरील कामगारांनी काम करताना आरेखनातील चुका दुरुस्त करून घेतल्या, सुधारणा केल्या आणि नवे उपायही शोधले हे त्यांच्या ध्यानात आले.

काळाने कामगारांमधील शोधक वृत्ती जागृत केली. कालवा खुला करण्याचा समय समीप येत होता. देश आतुरतेने वाट पाहात होता.

जवळजवळ प्रत्येक विभागात आणि प्रत्येक कामावर स्तारोस्तिनना इंजिनियरिंग क्षेत्रातले अप्रतिम शोध आढळले.

स्तारोस्तिननी धरणाचे दरवाजे पाहिले. जणू वोल्गा–डॉनच्या मधल्या प्रदेशातला पाण्याचा प्रचंड जिनाच! असं दृश्य दिसत होतं की जणू उघड्या माळावर तीस अवजड लढाऊ जहाजे नांगरून पडली आहेत! कॉंक्रिटच्या वर आलेल्या सळया जहाजाच्या बाजूंच्या फ्रेमसारख्या, तुळयांसारख्या दिसत होत्या. वेल्डिंगच्या काटेरी ठिणग्या स्टेपमधल्या काळोख्यारात्रीचा भेद करत होत्या. कॉंक्रिट दाबणारे इलेक्ट्रिकल व्हायब्रेटर घुमत होते. पाणी उपसणारे खोलातले पंप खड्कातले पाणी सतत उपसून टाकत होते. बांधकामाचा सर्वात दुष्ट शत्रू म्हणजे हे पाणी! धरणाच्या सांडव्याच्या भागावर जिथे शक्तिशाली स्वयंचलित माती काढणारे यंत्र काम करत होते तिथे स्तारोस्तिन दिवस संपताना पोचले. सूर्य मावळला होता. लांब लांब सावल्या माळावर पसरल्या होत्या. बाहेर येण्याची वेळ होण्याची वाट पाहात अंधार दरीच्या तळाशी पहुडला होता. पश्चिम क्षितिज रेषेवर माती खणणाऱ्या यंत्रांची प्रचंड काळी धूडे काळसर दिसत होती. तिथपासून कालव्याच्या काठावरच्या लाल मातीच्या टेकड्यांची रांग सुरू झालेली होती.

स्तारोस्तिन त्या यंत्राच्या जवळ गेले. ते खळग्याच्या तळात उतरले. त्या ठिकाणाला एखाद्या पडझड झालेल्या वस्तीची कळा आली होती. मोठ मोठे दाते असलेले प्रचंड सूप वाऱ्याने उडवून लावल्याप्रमाणे वेगाने स्तारोस्तिनच्या डोक्यावरून गेले, आणि काठावरच्या लाल मातीच्या टेकाडाच्या उतारात घुसले. लोखंडी साखळ्यांचा खडखडाट करत दात्यांनी माती उकरली आणि आपल्या पोलादी दात्यांच्या चकाकत्या खुणा मागे ठेवून वेगाने ती माती उचलली.

स्तारोस्तिननी कालव्याच्या दिशेने नजर फिरवली. कालव्याचे किनारे मावळत्या सूर्याच्या तांबूस उन्हाने निथळत होते. लाल मातीतून मंद प्रकाश परावर्तित होत होता. माती खणणाऱ्या यंत्रांच्या पोलादी दात्यांच्या खुणा कठीण जमिनीवर अधिक स्पष्ट दिसत होत्या. जणू काही प्रागैतिहासिक युगातल्या एखाद्या हिंस्र पशूने क्रोधाने जमिनीचा चावा घेतला होता आणि त्याच्या खुणा आजतागायत राहिल्या होत्या.

माती उपसलेल्या भागात जमिनीखालचे पाणी झिरपत होते. त्याचे डबके साठले

होते. पाणी खोल आणि हिरवट, विषारी वाटत होते. त्यात जिवंतपाण्याची कुटलीच खूण नव्हती. त्या मेलेल्या पाण्यात जमिनीखालच्या क्षारांचे जाड थर होते. त्या रक्तवर्ण मातीच्या टेकाडांमध्येही जणू कोणतेच जिवंतपणाचे चिन्ह नव्हते. एकसुद्धा वाळूचा कण नसलेली, दगडगोटे; मुळे, झाडांच्या भस्मीभूत फांद्या या मानवी अस्तित्वाबद्दल काही सांगू शकतील अशा वस्तूंचा अभाव असलेली ती माती एकसुरी भासत होती. हजारो वर्षे मृतावस्थेत पडून राहिलेल्या त्या मातीला माती खणणाऱ्या यंत्राने कालव्याच्या तळातून काढून सूर्यप्रकाशात आणले आणि जीवनाच्या उभारणीच्या कामी लावून तिचा उद्धार केला.

मातीची ती टेकाडे भुईसपाट केली जातील आणि त्यातून कालव्याचा किनारा तयार होईल. पहिला पाऊस तिला ओलावा आणेल, वाऱ्यावरून येणारे बी त्या ओल्या मातीत विसावेल, रूजेल आणि या अनाघ्रात जमिनीच्या कुवार शक्तींचा उपयोग करून शरदातले गवत इथे तरारेल, फुलेल !

माती खणणारे यंत्र थांबले. दांड्यावर लोंबणारे बकेट वर गेले. एकदम इतकी शांतता पसरली की किरकिरणाऱ्या रातकिड्यांच्या पंखांची फडफडही ऐकू येऊ लागली. जवळच कुठेतरी जमिनीवर राहाणाऱ्या खारीचा अधिरा चित्कार ऐकू आला.

माती खणणाऱ्या यंत्राचे दिवे लागले. कालव्याच्या पात्रातून यंत्राकडे जाण्यासाठी स्तारोस्तिननी मातीच्या ढिगावरून जपून खाली उतरायला सुरूवात केली. पण ते एकदम थांबले आणि बाजूला झाले. यंत्र चालायला लागले होते. त्याने मोठा आवाज करून जाड लोखंडी पट्ट्यांचा आधार घेऊन आपले शरीर थोडे वर उचलले, पुढे सरले आणि जमिनीवर टेकले. त्याने एक पाऊल टाकले. पुन्हा लोखंडी पट्ट्या उचलल्या गेल्या आणि ते दुसरे पाऊल उचलण्याच्या तयारीला लागले. ते प्रचंड धूड स्टेपमधून चालत होते आणि आरशासारखी चकाकी असल्यासारखे पॉलिश झालेला जमिनीचा पट्टा मागे ठेवीत होते.

स्तारोस्तिन जलदीने त्या यंत्राकडे जाऊ लागले. हात टेकत टेकत मातीच्या ढिगावरून जाताना ते घसरले त्यांनी ढिगाच्या टणक भागावर घट्ट हात धरले.

ते यंत्र पावलं टाकत होतं. सारा स्टेपप्रदेश निर्मनुष्य होता. स्तारोस्तिनना एकदम माणसाचा आवाज कानी आला. यंत्रावर कुणी तरी गात होतं.

आकाशाच्या घुमटात दाटले मेघ काळे
गंधाने कोंदली हवा वादळी
दूरदूर नावांच्या केंद्रामागून
चालला कुणी मीलनोत्सुक तरुण

स्तारोस्तिननी त्या यंत्राला गाठले. आणि आत उडी मारली. आतले दार उघडे

होते. मोठ्या दिव्यांनी इंजिन, हैड्रॉलिक इन्स्टॉलेशन, वायरी, लोखंडी शिड्या, लहानसे लाकडी टेबल, सारे उजळून निघाले होते.

स्तारोस्तिन पुढे झाले. केबिनमधल्या आरामखुर्चीवर अस्ताव्यस्त अंग टाकून बॉयलर सूटमधला एक तरुण बसला होता आणि समोरच्या कंट्रोल डेस्कवरच्या कळी तो कळत न कळत फिरवत होता. संथ लाटांवर झुलत जसे जहाज चालते तसे ते यंत्र एकेक कळ फिरवल्यावर आपले हजारो टनांचे धूड हलवत एक पाऊल पुढे जात होते.

स्तारोस्तिन ते अप्रतीम यंत्र, ते जमिनीवर चालणारे जहाज, निरखून पहात होते. त्याच्या आत ४८मोटारी चालू होत्या. त्यांची शक्ती मोठ्या गावाला पूर्णपणे वीज पुरवण्याइतकी होती.

"गीत तर आमच्या लेनिनग्राडवासी कवीचं आहे!" स्तारोस्तिनना वाटले. आणि ते बरोबर ठरले. यंत्राचा तरुण ड्रायव्हर इंजिनियर लेनिनग्राडचाच निघाला. माती खणणाऱ्या यंत्रांवरचे सगळे ड्रायव्हर इंजिनियर होते. त्या यंत्राची गुंतागुंतीची रचना पाहून स्तारोस्तिनच्या मनात विचार आला, हे प्रचंड शक्तिमान यंत्र चालवणाऱ्या ड्रायव्हरजवळ नुसतेच कामगारांचे कौशल्य आणि प्रभुत्व असून भागणार नाही, तर शिक्षणही हवे. बौद्धिक काम शारीरिक कामाशी निगडीत केले गेले आहे आणि शारीरिक काम बौद्धक कामाचा भाग बनले आहे.

नंतर स्तारोस्तिन थोडावेळ त्या तरूण इंजिनियरजवळ त्याच्या केबिनमध्ये बसले. आपल्या जन्मगावच्या आठवणीनी त्यांनी आरोळ्या म्हटल्या. तिथे सध्या शुभ्र रात्री असतील, त्यांचा प्रकाश ॲडमिरल्टी इमारतीवरचा सुवर्णकळस अखंड चकाकत असेल आणि इथे मात्र दक्षिणेकडच्या काळ्याकुट्ट रात्रीचा अंधार भरून राहिलाय!

# ८

सुंदर हवा असलेला हा दुसरा आठवडा होता. मध्यरात्रीनंतर आभाळ भरून येई आणि उबदार झिमझिम पाऊस सुरू होई. घरांच्या छपरांवर आणि कवटी चाफ्याच्या तडतडीत पानांवर पाऊस टपटपत राही आणि त्याच्यासारखाच सौम्य आवाज करत किनाऱ्याकडे धावत येणाऱ्या लाटांबरोबर कुजबुजत राही.

पंख फडफडवत झुडपात घुसणाऱ्या पक्ष्यांच्या पाठोपाठ पाऊसही त्या झुडपात घुसे. उघड्या समुद्रावर जहाजाच्या चिमणीतून निघणाऱ्या धुराच्या वलयांना पाऊस करड्या रंगाच्या मंद लाटांवर दाबून टाकी. सकाळी मात्र पाऊस शांत होई. दक्षिण दिशेने समुद्राच्या बाजूने आकाशाचा फिकट नीलिमा वाढू लागे आणि आकाश मध्या-पर्यंत पसरे.

रस्ते तेव्हाच सुकून जायचे. रात्रीच्या पावसाची एकमेव खूण म्हणून जर काही मागे उरत असेल, तर तो ताजा पुष्पगंध ! लेल्या पळत गेली तेव्हा समुद्रातले गोल गोटे तिच्या पायाखालून बाजूला उडत होते. सगळे गोटे खालच्या बाजूने कोरडेच होते. पाऊस त्याना सगळ्या बाजूंनी ओलेसुद्धा करू शकला नव्हता.

लेल्या पळत पळत बागेत आली, तिने फाटकावरून उडी मारली आणि टर्किश टॉवेल उडवत गोट्यांच्या पायवाटेवरून समुद्राकडे पळत सुटली. मोठ्या कष्टाने तिच्या-बरोबर जाण्याचा प्रयत्न करत एक लहानसे म्हातारे केसाळ कुत्रे तिच्यामागोमाग धावत होते. बोर्जोम त्याचे नाव ! जीव खाऊन भुंकल्यामुळे ते धापा टाकत होते.

लेल्याने अंगातून काढून फेकलेल्या फ्रॉकजवळ बसून बोर्जोम जीभ बाहेर काढून

धापा टाकत होता. लेल्या बरीच लांब पोहत गेली तेव्हा बोर्जोम पळत पाण्याजवळ गेला तिला हुंगल्यासारखे केले आणि हळू आवाजात असे काही केविलवाण्या सुरात त्याने रडायला सुरूवात केली की पोहणे अर्ध्यावरच सोडून तिला किनाऱ्यावर येणे भाग पडले. टॉवेलने अंग पुसता पुसता ती बोर्जोमला त्याच्या रड्या स्वभावाबद्दल रागावत होती. बोर्जोम शरमून वाळूवर शेपटी फिरवत राहिला आणि आपले भुरके मखमली-सारखे कान क्षमायाचनेने खाली पाडले.

कधी कधी समुद्रावर लांबलचक, किरण शलाकांसारखे सरळ ढग दिसायचे. ते खूप उंचीवरून जाणाऱ्या विमानाच्या मागासारखे दिसायचे. ते ढग समुद्राला टेकलेल्या क्षितिजावरच्या एखाद्या बिंदूतून निघून आकाशभर पसरायचे. त्यांच्या खरबरीत पण पारदर्शक रचनेवरून लेल्याने ओळखले की हे ढग फार उंचीवरचे आहेत. आणि ते बर्फाच्या स्फटिकांनी बनलेले आहेत. हवामान शास्त्रज्ञाचीच मुलगी होती ना ती !

नुसत्या ढगांबद्दलच नव्हे तर पावसाबद्दल, वादळांबद्दल, वातावरणातल्या हालचाली बद्दलही नतालिया पेत्रोवना तिला वरचेवर माहिती सांगायच्या.

हवामान शास्त्राशी जे जे काही संबंधित असते ते सगळे दृश्यमान आणि रंगीत असते हे लेल्याला आता माहीत झालेले होते.

हवामान शास्त्र हे असे एकच शास्त्र असेल की ज्यात नुसत्या साधनांनी आणि आकडेवारीने निर्णय घेता येत नाहीत. तर आकाशाच्या आणि वातावरणाच्या रंगावरून ढगांच्या आकारावरून, ताऱ्यांच्या चमचमणाच्या शक्तीवरून, जंगलातल्या वृक्षांच्या सळसळीवरून सुद्धा ते घेता येतात आणि ज्याचे काम, कधी कधी ज्यांचे जीवनही त्यावर अवलंबून आहे अशा लोकांना, शेतकरी, खलाशी, कोळी, वैमानिक, रेल्वे कामगार यांना हवामानातील बदलांबद्दल आगाऊ सूचनाही देता येतात.

हवामान शास्त्राइतके दुसरे कोणतेच शास्त्र काव्य आणि चित्रकला यांना इतक्या जवळून स्पर्श करत नाही असे नतालिया पेत्रोवना म्हणायच्या.

हवामान शास्त्रातील चमत्कारांशी संबंधित अशा निरनिराळ्या कवींच्या कविता आणि निरनिराळ्या लेखकांच्या लेखनातील उतारे नतालिया पेत्रोवनांनी एका वहीत उतरवून ठेवलेले होते. ती वही पुन्हा पुन्हा वाचायला लेल्याला फार आवडायची. कवितेच्या मधुर, प्रत्ययकारी शक्तीच्या दर्शनाने ती दिपून जायची.

चिंचोळ्या घळींना हिमकण देतात मुलामा चंदेरी.
घराघरांतला निळानिळा धूर
आकाशात जातो दूरदूर
झुडुपात गाते आहे गीत धूळ सोनेरी.

या ओळी शेजारी नतालिया पेत्रोवनांच्या हस्ताक्षरात लिहिले होते, “शारदातील

अँटीसायक्लोन." लेल्याने पान उलटले.

उपसागरावरच्या वाऱ्याने अफाट,
मुखाजवळ "निवेची" रोखली वाट.
मागे फिरली, उसळत रागाने फणफणत,
बुडवून टाकले बेटाला चहुबाजूने वेढत.

या ओळींच्याखाली नतालिया पेत्रोवनांनी लिहिले होते,

"शक्तिमान दक्षिण वाऱ्याचा पाण्याला अडसर–निवेला येणाऱ्या पुराचे कारण."

समुद्रावर टेकलेल्या क्षितिजावरचे डोळे दिपवून टाकणारे एकाच बिंदूतून निघाल्यासारखे दिसणारे ढग आकाशात पसरले होते. आंघोळ झाल्यानंतर किनाऱ्यावर बसून उबदार वाळू मुठीतून सोडण्याचा खेळ करत लेल्या त्यांच्याकडे पाहात राहिली होती. तिला आठवले की असल्या ढगांबद्दल आईच्या वहीत "ढगांची पळती रांग पांगते आहे." ही ओळ उतरवलेली होती. पळती रांग हे शब्द अधोरेखित केलेले होते कारण ते शब्द उंचीवरून वाहणाऱ्या पिसासारख्या हलक्या ढगांची हवामानशास्त्रीय वैशिष्ट्ये दाखवणारे होते. ते कृत्रिम रेशमाच्या दशांसारखे दिसत होते. वारा त्यांना आकाशमध्यात ओढून नेत होता आणि हलक्या हाताने पिंजून त्यांचे धागे मोकळे करत होता. ते धागे हळू हळू विरून जात होते.

काय काय मजेशीर गोष्टी पुळणीपर्यंत येऊन पोचल्या होत्या! निळ्या काचांचे बारीक तुकडे, कोळयांच्या सफरींचे अवशेष असे खाऱ्या पाण्याने पांढूरके झालेले बुचांचे तुकडे, सुकलेल्या पण अजूनही समुद्राचा वास येणाऱ्या पाणवनस्पतींच्या फांद्या, खेकड्यांच्या तुटलेल्या नख्या, कधी कधी लाटांनी वाहून आणलेले संगमरवरी गुलाबी गोल खडे ( सेर्दोलिक ) आणि जहाजांचे गंजलेले पोलादी खिळेही इथवर पोचतात.

वाळूशी खेळण्यात लेल्या इतकी दंग झाली होती, की शेजारचा बडबड्या खेळकर यूर्का तिच्याजवळ कधी येऊन पोचला ते तिच्या लक्षातही आले नाही.

"ते बघ! तुला माहीत आहे अशा ढगांना काय म्हणतात ते?" यूर्काने लेल्याचा हात पकडून तिला हलवत विचाले.

"आहेच माहीत! "उंचावरचे पिसासारखे ढग" विचार न करता लेल्याने झटकन उत्तर दिले.

"नाहीच मुळी वाऱ्यांचं फूल म्हणतात त्याला", यूर्का म्हणाला,

"काहीतरी कल्पना लढवू नको. हे "वाऱ्याचं फूल" नाहीच मुळी. "वाऱ्याचं फूल" ही समुद्राच्या नकाशावरची खूण आहे. पृथ्वीवरच्या एखाद्या ठिकाणी सर्वात जास्त वेळा कोणते वारे वाहतात ते दाखवणारी खूण आहे ती" लेल्याने खुलासा केला.

"वाऱ्यांचं फूल" म्हणजे काय ते तिला यूर्काला समजावून सांगावेसे वाटत होते.

पण शब्दांनी ते स्पष्ट करणे अशक्य होते, म्हणून तिने वाळूवर बोटाने एक मोठी लहान मोठ्या टोकांची चांदणी काढायला सुरूवात केली. चांदणीचे प्रत्येक टोक एकेक दिशा आणि वाऱ्याचा वेग दाखविणारे होते.

पण यूर्काचा काही तिच्यावर विश्वास बसला नाही. आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे तो ओरडला " मुळीच नाही ! असं नाहीच मुळी ! काल माझ्या बाबांचे एक मित्र आमच्याकडे आले आहेत. ते काळ्या समुद्रात मालवाहू जहाजं चालवतात. त्यांनी मला " वाऱ्यांच्या फुला "बद्दल सगळं समजावून सांगितलं आहे. "

" ते पाहा !" यूर्काने जिथून ढग निघाले होते त्या दूरच्या, समुद्रावरच्या चमकदार बिंदूकडे बोट दाखवत म्हटले, " तिथून वारा निघतो, तो सर्व दिशांकडे वाहतो आणि आपल्यामागून ढगांनाही खेचत नेतो. जिथून वारा निघतो त्याला म्हणतात " वाऱ्याचं फूल. "

" बे–ली–बे–र्दा ! " ती एक एक शब्द उच्चारत ठासून म्हणाली, " तो खलाशी गोंधळ करतोय काहीतरी ! "

वादावादीला सुरूवात झाली तिने पैज लावावी असा यूर्काने आग्रह धरला. बोर्जोम उगीचच चिडला आणि मागच्या पायांनी ओली वाळू उकरत भुंकायला लागला.

" बरं बरं, ठीक आहे ! " लेल्याने संमती दिली. " पैज तर पैज ! जर तू हरलास तर मला...काय बरं मागावं तुझ्याकडून ? " लेल्या विचार करू लागली.

" वाळवलेला खेकडा ! " यूर्काने वाक्य पुरे केले.

" नाही ! " लेल्या ठामपणे म्हणाली. "तू मला वाळूतून "सेर्दोलिक" सापडून दिला पाहिजेस. वादळ थांबल्यानंतर समुद्रातून सेर्दोलिक बाहेर फेकले जातात आणि मी हरले तर तुला पाण्यावरची स्केटस देईन. चालेल ? "

" चालेल, चालेल ! " यूर्काने मान्य केले. " आमच्या घरी जाऊ आणि कोशात पाहू तो शब्द. "

" चल जाऊ ! "

पण " वाऱ्यांचं फूल " हा शब्द त्यांना कोशात पाहावाच लागला नाही. कारण यूर्काच्या अंगणात व्हरांड्याच्या पायऱ्यांवर रापलेल्या तांबूस चेहेऱ्याचा, स्तालिनग्राड नोवोरोसिइस्क गाडीतून लेल्याबरोबर प्रवास केलेला खलाशी नॅव्हिगेटर ख्माराच गळाला हूक बांधत बसलेला आढळला होता.

लेल्याने त्याला ताबडतोब ओळखले आणि खलाशानेही बहुधा तिला ओळखले असावे. तो उठून तिला भेटण्यासाठी पुढे झाला आणि तिचा हात पकडून त्याने हस्तांदोलन केले. गळाचा हूक त्याच्या बाहीला अडकला होता. पण त्याच्या मागोमाग ओढल्या जाणाऱ्या दोरीने जेव्हा झारी आडवी झाली तेव्हा त्याच्या ते लक्षात आले. झारी व्हरांड्याच्या पायऱ्यांवर ठेवलेली होती ती गडगडली. आवाजाबरोबरच तिच्यातले

पाणी वाटेवर सांडू लागले.

लेल्या झारी उचलण्यासाठी धावली. नंतर खलाशाच्या बाहीला अडकलेला गळ काढून घेत मान तिरपी करून खलाशाकडे पाहू लागली. खलाशी गोंधळून गेल्यासारखा दिसला.

" तुम्ही इथं भेटाल असं वाटलं नव्हतं " लेल्या म्हणाली.

" आणि मलासुद्धा खरंच मुळीच अपेक्षित नव्हतं. " ख्यारा म्हणाला.

" ती उगीचच वाद घालतेय. " वाऱ्यांचं फूल " म्हणजे समुद्राच्या नकाशावरची खूण आहे म्हणते ती. तुम्ही सांगितल्याप्रमाणे असले ढग मुळीच नाहीत. आम्ही पैज लावलीय. " यूर्कानं सांगितले.

" तर मग तू नक्की हरलास यूर्का ! " खलाशी बोलला आणि खो खो हसू लागला. " खरं म्हणजे मी हरलोय ! तू नाही. "

" तुम्ही मला का खोटं सांगितलंत ? " अपमान झाल्यामुळे थोड्याशा उद्धटपणानेच यूर्काने विचारले.

" यूर्का ! कसा बोलतो आहेस पावेल पेत्रोविचशी ? इकडे माझ्याकडे पाहा ! " यूराचे वडील खिडकीत ठेवलेल्या आरशात पाहून दाढी करत होते तिथून ते ओरडले.

" मीच दोषी आहे त्याबद्दल. खरंच ! साशा, मला वाटलं, असं सांगितलं तर त्याला खूप गंमत वाटेल म्हणून मी सांगितलं " यूराच्या वडिलांकडे वळून ख्यारा म्हणाला.

" कशाला उगाच समर्थन करतोस ? " युराचे वडील म्हणाले. " मी काही तुला आज पाहात नाही ! स्वप्नाळू कुठचा. "

" ही कल्पना नक्कीच गंमतीदार आहे ! " अनपेक्षितपणे लेल्या म्हणाली. " दूर कुठेतरी समुद्रावर अशी जागा आहे की तिथून वारा सुरू होतो आणि त्या जागेला " वाऱ्यांचं फूल " म्हणतात. तुम्हाला माहीत आहे का नकाशावरच्या त्या खुणेला " फूल का म्हणतात ? "

" ती फुलासारखी दिसते म्हणून !" गळाची दोरी गुंडाळत खलाशाने उत्तर दिले. " जपून ! दोरीत अडकाल ! "

" छान नाव आहे. " वाऱ्यांचं फूल " लेल्या बोलली.

" लेल्या, खलाशांचं सगळंच चांगलं असतं ! त्यांचं संभाषण, जहाजं, नकाशे. ते स्वतःही फार चांगले असतात. त्यांचं कामही चांगलं असतं, जिवंत, जातिवंत ! " खिडकीतून यूराचे वडील बोलले.

" जिवंत काम म्हणजे काय ? मला नाही कळलं. " लेल्या बोलली.

" कसं सांगावं तुम्हाला ? नोवोरोसिइस्कमध्ये तुम्ही आयुष्यात पहिल्यांदा समुद्र पाहिलात. मी बघितलं त्यावरून त्यानं तुम्हाला नुसतं भारावून टाकलंय ! " ख्यारा बोलला.

" खरंय ते. मला तो एखाद्या उत्सवमूर्तीसारखा वाटला!" लेल्या बोलली आणि तिचे गाल आरक्त झाले. " मी वेड्यासारखं बोलते आहे, पण मला तेव्हा खरंच तसं वाटलं."

" बरोबर आहे, बरोबर आहे. " खलाशाने दुजोरा दिला पण समुद्र उत्सवमूर्ती-सारखा दिसत होता याला की लेल्या खरोखरीच वेड्यासारखं बोलत होती त्याला हे कळणे कठीण होते.

" समुद्र सफरींबद्दल तासन् तास बोलत राहाता येईल, "

" मग सांगा ना काहीतरी ! " लेल्याने विनवले.

" काय सांगू ? " खलाशाने चकित होऊन विचारले.

" समुद्राबद्दल, सफरीबद्दल, काही तरी अद्भुत असं सांगा ! " लेल्याने गोंधळून उत्तर दिले.

आपल्या समुद्र सफरींबद्दल बोलायचा प्रसंग ख्याराला फारच क्वचित यायचा. पण नोवोरोसिईस्कमध्ये त्याने लेल्यासाठी फुले विकत घेतली तेव्हाच त्याला असं वाटलं की आयुष्यात आपण जे जे म्हणून चांगलं पाहिलेलं आहे त्याबद्दल या मुलीजवळ बोलावं. असं का वाटलं त्याचं उत्तर मात्र त्याचं त्यालाच देता येत नव्हतं.

आणि आत्तासुद्धा इतके बोलल्यानंतर त्याचे त्यालाच आश्चर्य वाटले. फार दिवसांनी तो इतक्या उत्साहाने आणि इतके उत्तेजित होऊन बोलला होता.

" असं म्हणतात की प्रवास ही एक प्रकारची शाळा आहे आणि खरं आहे ते ! आमचं जहाज कुठे का जाईना, मग ते पोरबंदर असो पोर्टसैद असो शांघाय असो की लेनिनग्राड असो, आम्हाला माहीत असते की अक्षांश रेखांशांनी मर्यादित केलेला पृथ्वीच्या गोलावरचा तो एक फक्त विशिष्ट बिंदू नसतो, तर ते एक मोठं विश्व असतं. प्रत्येक ठिकाणाची राहाणी, इतिहास, जीवनक्रमाची पद्धती आपल्या परीनं वेगळी असते. ग्रीक पुराणात मला वाटतं नऊ देवता आहेत. होना ? " ख्याराने विचारले.

" मला पण वाटतं नऊच आहेत, " अविश्वासाने लेल्याने उत्तर दिले.

" मला वाटतं आता या देवतांची संख्या वाढवायला हवी. वातावरणातल्या उड्डाणाची नवी देवता जन्माला यायला हवी आणि समुद्रसफरींचीसुद्धा. कदाचित आणखीसुद्धा काही देवता आढळतील. सिनेमा टेलिव्हिजन यांच्या संरक्षक देवतासुद्धा असतील ! "

यूर्का अनपेक्षितपणे मोठमोठ्याने हसू लागला. लेल्याने त्याच्या शर्टाची कॉलर धरून ओढली आणि यूराचे वडील ओरडले,

" गप्प बस रे यूर्का. अडाणी कुठला ! आणि तू सुद्धा पावेल अशा जंजाळात गुंततो आहेस की त्यातून सुटका होणंच कठीण ! " ख्यारा गोंधळला.

" मी असंच आपलं...काहीबाहीच बोलतोय. " त्याने यूर्काच्या वडिलांना उत्तर दिले. " समुद्रसफरींच्या देवतेबद्दल बोलणं चाललं होतं. दुसऱ्या शब्दात सांगायचं, तर सागरी जीवनाबद्दल सागरावरच्या अडचणींबद्दल तुला तर माहिती आहेच. मागच्या

उन्हाळ्यात मी ओडेसाहून लेनिनग्राडला बोट घेऊन जात होतो. बोट हजारो वर्षांच्या जुन्याच मार्गाने जात होती. तिथंल प्रत्येक बंदर प्रत्येक भुशीर, प्रत्येक बेट, ढगांचे मुकुट घातलेलं प्रत्येक पर्वतशिखर ऐतिहासिक घटनांची आठवण करून देत होतं. संध्याकाळचा अंधार मला इतिहासाच्या धूसर छायेसारखा वाटत होता. हसू नका तुम्ही ! मी हे अगदी गंभीरपणानं सांगतोय."

"मी हसत नाही काही तुमच्या बोलण्याला ! माझ्या चेहेऱ्यावर स्मित उमटलं असेल कदाचित, पण ते ही कल्पना मला आवडली म्हणून." लेल्याने उत्तर दिले, तिचा चेहेरा आरक्त झाला होता.

"त्या छायेतून बाहेर यायचे कधी ट्रायचे मृत किनारे, आणि मला आठवायचे अंध गोमेर आणि ओदिस्सेय ! कधी दिसायचं ऑलिंपाचं पिवळट शिखर, तर कधी नावारिन बंदर ! एकाकाळी जुन्या तोफांच्या आगीने आणि दारूगोळ्याच्या भडिमाराने आपल्या रशियन आरमाराने ग्रीकांचा पराभव केला होता. तो काळ शिडांच्या जहाजांचा आणि होकायंत्राचा होता. त्यानंतर आम्ही सिसिलीच्या किनाऱ्याजवळून गेलो, इटालीच्या मच्छिमार बोटींना आमच्या लाल ध्वजाचा फार हेवा वाटायचा. "सोव्हिएट रशिया झिंदाबाद" हे वाक्य आम्हाला ऐकवावे म्हणून आमच्या बोटी-जवळ येण्यासाठी वेळप्रसंगी त्या आपला मार्गसुद्धा बदलायच्या. नंतर आम्ही अटलांटिक महासागरात प्रवेश केला. उजव्या डेकच्या बाजूला पोर्तुगालचा किनारा पसरला होता. मोठा विचित्र देश ! मध्ययुगीन निर्जिव वातावरण ! त्याची कीर्ती कधीच संपली होती. एकेकाळी ती वास्को-द-गामा, मॅगेलनसारख्या महान् खलाशांची जन्मभूमी होती !

"शाळेत आम्ही कधीच याच्यापुढे गेलो आहोत !" यूर्का अभिमानाने बोलला.

"म्हणजे तुला माहीत आहे की ते नवं खंड शोधायला निघाले होते ते ? अगदी लहान जहाजातून, ती जहाजं इतकी लहान होती की त्या जहाजांच्या मागच्या टोकांवरची शिडं जहाजांपेक्षा आकाराने जराशीच लहान असायची. शौर्य, साहस यांचा काळ होता तो ! आणि आता ? फक्त तिथल्या किनाऱ्यांवरून चर्चच्या घंटांचा करूण गंभीर आवाज ऐकू येतो. सारा देश कॅथॉलिक धर्ममार्तंडांच्या हाती गेलाय !" ख्यारा सांगत होता.

"त्यावेळी तुमच्या मनात कोणता विचार आला ?" लेल्याने अनपेक्षितपणे प्रश्न केला.

"थांबा सांगतो ! शेकडो वर्षांपूर्वी जिथं सांस्कृतिक मूल्ये निर्माण झाली त्या देशां-जवळून युरोपला वळसा घालून येऊन समुद्रावरून आज मी सोव्हिएट सत्तेचा झेंडा मिरवत जातो आहे. त्या देशांमधलंसुद्धा सगळं तिथल्या कष्ट करणाऱ्या सगळ्या लोकांच्या मालकीचं असायला हवं. एखाद्या भुताला घाबरावं तशा या व्यापारी सत्ता आम्हाला घाबरत. बंदरांमध्ये फार वेळ थांबलेल्या आमच्या जहाजाला मनाई करत.

आमच्यामागून त्यांचे पोलादी हेर ब्रिटनच्या पाणबुड्या बोटी आमच्यावर लक्ष ठेऊन असत. लामॉन्सेमध्ये तर आकुल माशांच्या थव्याप्रमाणे आमच्या जहाजाच्या शेपटीला चिकटून चालत होत्या सारख्या! त्यानंतर आम्ही गेल गोलांद जवळून पुढे गेलो. तुम्हाला माहीतच आहे की हे बेट समूळ नष्ट करण्यासाठी इंग्रजांनी या बेटावर स्फोटक हल्ले केले. आणि हे केव्हा? तर ज्या काळात आपल्याकडे कालवे, विद्युतगृहे, शहरे यांच्या उभारणीचं काम चालू आहे, जंगलांची लावणी जोपासना चालू आहे अशा शांततामय काळात. आता तुम्हीच न्याय करा, आमच्यापैकी कोण शांतताप्रेमी आहे?" ख्यारा बोलत होता.

"यंदाच्याच वर्षी आम्हाला स्टेनोग्राफी शिकवायला सुरुवात केलीय याचं वाईट वाटलं मला. नाहीतर तुमचा शब्दन् शब्द उतरवून घेता आला असता मला," लेल्या म्हणाली.

"कशाकरता? मी काहीही बोलतोय" ख्यारा म्हणाला.

"पुस्तक झालं असतं एखादं,"

"मला नक्की माहीत नाही, पण पुस्तकं काही अशी लिहिली जात नाहीत." ख्मारा बोलला.

"नाही, नाही, अशीच लिहिली जातात!." लेल्या हट्टाने म्हणाली.

"तुला काय वाटतं, ख्मारा?" ख्माराकडे मिस्किलपणाने पहात युर्काच्या वडिलांनी विचारले. "तू तर कुठल्याही विषयावर अधिकार वाणीने बोलणारा वक्ताच दिसतोस मला! तू बोलत असताना कुणीतरी ते नकळत लिहून घेतलं असतं तर" "समुद्रावरची जिवंत सफर" या नावाचा एक वजनदार ग्रंथच तयार झाला असता."

"थांबा" यूराच्या वडिलांनी खिडकीच्या कट्ट्यावर थाप मारून सगळ्यांना गप्प करत एखादं गुपित सांगितल्यासारखं हळू आवाजात ते म्हणाले. "मी अगदी विसरून गेलो. आज सोनेरी इपोमियाची फुलं उमलणार आहेत. त्या ऽ तिथं व्हरांड्याजवळ."

लेल्याला या फुलाबद्दल यूराच्या वडिलांनी सांगितलेल्या गोष्टी आठवल्या. इपोमियाची सारी फुलं क्षणात फुलतात. पाहाता पाहाता त्यांच्या पारदर्शक पाकळ्या अशा थरतात की लांबून असं दिसतं की इपोमियाच्या झुडुपांवर जिवंत फुलपाखरांचा थवाच येऊन टेकतो आहे!

पण यूराच्या वडिलांनी फार उशिरा इपोमियाची आठवण करून दिली. फुलं उमलून गेली होती. लेल्याने ती फुले पाहिली आणि ती हळूच म्हणाली,

"मला माहीत आहेत ही फुलं! नोवोरोसिइस्कमध्ये मला कुणी तरी एक गुच्छ भेट म्हणून पाठवला होता त्यात अगदी अश्शीच फुलं होती."

तिने एकदम चमकून ख्याराकडे पाहिले आणि ती भराभरा फाटकाकडे चालू लागली.

"अग कुठे चाललीस ?" यूराच्या वडिलांनी विचारले.

"नमस्ते काका ! मी उद्या येईन !" फाटकापलीकडून लेल्याने ओरडून सांगितले.

ख्मारा तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात राहिला. ती खूपच भरभर चालत होती. एका मिनिटात दिसेनाशी झाली ती !



लेल्या काहीशा उत्तेजित मनःस्थितीतच घरी परतली. तिने आईला आणि तिची मैत्रिण क्सेनिया मिखाइलोना यांना आपल्या ख्माराबरोबर झालेल्या भेटीबद्दल दुबळ्या आवाजात सगळे सांगितले.

"हा खलाशी मोठा विचित्र आहे." नतालिया पेत्रोवना म्हणाल्या,

"तुला काय ग माहीत तो विचित्र आहे हे ?"

"बरं बाई, मजेशीर म्हण हवं तर ! दोन्ही सारखंच. बरं, आता प्योत्र आजोबांनी पत्रात काय लिहिलंय ते ऐकशील का ? आत्ताच पत्र आणून दिलं एकानं. आपल्या वयाला शोभणार नाहीत अशा धमक्या दिल्या आहेत म्हातारबाबांनी !"

आजोबांनी काय लिहिले आहे ते ऐकण्याच्या तयारीने लेल्या एका घडीच्या खुर्चीवर मांडीवर हात धरून उत्सुकतेने बसली.

"प्रिय पुत्री नतालिया पेत्रोवना आणि लाडकी नात एलेना मिखाइलोवना यांस,

डोळ्यांना कमी दिसत असल्यामुळे मी स्वतः लिहीत नाही, तर तुम्हाला माहीत नसलेल्या आमच्यातल्याच एका कोळ्याकडून, म्हाताऱ्याच पण दृष्टी अधिक शाबूत असलेल्या, आमच्यापेक्षा अधिक गमत्या अशा इग्नातीय मुसियेविच पांचेन्कोकडून पत्र लिहून घेत आहे. आम्हा दोघांचे तुम्हाला अभिवादन ! तुम्हाला उत्तम आरोग्य आणि सुस्थिती लाभो हीच सदिच्छा ! आपल्या मातृभूमीच्या भरभराटीसाठी तुम्ही करत असलेल्या कामात तुम्हाला, त्याचप्रमाणे आपल्या सगळ्या जनतेला यश लाभो ही सदिच्छा !"

नतालिया पेत्रोवनाने क्षणभर पत्रावरून दृष्टी बाजूला केली आणि पुटपुटली "इग्नातीय मुसियेविच काय ! काय लिहिताहेत आणखी ?' ती वाचू लागली.

"मला वाटतं, त्यावेळी तू लहान होतीस अगदी. त्यामुळे तुला पारास्या जिलन्चेन्को-बद्दल आठवत नसेल. तिनं इवान सिदरेंको या फार दूरच्या माणसाशी लग्न केलं होतं. आणि नंतर ती त्याच्याबरोबर डॉनच्या पलीकडे, वोल्गाच्याच किनाऱ्यावर कुठेतरी निघून गेली. तिनं त्याच्याबरोबरच सारं आयुष्य तिथंच घालवलं. तेव्हापासून आपल्या पेत्रुशिन भूशिरावर ती एकदासुद्धा आली नाही. तरीही माणसाचं मन नेहमी आपल्या वाडवडिलांच्या वास्तूकडे, वासराची ओढ गोठ्याकडे या म्हणीप्रमाणे आपल्या कुंपणा-कडेच असते, त्याप्रमाणे पारास्याचं लक्ष आपल्याकडे लागलं आणि तिच्याकडून

आम्हाला एक संस्मरणीय पत्र आलंय ! तिच्या त्या पत्राबद्दलच मुख्यतः आम्हांला सांगायचंय.

तुम्हाला नक्कीच माहीत असणार की सध्या एक कालवा खणताहेत. वोल्गातून डॉनमध्ये जाण्यासाठी जलमार्ग करताहेत आणि तिथून आमच्यापर्यंत अझोव समुद्रात येण्यासाठी त्या कालव्यावर आणि डॉनवर बांध घालून पुष्कळ पाणी साठवलं जाईल ते इथल्या रखरखीत स्टेपला पाणी पुरवण्यासाठी. तो प्रचंड पाण्याचा साठा एखाद्या समुद्रासारखा असेल. तऱ्हेतऱ्हेच्या माशांनी ते भरून जाईल. ह्या नव्या समुद्राकाठी राहणारे लोक मूळचे कोरड्या जमिनीवरचे. त्यामुळे त्यांना आपल्यासारखं समुद्रावरचं मासेमारीचं काम आणि कोळ्याचं जीवन माहीत असणार नाही. ते दोन्ही त्यांना सारखंच अपरिचित. म्हणून पारास्याने लिहिलं आहे की, मासेमारीच्या सहकारी संस्था स्थापन करण्याची तयारी चालू आहे. पण होड्यांना डांबर लावणं किंवा इतर असल्याच बारीक सारीक गोष्टींची तयारी करणं काही त्यांच्या डोक्यातच येत नाही. म्हणून पारास्यानं लिहिलं आहे, " आणि जेव्हा काही दिवसांपूर्वी त्यांना कळलं की मी जन्मानं आझोव समुद्राच्या किनाऱ्यावरची आहे तेव्हा सगळ्यांची धाड आमच्या घरावर आली आणि त्यांनी विनंती केली की मी आपल्या तिकडल्या जाणत्या कोळ्यांना पत्रात लिहून विचारावं की तुम्ही काही मदत नाही का करू शकणार ? या उघड्या स्टेपमधेसुद्धा मी कोळीणच होते आणि कोळीणच राहिलेय. सगळेजण मला किनाऱ्यावरची पारास्या या नावानंच ओळखतात. म्हणून मी तुम्हाला सांगते, की आमची ही विनंती तुम्ही नाकारू नका. " नव्या समुद्रकिनाऱ्यावरच्या लोकांचं पत्र आम्हाला मिळालं आणि मी, इग्नातीय मुसियेविचन तिथं जाऊन त्या भल्या लोकांना मदत करायचं ठरवलं आहे तुम्हाला माहीत आहेच, की इग्नातीय मुसियेविच शिडांचा दर्दी आहे आणि उत्तम दोरखंड वळणारा आहे. मी थोडंफार बोटी रंगवण्याचं आणि जाळी विणण्याचं काम जाणतो.

उन्हाळ्याच्या सुटीत तुम्ही याल म्हणून वाट पाहिली. पण तुम्ही इथे आलाच नाहीत. या जगातली माझी आयुष्याची वर्षं आता मोजकीच आहेत. म्हणून इकडे येणे शक्य झाल्याबरोबर येऊन जा. एकूण अशी आहे हकीगत आमच्याकडची. या वसंत ऋतूत सुदाक मासे खूपच मिळाले. जाळी भरभरून मिळाले. आपल्या सामुदायिक शेतात नवं इंजिन बसवलं आहे. घरात सगळं पूर्वीसारखंच आहे. फक्त हिवाळ्यातल्या वादळानंतर भिंतींना धिरे द्यावे लागले. शतायू व्हा हाच माझा आशीर्वाद !

तुमचा
प्योत्र गालागिन

नतालिया पेत्रोवनाने पत्र बाजूला ठेवले आणि प्रसन्न चेहेऱ्याने अंधारात बागेकडे पहात स्तब्ध उभी राहिली. आणि जणू काही प्योत्र सोफ्रोनोविच तिथे तिच्याजवळ

व्हरांड्यात बसले आहेत आणि अपराधी चेहेरा करून तिचे म्हणणे ऐकताहेत अशा थाटात ती म्हणाली, " काय हे बाबा तुमचं ? काय पण विचार ठरवलात ! तुम्हाला आवरणं मोठं कठीण आहे बाई ! आत्ता, अगदी सत्तरीला तिथं जायचं काढलं आहात. नक्कीच हे त्या इम्रातीय मुसियेविचनं तुमच्या डोक्यात भरवून दिलेलं असणार ! अति वळवळ्या आणि गळेपडू म्हातारा आहे तो. भारी विलक्षण आहे हे सगळं ! "

आईची एक विचित्र लकब लेल्याच्या लक्षात आलेली होती. जेव्हा जेव्हा नतालिया पेत्रोवनांना वडलांची आठवण यायची त्या प्रत्येक वेळी त्यांच्या बोलण्याला मृदू दक्षिणी सुरांचे हेलकावे यायचे आणि ती आझोवच्या जातिवंत कोळणींच्या ढंगाने बोलावयास सुरवात करायची.

अशा रीतीने त्या जणु आपले बालपणच जवळ आणायच्या ! बालपणाच्या आठवणींनी त्यांच्या चेहऱ्यावर नेहमी हसू उमलायचे. बालपणचा काळ कठीक होता तरीही. प्रत्येकाचे बालपण रम्यच असते तसेच त्यांचेही बालपण रम्यच होतं—कष्टाळू, तरीही स्वप्नाळू ! अगदी साधंसुधं ! मातीच्या, पांढऱ्या भिंतींच्या घरासारखं, बागेतल्या मखमलीच्या फुलांसारखं, आझोव समुद्रासारखं. काळ्या समुद्राशी आझोवची तुलना तरी करता येईल का ? आझोवपुढे काळा समुद्र म्हणजे जणू बुद्धिमान् रूपगर्विता ! आणि आमचा आझोव समुद्र म्हणजे चेहेऱ्यावर वांग असलेली साधीसुधी लाजरी बुजरी कोळ्याची पोर ! निळे निळे डोळे आणि पिंगट वर्ण एवढंच तिचं सौंदर्य !

" वाटेचा वारा लागून आजारी पडण्यानं काय साधणार आहे ? सत्तरीचं वय आहे बरं का तुमचं, चाळिशी नाही ! खरोखरीच या जगातली मोजकीच वर्षं उरली आहेत आता त्यांची. आणि असं असून त्यांच्याकडे जायचं सोडून इथं या कॉकेशसची हवा खायला आले मी " खंतावून नतालिया पेत्रोवना उद्गारल्या.

" हे बघ आई, " लेल्या मंजूळ मृदु आवाजात म्हणाली, " तू इतकी अस्वस्थ होऊ नकोस. अजून महिना आहे त्सिमलाला आपल्या घरी जायला. दोन आठवडे आपण आधी निघू आणि वाटेत त्यांच्याकडे नव्या समुद्रावर जाऊ. ते अगदी आपल्या परतीच्या वाटेवर आहे. "

नतालिया पेत्रोवनानी लेल्याला जवळ घेतले आणि तिच्या चमकदार केसांवरून हात फिरवत राहिल्या. त्यांच्या मनात विचार आला " किती गोड आहे लाडकी माझी ! चांगलं होईल ना तिचं आयुष्यात ? "



दुसऱ्याच दिवशी ख्माराला तारेने बोटीवर बोलावून घेण्यात आले. लेल्याचा निरोप घेण्याइतकीसुद्धा सवड न मिळता त्याला तसेच जावे लागले.

संध्याकाळच्या सुमाराला बागेत बसून लेल्या गॉर्की वाचत होती तेव्हा तिला

खभाराच्या जाण्याबद्दल कळले.

काहीशा संकोचानेच यूर्का मागच्या वाटेने बागेत शिरला, पावेल पेत्रोविचना तातडीने तुआप्सेमध्ये बोलावून घेण्यात आल्याचे सांगितले आणि स्फटिकाचा लहानसा गोलखडा पुढे करत म्हणाला,

" हा सेर्दोलिक त्यांनी तुम्हाला दिलाय. ते पैज हरले म्हणून ! पावेल पेत्रोविचना आज सकाळी किनाऱ्यावर सापडला तो वादळानंतर "

" ठीक आहे, आभारी आहे. तू जा घरी, यूर्का ! " लेल्या म्हणाली.

यूर्का घरी निघाला, पण कडी लागत नसल्याचा बहाणा करत बराच वेळ फाटकाशी घोटाळत राहिला. स्पष्टच दिसत होते की त्याला जावंसं वाटत नव्हतं.

लेल्या उठली आणि समुद्राकडे निघाली. सायंकालीन ढगांची रांग क्षितिजावर झळाळत होती. होऊन गेलेल्या वादळाची निशाणी देणाऱ्या वादळानंतरच्या लाटा अजून किनाऱ्यावर आपटत होत्या. लाटांच्या माऱ्याने किनारा थरथरत होता. सोनेरी अंधारात सूर्य बुडत होता.

लेल्याने सेर्दोलिक मुठीत घट्ट धरून ठेवला होता. त्याचा थंडगार स्पर्श तळव्याला होत होता. हाताच्या उबेने तो उबदार होईपर्यंत सेर्दोलिक मुठीत घट्ट धरून ती समुद्राकडे पाहात उभी राहिली. नंतर छातीवरच्या लहानशा खिशात सेर्दोलिक ठेऊन ती वळली.

शांत होऊन ती घरी परतली आणि अंथरुणावर आडवी झाली. तिने सेर्दोलिकचा खडा उशीखाली लपवला. नतालिया पेत्रोवना आणि क्सेनिया मिखाइलोवना रात्री खूप उशिरापर्यंत कुजबुजत्या आवाजात बोलत राहिल्या होत्या. लेल्या हाच त्यांच्या संभाषणाचा विषय होता. खूप खूप सोसलेल्या प्रौढांना तरुण जिवांचे सान्निध्य हासुद्धा मोठा विरंगुळा असतो. त्याबद्दलच त्या बोलत होत्या.

लेल्याला सारखी जाग येत होती. आईचा आणि मावशीचा आवाज, समुद्राच्या तालबद्ध धडका दूरवरून ऐकू येत होत्या. बागेतल्या अंजिराच्या पानात वारा कळे न कळेशी सळसळ उठवत होता.

# १

स्तालिनग्राडहून मी वोल्गा-डॉन काल्व्यावर गेलो. आणि तिथून कलाचला. कलाचहून त्सिमलाच्या बांधकामावर जायची मला इच्छा होती. तिथे स्टेप पार करून मोटारीने जाता येते किंवा लांबलचक वाटोळ्या रेल्वेमार्गाने जाता येते. डॉनच्या या पात्रात प्रवासी बोटी येत नसत.

माझ्या नशिबाने एक बंदिस्त टगबोट कलाचमध्ये आली. ती त्सिमललाच चालली होती. त्या बोटीच्या हसऱ्या डोळ्यांच्या, पिकलेल्या मिश्यावाल्या लठ्ठंभारती कप्तानाने मला त्सिमलापर्यंत न्यायचे कबूल केले. बोटीत त्याने आणखीही काही प्रवासी घेतले. त्यात इंजिनियर स्तारोस्तिन होते.

आम्हा दोघांनाही टग बोटीवर आल्याचे समाधान वाटले. कारण आम्हाला डॉन नदी एकदा शेवटची पाहून घ्यायची होती. एका वर्षानंतर या जागी डॉन नसणार ! तिच्याऐवजी इथे पसरेल त्सिमलाचा पाण्याचा प्रचंड खजिना—डॉन समुद्र !



सबंध दिवस आम्ही डेकवरच घालवला. पांढऱ्या ढगांच्या रांगानी भरलेले पाण्यात प्रतिबिंबित झालेले आकाश समोर तरंगत होते. टगबोटीचे नाक त्याला दुभागत होते. चाकामुळे उठलेल्या लाटा ढगांच्या सावल्यांना हेलकावे देत किनाऱ्याकडे ढकलत नेत होत्या. आणि पळत वाळूवर जाऊन फेसाच्या रूपाने विसावत होत्या.

एकही स्टॉप न घेता टगबोट त्सिमलापर्यंत गेली. थांबायचे कारण नव्हते आणि

जागाही नव्हती. डॉनच्या किनाऱ्यावरची स्टेशने आणि वस्ती आधीच उंच जागी हलवली होती. घरे नसलेले रुंद रस्ते, कुंपणे, झाडे, राखेचे ढिगारे, रस्त्याच्या चाकोऱ्या जुन्या विटांचे तुकडे, काढून नेलेल्या झाडांचे ओकेबोके खड्डे यांच्यावरून फक्त तिथे खेडी होती असा अंदाज करता येत होता. नव्या समुद्राच्या तळाच्या साफसुफीचे काम संपले होते. शेवटची झुडुपे तोडून झाली होती, शेवटची घरे दुसरीकडे हलवली होती.

माणसांनी रिकामी केलेली ही भूमी डॉनचे पाणी कशी भरून काढेल हे मी कल्पनेने पाहू लागलो. पाण्याचे हे आक्रमण पाहायला दुसऱ्या खेड्यांमधली माणसे येतील. या दृश्याने भारलेले लोक त्या पाण्याच्या लोंढ्यापुढे एक एक पाऊल माघार घेतील.

माणसाने घालून दिलेल्या मर्यादेवर पाणी थांबेल आणि आधीच तयार केलेल्या किनाऱ्यावर विसावेल.

पाण्याच्या खजिन्याचा नितळ पृष्ठभाग निःश्वास टाकेल आणि पहिल्या लाटांच्या रूपाने स्टेपवर पाऊल ठेवेल. नवा समुद्र आपल्या चिरंतन कार्याला सुरूवात करेल; किनाऱ्याला न्हाऊ घालेल. वाळू पाणवनस्पती आणि पांढऱ्या होईपर्यंत धुऊन काढलेल्या मानवी वस्तीच्या खुणा-लाकडी फळ्या, फुटकी कौले, काचांचे तुकडे, त्यातच एखादी रिळांची चाके लावलेली खेळातली गाडीही असेल—अशा वस्तू किनाऱ्यावर टाकील.

समुद्रावरील तरंगत्या दिव्यांचा पहिला प्रकाश अंधारात फाकेल. उसळत्या लाटांवर त्यांचे लाल पांढरे पट्टे विसावतील.

नव्याने निर्माण केलेल्या समुद्रावर दिवस महिने, वर्षे यांची अखंड मालिका सुरू होईल. लाटा आता गत जीवनाच्या खुणाच फक्त किनाऱ्यावर आणणार नाहीत, तर कापसाच्या बोंडांची मखमली टरफले, ॲश्रासाईट्सचे मोत्यांची चमक असलेले काळसर तुकडे, डॉनच्या काठावरच्या बागांमधल्या लिंबांच्या सालीही त्यात सापडतील.

रात्र अगदी कुंद होती. म्हणून सगळे प्रवासी डेकवरच होते. कुणी बसले होते, कुणी आडवे झाले होते. आमच्यात संथ संभाषण सुरू होते. कुणालाच झोपावेसे वाटत नव्हते. इतर वेळी टगबोटीच्या चाकांचा एकसुरी आवाज आणि पाण्याची खळखळ यांनी सगळ्यांना पेंग आणली असती. कप्तान थोडा वेळ आमच्यात येऊन बसला.

सगळे नव्या समुद्राबद्दलच बोलत होते. कप्तान आपल्या बोटीबद्दल म्हणाला.

"ही माझी बुड्डी या शरदऋतूत रोस्तोवला जाईल. तिथे पाण्याच्या खजिन्यावर फेऱ्या करण्याच्या दृष्टीने तिची दुरुस्ती करतील. आता आहे त्या स्थितीत ती तसल्या कामाला कुचकामीच आहे. तिचं बाहेरचं अस्तर बळकट बनवलं पाहिजे नाहीतर लाटांच्या माऱ्यानं तुकडे व्हायचे तिचे! काळ्या समुद्राप्रमाणेच त्या खोल पाण्यात मोठाल्या लाटा उठतील. पण घाबरायचं कारण नाही. खूप मोठा पुरेसा विस्तार आहे त्यासाठी. लांबीला २०० किलो मीटर आणि रुंदीला ३० किलो मीटर! कुठूनही पाहिलं तरी

समोरचा किनारा काही दिसणार नाही." कप्तान स्तब्ध झाला.

"आमच्यासाठी नव्या टगबोटी बांधताहेत सोर्मोवमध्ये. आमचा एक कप्तान जाऊन पाहून आला. प्रॉपेलरवर चालणाऱ्या टगबोटी! जंगली श्वापदासारख्या दणकट! क्रूझरसारखे पाणी कापतील. शेपटीकडे नुसता धूर आणि निशाण दिसेल. आणि सांगा बरं नाव काय असेल त्यांचं?"

"वोल्गात असल्या बोटी कधीपासून चालताहेत," एक किरकोळ बांध्याचा माणूस म्हणाला. त्याने सिगरेट पेटवण्यासाठी काडी ओढली. खोलीत संथ जळणाऱ्या मेणबत्तीसारखी काडी संथपणे जळत होती. "त्यांना म्हणतात गायक"

"गायकच का म्हणतात?" मी विचारले.

"त्यांच्यावर रेडिओ असतो. त्या धक्क्याकडे येतात, रेडिओ सुरू करतात आणि थेट मॉस्कोतल्या संगीत विद्यालयातले सूर बंदरावर उधळले जातात."

"सुंदर!" अंधारात कुणीतरी असूयेने सुस्कारा सोडला.

"खरोखरीच फार सुंदर!" कप्तानाने दुजोरा दिला.

"लगेच नाही, पण असल्याच प्रवासी बोटी चालणार आहेत इथे असं म्हणतात. चकचकीत, रुंद डेक, विजेचे दिवे, नृत्यगृहं!"

"सुंदर ते सुंदरच!" अंधारातून पुन्हा तो आवाज आला.

"पण तेच काम तुम्ही जवळून पाहा, स्वतः करा," कप्तान म्हणाला. "आपल्याला वाटतं तितकं सगळं सोपं नसतं. बसतो न बसतो बोटीत तोच पोचलो मुक्कामाला! छान झाली हं ट्रिप " असं म्हणण्याइतकं सोपं नसतं ते. हेच पाहाना? हा आपला पाण्याचा खजिना बांधताहेत. किती किती सर्वेअर राबले असतील इथं! इथल्या जागेच्या उंचसखलपणाचा बारीक सारीक तपशिलसुद्धा पाहावा लागला त्यांना. या पाण्याच्या खजिन्याची खोली लक्षात घेऊन या उंच सखल भागात तो कुठपर्यंत भरेल हे ठरवावं लागलं. या दऱ्यांच्यामध्ये, स्टेपभर तो स्थिरावेल, त्याची मर्यादा आणि हद्द कुठपर्यंत राहील हे सगळं पाहावं लागलं आणि नकाशावर रेखाटावं लागलं. हरतऱ्हेच्या अडचणी होत्या. वस्ती हालवली त्याचंच उदाहरण घेऊ. वस्त्या डॉनपासून दूर हलवल्या. त्या नव्या वस्त्यात पाणी नाही. विहिरीत फक्त ओलसर वाळू होती. पण आता सगळं ठीक केलंय तिथं. किती दिवसांपासून आपण काम करता करताच शिकतो आहोत."

"तुम्हाला नदीवरच्या कामगारांना सुद्धा शिकावं लागणार आहे का?" मी विचारले.

"फार नाही. आमच्या नदीवरच्या सफरीपेक्षा समुद्रावरची सफर सोपी."

"सोपी कशी हो?"

"नदीवर धोके जास्त. बोट चालवताना लहानसा पूल टाळणं शक्य काही नाही.

तुमच्या बोटीच्या तळाखाली फक्त १० सेंटीमीटर पाणी असेल. कधी कधी त्याहूनही कमी. पाहाता पाहाता तळाला घासेल आणि तिथंच बसायची वेळ येईल. घाईगर्दीत इकडे लक्ष ठेवावं लागतं, की बोट किनाऱ्याला तर घासून जात नाही ना? आणि नदीवर बोट चालवण्याचा मार्ग रोज बदलतो. डॉन मोठी लहरी नदी आहे! नाना खेळ करते नेहमी. आत्ता आम्ही अर्धाच माल घेऊन जातो. हजारो टन माल उगीचच किनाऱ्यावर पाडून ठेवावा लागतो. पण जेव्हा डॉन समुद्राचं पात्र भरेल तेव्हा पुष्कळ वाव मिळेल. आमच्या बोटीखाली कितीतरी मीटर खोल पाणी असेल! कसलीच भीती नाही. प्रवाहसुद्धा त्रास देणार नाही. खाली जाणं काय किंवा वर जाणं काय, संथ, शांत पात्रात दोन्ही सारखंच."

"समुद्रात पूर्ण वेगानं पाणी कापता येतं." व्हील हाऊसमधून चाकाजवळचा माणूस म्हणाला.

"आणि वादळांचं काय?"

"वादळांचं काय असायचं? फारच थैमान घालत असेल तर वाटेत आश्रयाच्या बंदरात किंवा आतल्या बाजूला खाडीत शिरायचं आणि वादळ शांत होईपर्यंत वाट पाहायची. अशी ठिकाणं खूप बनतील. पूर्वीच्या डॉनच्या सगळ्या उपनद्यांची मुखं! बाकी सगळं अगदी समुद्रावरच्या सारखंच असेल, दीपस्तंभ, निशाण्या, तरंगते दिवे! समुद्रातल्याप्रमाणेच सगळ्या साधनांच्या इशाऱ्याबरहुकूम प्रवासाला सुरुवात करू. आतासारखे नाही, केव्हाही आपली कप्तानाला हाक द्यावी आणि म्हणावं, "ए सेन्या, त्या वाळक्या वाळुंजीपाशी घे जरा" नाही तर "त्याऽऽ तिकडच्या 'कलिंगडांच्या काशीत तंबाखू ओढत बसलाय ना माणूस? तिथं ने जरा." तिथं आमच्या सगळ्यांच्या ओळखीचा प्रोफिय राखणदार कुणालाही मोह पडावा अशी आपली कडक तंबाखू ओढत बुजगावण्याऐवजी बसलेला असायचा."

"अगदी खरं! सध्या अगदी अस्सच चालतं," चाकापासल्या माणसाने दुजोरा दिला.

खाली पसरलेल्या रूदार जाकिटावर एक १० वर्षांचा मुलगा माझ्याशेजारी डेकवर आडवा झाला होता. त्या मुलाचा बाप–युक्रेनियाच्या पदोल्स्क भागातला सुतार सिमलामध्ये कामावर चालला होता. उंच निंच पण बुजरा. हळू आवाजात तो मुलाला सारखा बोलत होता. मुलगा सबंध डेकभर अनवाणी फिरतोय, त्याला मुळीच पायात घालायला नको म्हणून तो अस्वस्थ झाला होता.

"एऽऽ चार लोकांत वाईट दिसतं, तू आपल्या खेड्यात, कार्पिलोवकात नाहीस. घाल चल हे बूट पायात!" " कुजबुजत्या आवाजात तो मुलाला समजावत होता.

"पाय आवळतात माझे बुटानी मग कसे घालणार मी ते?" तो तशाच खालच्या आवाजात बोलला.

" आली का कटकट आता ! " सुताराने सुस्कारा टाकला. " विकत घेतलेन् तेव्हा काय पाह्यलंन बयानं कोण जाणे ! "

मुलाला झोपच येत नव्हती. तो सगळयांचे बोलणे लक्ष देऊन ऐकत होता. वरचेवर मान वर करून वडलांना विचारत होता, " बाबा ते काय बोलताहेत. "

" सगळ्या गोष्टींबद्दल. झोप आता वळवळ करू नको ! " वडील म्हणाले.

पण मुलाला झोप येणे शक्यच नव्हते. जेव्हा प्रवासी गप्प झाले, तेव्हा मुलगा म्हणाला,

" बाबा, खरंच काहो इथं समुद्र होणार आहे ? "

" नाही तर काय ! " वडिलांनी उत्तर दिले, " मी तुला आता एक गोष्ट सांगतो पण मग झोपलं पाहिजे. माझं डोकं उठवणार नाहीस ? "

" नाही. नाही डोकं उठवणार. "

" ऐक तर मग. इथं समुद्र होणार आहे. पाणी थेट घरांपर्यंत येणार आहे. याक मासे इथे खेळतील, शेपट्यांनी पाणी उडवतील. तुषारांनी सगळ्या घराच्या भिंती ओल्या होतील. पोरा, असं घडेल ! पाणी अगदी स्वच्छ स्वच्छ असेल, डोळ्यातल्या पाण्यासारखं ! सगळ्या जगात इतकं गोड पाणी कुठं असणार नाही. भोवती सगळी-कडं बागा होतील, झुडपं फुलतील. त्या कोपिष्ट म्हाताऱ्यानं फ्रेतेनचं झाड आणलंय ना आपल्याबरोबर वस्तीवर ? तेही फुलेल. सगळ्या खेड्याची वस्ती हलवली तेव्हा त्या धडपड्या म्हाताऱ्यानं ते झाड सामानाच्या मोटारीत भरलं. म्हातारा म्हणतो कसा, " मला वेड्यात काढलंत तुम्ही तरी मी काही झालं तरी ते फ्रेतेनचं झाड टाकणार नाही. मी स्वतः वाढवलंय त्याला. माझ्या म्हातारीनं आपले कपडे वाळवलेत त्याच्यावर. नाही म्हणजे नाही ! मी फ्रेतेन टाकणार नाही. अगदी कामातून गेलाय म्हतारा असं तुम्हाला म्हणायचं असलं, तरी खुशाल तसं म्हणा. माझी टिंगल करा, हसा, काही करा ! "

" त्यानं आणलंन् ते वाहून ? " मुलाने विचारले.

" आणलंन्, आणि आता स्वतःच्या नव्या घराशेजारी लावलं आहेन् कुरणात. आणि एक वर्षानंतर त्या त्याच्या घराजवळ तलावाचं पाणी येऊन पोचलं. त्याच्या उंबरठ्यालाच भिडलंय. सुंदर जीवन फुलवण्यासाठी माणसांनी तो तयार केलाय. तलाव इतका मोठा आहे की सूर्य खाली जायला लागतो तेव्हा त्याचा दुसरा किनारा काही दिसत नाही. नुसतं सोनेरी ऊन पाण्यावर खेळताना दिसतं. त्यानं डोळे दिपतात. काय करत नाहीत आपली माणसं ! फाऽऽर मोठं आहे त्यांचं मन ! सगळं काही करतील ती पोरा ! एक किंवा दोन आठवड्यांनी एक दिवस तो म्हातारा अगदी पहाटेचाच जागा झाला. नुकतं कुठं दिसायला लागलं होतं. तलावावर अजून धुकंच होतं. जागा होऊन बाहेर आला आणि उंबऱ्यावर बसला. लवलवत्या कोवळ्या पालवीनं

त्याचा फ्रेतेन सबंध भरून गेला होता. फुलला होता. फुलाचे झूल लुटूलुटू हलत होते. त्यातून पिवळसर पराग उडत होते."

"कशामुळे फुलला तो बाबा?" मुलाने विचारले.

"त्याच्याजवळ पाणी आलं. ते तो पोटभर प्याला आणि तरतरीत झाला. आता काही दिवसांनी त्या म्हाताऱ्याचं घर दाट हिरव्या गारव्यानं वेढून जाईल. झाली गोष्ट. नीज आता!"

"दर वेळचं आहे हे!" सुतार मला म्हणाला आणि ओशाळून हसला. "काही-तरी सांगितल्याशिवाय झोपरणारच नाही तो मुळी. कटकट आहे मोठी!"

तो सिगरेट ओढू लागला आणि विचारात गढून गेला. उत्तर रात्र झाली. काळोखात डॉनचं पात्र नेहमीपेक्षा खूपच रुंद भासत होतं. दिवसा दिसतं त्यापेक्षा खूपच रुंद दिसत होतं.

"छान होती गोष्ट," मी स्तारोस्तिनना म्हणालो.

"हो ना," त्यांनी दुजोरा दिला. "बोलणं निघालं म्हणून सांगतो. मीसुद्धा तुम्हाला काही गोष्टी सांगू शकेन. नाही तरी झोप येतच नाहीये! तुम्हाला माहीत आहे? सोव्हिएट युनियनमध्ये किती नद्या आहेत ते?"

आपले अज्ञान दाखवायची मला इच्छा नव्हती म्हणून मी अंदाजाने सांगितले. "मला वाटतं जवळ जवळ तीस हजार."

चेष्टेच्या सुरात ते म्हणाले, "अगदी बरोबर! पण आपल्याकडे लाखभर नद्या असल्या तर? तुमची हरकत नाही ना?"

"एक लाख नद्या? नक्की?"

"अगदी. अर्थातच वोल्गा-येनिसेय–निवापासून लव्हाळ्यानं झाकलेल्या वेर्तुशिन्का मोईकापर्यंत सगळ्या धरल्या तर. अनेक उपनद्या असलेलं असलं नद्यांचं दाट जाळं कुठंच नाही. आणि अशा निरनिराळ्या समुद्रांना मिळणाऱ्या एकमेकींच्या जवळही न येणाऱ्या नद्या कुठेच नाहीत. आकडेवारी जमवण्याची आवड असणाऱ्या पक्षातल्या एका माणसाशी माझी काल्व्यावर ओळख झाली. त्यानं हिशोब केलाय. जर सोव्हिएट युनियनचा एखाद्या जाळ्यासारखा दिसणारा नद्यांचा नकाशा घेतला आणि हे जाळं उलगडून त्याचा जर एकच धागा केला–पाण्याचा सलग पट्टा केला तर तो अडीच मिलियन किलोमीटर लांबीचा भरेल.

"म्हणजे आपल्या पृथ्वीपासून थेट इतर ग्रहापर्यंत म्हणाना!" सुतार म्हणाला. तो आमचं बोलणं ऐकत होता असं दिसलं.

"तुम्ही जलशास्त्रज्ञ, नद्यांचे जाणकार! तुम्ही रशियन नद्यांबद्दलच्या बऱ्याच कविता वाचल्या असतील ना?"

"मला वाटतं अशा कविता फार थोड्या आहेत."

" उलट आहे ! अशा कविता खूपच आहेत. उत्कृष्ट काव्य आहे त्यातलं " थोड्या बदला घेतल्याच्या आनंदाने मी म्हणालो.

" उदाहरणं सांगा बरं ? "

" सांगतो की ! यझिकोव नावाचा कवी होऊन गेला. सिंव्रिस्कमधला पण बल्गेरियन होता तो. पुष्किनचा मित्र होता. रशियन नद्यांबद्दलच्या त्याच्या कविता अद्वितीय आहेत. तो लिहितो " विचारपूर्वक " आणि " आकर्षकपणे " वाहातात त्या ! वोल्गा-बद्दल तो लिहितो,

हे महानदी, शाही मुजरा तुला !
तुला, जलराणीला.
सुंदर किनारा सिंचित अपुला,
पळणाऱ्या विशाल, रशियन नद्यांच्या महाराणीला !
शाही तुझी सदैव चाल,
टेकड्यांतून पर्वतातून दऱ्यामधून समृद्ध विपुल,
मंद लाटांना भिडणाऱ्या कास्पियनच्या काळ्या !
कृतज्ञ उपनद्यांचा मुजरा तुला,
सख्यांचा आणि सरदारणींचा तुझ्या !

आणि पुढे थक्क करून सोडणारी रशियन नद्यांची वर्णनात्मक नामावली आहे. त्वेरचा–हजारो बोटींना संभाळणारी, ओका–ओकच्या जंगलांनी वेढलेली सुरी–विचारात बुडून जाऊन फिरणारी सुंदरी, स्वियागा–खेळकर, कधीच निद्राधीन होणारी. आणि शेवटी कामा–जोमदार वादळी प्रवाहातून गरूडांच्या चित्कारांच्या साथीने करड्या भिंतीच्या दगडी किनाऱ्याना धडका देत लोखंड, लाकूड, प्रचंड हत्तींएवढाले मिठाचे डोंगर वाहून नेणारी !

" बहोत खूब ! झकास ! " स्तारोस्तिनने दाद दिली.

" मीसुद्धा शाळेत पुष्कीनची कविता शिकलोय ! " झळाळते पूर्वा नवोन्मिलित उषेने " अचानक त्या मुलाने माहिती दिली.

" अरे बापरे ! तू झोपला नाहीसच तर ? " संकोचून जाऊन सुतार उद्‌गारला.

" नाही बाबा ! मी ऐकतोय बोलणं " मुलाने उत्तर दिले.

" काय करणार आहेस या गप्पा ऐकून ? ऐकण्याचं नावच नाही मुळी तुझं ! "

" खरा मुलगा आहे ! वयच तसं आहे त्याचं. त्याला सगळयात गोडी आहे सध्या ! " स्तारोस्तिन म्हणाला.

" तसंही असेल कदाचित् " सुताराने पुष्टी दिली.

" सुंदर आहे कविता. पण तुम्हाला माहीत आहे का ? या काव्यमय आणि " विचारात

गढून जाऊन फिरणाऱ्या " रशियन नद्या एका वर्षात तीन बिलीयन किलोवॅट विद्युत-शक्ती देऊ शकतात. आणि दरवर्षी या नद्या जवळ जवळ चार हजार क्यूबिक किलो-मीटर पाणी समुद्रात टाकतात. " स्तारोस्मितने माहिती दिली.

" आम्हाला कुठून हे सगळं माहीत असणार ? " अपमानित स्वरात मी म्हटले.

" तुम्हाला का अपमान वाटला ? हे सगळं माहीत करून घ्यायची जबाबदारी तुमची नाहीच. हे काम आमचं, जलशास्त्रज्ञांचं, जलतंत्रज्ञाचं आहे. " स्तारोस्तिननी खुलासा केला.

" मला आपलं असं वाटतं की आता हे तुमचं, ते आमचं असं काही राहिलं नाहीये, तर सगळं सगळ्यांचं आहे. शास्त्र आता माणसाच्या जीवनापर्यंत येऊन भिडलंय ! आपल्या देशात कुठेही गेलात तरी ज्यात त्यात हेच दिसतंय ! " सुताराने आपले मत सांगितले.

आता उजाडलं होतं. करडं धुकं पसरलेल्या पहाटेच्या कुरणांवर उषेचा प्रकाश फाकला. समोर डॉनच्या बाकणापलीकडे त्सिमलाच्या बांधकामावरचे असंख्य दिवे विरळ होणाऱ्या धुक्यातून दिसू लागले. प्रकाशाच्या भिंतीने त्यांनी डॉनला अलग पाडले. कुंपणाच्या खांबांसारखे माती खणणाऱ्या यंत्रांचे दांडे दाटीवाटीने उभे होते. अजून काळसर दिसणाऱ्या पश्चिमाकाशात धूसर अंधार रेंगाळत होता. टगबोटीने वेग वाढवला.

" ए, पोरा, चल बूट घाल, उतारायचंय आता. " सुतार मुलाला म्हणाला.

सूर्याची सरळ किरणे नदीवर पडली होती. तांबूस रंगाच्या किनाऱ्यावर आणि मातीच्या धरणावर आक्रमण करत होती. डॉनच्या उजव्या बाजूच्या उंच किनाऱ्या-पासून धरण सुरू होत होते आणि सबंध पात्रावरून जाऊन दूर कुठेतरी कुरणात लोप पावले होते.

" हा डॉन समुद्राचा पश्चिमी किनारा, " आपल्या काचेच्या खोलीतून कप्तानाने सांगितले. आणि धरणाकडे हात करत म्हणाला. " आता त्याच्याजवळ जाऊ. "

किनाऱ्याकडे जाण्यासाठी टगबोटीने मोठाली अर्धवर्तुळे रेखायला सुरवात केली. आपले कॉंक्रिटचे प्रचंड शरीर, धरणाची अवाढव्य भिंत, क्रेन, पूल, आर्मेचरच्या मधल्या भिंती हे सारे आम्हाला दाखवण्यासाठी जणु ते सगळे बांधकाम मुद्दाम जागचे हलले आणि एकदम उजव्या बाजूचे डाव्या बाजूला गेले.

# १०

प्रोखोरोव आणि पालेय हे माती खणणाऱ्या यंत्रांचे ड्रायव्हर झिमल्यानोयच्या विभागात साध्या माती खणणाऱ्या यंत्रावर काम करत होते. स्वयंचलित मोठ्या आणि मध्यम आकाराच्या माती खणणाऱ्या यंत्रांच्या नोकरवर्गाबद्दल इतरांना एक प्रकारचा हेवा वाटायचा. त्या एकाच भावनेने प्रोखोरोव आणि पालेय एक झाले होते, नाहीतर इतर सर्वबाबतीत त्यांच्या इतक्या परस्परविरोधी व्यक्ती सापडणे कठीण होते.

प्रोखोरोव उंच, खप्पड चेहेऱ्याचा, तर पालेय बुटका, भरलेल्या अंगाचा आणि इतर कॉम्रेडस त्याला म्हणायचे त्याप्रमाणे "दुर्गुणातच जमा होण्याइतका उदार" होता.

मोकळ्या वेळात प्रोखोरोव कसल्यातरी बेरजा वजाबाक्यात गुंग असायचा, तर पालेय आपला सारा रिकामा वेळ नोवोचेर्कास्काहून उन्हाळ्याच्या सुटीसाठी घरी आलेल्या आपल्या शाळकरी मुलीबरोबर घालवायचा. परसदारच्या बागेत काम करायचा, वाचायचा. शीष्कोवच्या "नदीचे औदासीन्य" सारख्या दीर्घ कादंबऱ्या त्याला आवडायच्या. तो त्या पुन्हा पुन्हा वाचत राहयचा. हावऱ्यासारख्या भराभरा वाचलेल्या शंभर पुस्तकांपेक्षा १० पट ज्ञान सावकाश वाचलेल्या एका पुस्तकातून मिळते असे त्याचे मत होते.

स्वयंचलित माती खणणाऱ्या यंत्रांच्या नोकरवर्गाबद्दल एकप्रकारची असूया वाटत असली तरीही या मोठ्या स्वयंचलित यंत्रांशिवाय बांधकाम चालू शकणार नाही हे प्रोखोरोव आणि पालेयला समजत होते.

मोठे स्वयंचलित माती खणणारे यंत्र दिवसभरात मातीच्या डोंगरांच्या रांगा रचते, पाठीमागे मोठा खड्डा निर्माण करते आणि पुढे जाते. आणि मग लहान माती खणणारी यंत्रे तिथे कामाला लागतात. उकरलेली जमीन आणि कडेच्या भिंती ती सारख्या करतात. कालव्याला चांगला, योग्य आकार देतात, मोठ्या यंत्रांनी केलेल्या कामापेक्षा हे काम जास्त नाजूक आहे, आपल्यापरीने स्वतंत्र प्रकारचेच काम आहे ते!

"ते रंधे मारतात आणि आपण जुळणी करतो." पालेय विनोदाने म्हणाला. "आपण आपल्या ह्या कामावर शेवटचा सफाईचा हात फिरवतो."

एकमेकांवर मात करण्याचा प्रयत्न करत प्रोखोरोव आणि पालेय जवळ जवळ रोजच शेजारी शेजारी काम करत. मात्र हा प्रयत्न अगदी मुकाट्याने, चोरटेपणाने आणि जणु काही एकमेकांना असे करताना आपण पाहिलेलेच नाही अशा थाटात चाले. पण प्रत्येक जण दुसऱ्यावर किंचित मत्सराच्या भावनेपोटी बारीक लक्ष ठेऊन असे.

कालव्याच्या कामावर असताना सर्वसाधारणपणे एकमेकांवर रागावणे, जळफळणे हे दिसायचे नाही. विनोद करायचा, पुष्कळसे हसायचे, पण कुणीही दुसऱ्याबद्दल संशय दाखवायचा नाही किंवा स्वतः केलेल्या कामाबद्दल आदर हा बांधकामावरचा अलिखित नियम होता.

आत्ता प्रोखोरोवच्या शेजारी काम करत असताना आपल्या शेजाऱ्यावर कळे न कळेसा दृष्टिक्षेप टाकून त्याचे यंत्र बिलकूल आवाज न करता कसे चालतेय हे जाणून घ्यायचा प्रयत्न पालेय करत होता. स्वभावतःच माती खणणारे यंत्र फार आवाज करते धूळ उडवते. पण प्रोखोरोवचे यंत्र मुळीच करकरत खडखडत नव्हते. पालेयपेक्षा कमी धुराळा उडवत होते.

त्याचे यंत्र आवाज न करता का काम करत होते ते पालेयच्या आता लक्षात आले. आता पालेयसुद्धा आपले यंत्र त्याच पद्धतीने चालवील. सगळ्या यांत्रिक क्रिया अशा जुळवून घ्यायच्या की त्या भागांना उगीचच आवाज करायला सवडच मिळू नये. त्याच्या यंत्राचाही आवाज कमी झाला पण प्रोखोरोव कमी धुराळा उडवत काम कसे करतो आहे हे लक्षात न आल्याने तो गोंधळून गेला. तो चिडला. तो प्रश्न एखाद्या कोड्यासारखा सतावत होता त्याला. विशेष म्हणजे धुराळा कमी उडवत काम करायला लागल्यापासून प्रोखोरोवचे माती उचलण्याचे प्रमाण वाढले होते आणि पालेय त्याच्यापेक्षा मागे पडायला लागला होता.

काहीही करून त्याचे मूळ शोधून काढायलाच हवे होते. प्रोखोरोवने काहीतरी नवे तंत्र शोधून काढले होते हे उघडच होते. पण आपला शोध तो गुप्त राखत होता.

"सभेत क्लावा प्रोखोरोववर घसरली ते तिचं बरोबरच होतं. कामात आपल्या

वेगळ्याच मार्गानं जात राहातो हा माणूस! आपला अनुभव आपल्या सगळ्या कॉम्रेडना, सबंध तुकडीला सांगायची इच्छा नसते त्याला. फार झालं हे! अगदी बरोबर नाही हे!" रागाने पालेयच्या मनात विचार आला.

रागाच्या भरात पालेय इतकी धूळ उडवत होता की त्यामुळे त्याची मुलगी जेन्या यंत्राजवळ आलेलीही त्याला दिसली नाही. जेन्याला नुकतेच पंधरावे वर्ष लागले होते. नुकतीच ती आठवीत गेली होती.

पालेय स्टेपमध्ये काम करत असल्यामुळे प्रकल्पाच्या झिमल्यानोयच्या विभागातली जी जी मनोरंजक गोष्ट होती ती तिला पाहायला मिळाली. ही शांत, तेजस्वी डोळ्यांची मुलगी सगळीकडे दिसायची. कालव्याच्या बांधकामावरचे कामगार म्हणायचे "आपलं काम पाहायला येणाऱ्या असंख्य पाहुण्यांसाठी गाईडचं काम दिलं पाहिजे जेन्याला."

जेन्या दररोज वडिलांकडे पळत यायची. पसरलेल्या मातीच्या ढिगाऱ्यांमधून कशी सावधगिरीने वाट काढत येतेय हे पाहून पालेयच्या चेहेऱ्यावर स्मित उमटायचे.

"किती वाळकुडी आहे ही माझी पोर! कितीही खाऊ घाला. काही उपयोग नाही. वयामुळेच असावी तशी," पालेयला वाटले.

नेहमीप्रमाणे आजही जेन्या आली. पिशवीतून तिने जेवण आणले होते. वडिलांचे जेवण होईपर्यंत तिथे जमिनीवर खाली मान घालून ती त्यांच्या शेजारी बसली होती. विचारात गढून गेली होती ती. डोक्यावरच्या रुमालातून बाहेर आलेल्या तिच्या चमकदार बटेवर सूर्यकिरण खेळत होते. ती नाजूक बट वाऱ्याने हलकेच डुलत होती, पालेय अस्वस्थ झाला.

"अशी का तू, जेन्का?" पालेयने विचारले.

"काही नाही." उदास आवाजात जेन्या उत्तरली आणि तिने तोंड बाजूला वळवले.

पालेयने तिच्या खांद्यावर हात ठेवला. तिचे तोंड दिसावे म्हणून तिला आपल्याकडे वळवायची होती त्याला. पण ती आणखीनच जोराने बाजूला सरकली. तिने आणखीच मान खाली घातली. एकदम तिच्या मांडीवर डोळ्यातले पाणी पडताना त्याने पाहिले.

"ए पोरी, काय झालं ग? घाबरून पालेयने विचारले. त्याचे हात थरथरू लागले.

"बाबा!" आपले मोठेमोठे, अश्रूंनी भरलेले डोळे वर उचलून पालेयकडे पाहात ती विनवणीच्या सुरात म्हणाली, "बाबा, तुला सोडून जायचं नाही मला. इथं इतकी गंमत आहे! मला तुझ्याचजवळ राहायचंय."

"अजून एक सबंध महिना आहे परत जायला." शांतपणाने पालेय म्हणाला. मुलीच्या ताटातुटीचा विचारच न करायचा प्रयत्न करत असे तो!

जेन्याने आपल्या हाडकुळ्या सावळ्या हातांनी त्याला घट्ट मिठी मारली. ती थरथर कापत होती.

" मोठंच संकट आहे ! " तो पुटपुटला " इथं दहा यत्तांची तरी शाळा असायला हवी होती या वस्तीत. म्हणजे तुला इथे ठेवता आलं असतं. पण इथं तर फक्त ७ यत्तांच्या शाळेपुरतीच इमारत बांधून झालीय. "

" माहीत आहे मला ते, " जेन्याने उत्तर दिले आणि आवंढा गिळला.

पालेय स्वतःला आवरू शकला नाही. त्याने खिशातले फडके काढले आणि यंत्र पुसण्याचा बहाणा करत स्वतःचे ओले डोळे पुसले.

प्रोखोरोव आपल्या यंत्राच्या केबिन मधून कपाळाला आठ्या घालून पालेय व जेन्याकडे पहात होता.



प्रकल्पावर " कामाला उधाण " आलं होतं. पहिल्या काही दिवसांत हे शब्द वर्तमानपत्रात वरचेवर झळकायचे. त्यानंतर हिवाळा, उन्हाळा, पावसाळा, कोणताही ऋतु असो दरदिवशी हेच वर्णन वर्तमानपत्रात सतत वाचायला मिळू लागले.

पण १९५१ च्या वसंत ऋतूत हे शब्द बदलून त्याची जागा नव्या शब्दांनी घेतली. वर्तमानपत्रे लिहू लागली " आता कामाला आणखीच भरती आली आहे, " प्रत्यक्षातही माती काढण्याचे आणि कॉंक्रिटचे काम शेवटच्या टप्प्यावर येऊन पोचले होते.

धरणाच्या भिंतींनी ठरलेली उंची गाठली होती. कालव्याला आता दगडी चुली-सारखा आकार आला होता. कॉंक्रिटचे दरवाजे, पंपिंग स्टेशनं, पाण्याचा सांडवा, डेंजर गेट्सचा पाया, पुराचे पाणी सोडण्याची दारे, पूल, बोटींचे धक्के, इतर वास्तू हे सगळे बांधून जवळ जवळ पूर्ण होत आले होते. वस्त्या बांधून पुऱ्या झाल्या होत्या.

बांधकामाने शेवटचा टप्पा गाठला होता. तिथल्या यंत्रांच्या जुळणीला आरंभ झाला होता. देशाच्या सगळ्या टोकांकडून जुळणी करणारे तंत्रज्ञ इथे एकवटले होते.

टेलिफोनवरून चाललेली अखंड संभाषणे, झोपेविना रात्री आणि काळजी यामुळे झिमल्यानोयचा आवाज पार बसून गेला होता. आपल्या कामाच्या खोलीतला दिवा लावणे आणि मालवणे हाच त्याच्या लेखी दिवस आणि रात्र यातला फरक उरला होता. या दोन नगण्य क्रियांच्यामध्ये फक्त काही मिनिटांचाच काळ गेला आहे असे त्याला वाटायचे, तेव्हा प्रत्यक्षात अनेक तास उलटलेले असायचे.

कार्पोवला मनातल्या मनात झिमल्यानोय यांची फार काळजी वाटायची. हा प्रकल्पाचा प्रमुख आजारी तर पडणार नाही ना ? झिमल्यानोय यांच्या लक्षात येणार नाही अशा तऱ्हेने ते सतत त्यांना मदत करायचा प्रयत्न करायचे.

अशाच एका कामाच्या गर्दीच्या दिवशी, रात्रीच्या सुमाराला प्रोखोरोव कार्पोव यांच्याकडे आला.

किडकिडीत अंगलटीचा, बाह्या वर दुमडलेला शर्ट अंगात असलेला कार्पोव आपल्या

टेबलाजवळ बसून टेलिफोनवरून पंपिंग स्टेशनवर कोणाशीतरी बोलत होते. त्यांनी डोळ्यानेच प्रोखोरोवला खुर्चीवर बसण्याची खूण केली. पण तो उभाच राहिला.

“ ठीक आहे, मी लगेच येतो तुमच्याकडे. ” ते टेलिफोनवरून म्हणाले.

ते उठले. प्रोखोरोवरचे मनगट धरून त्याच्यासह दाराकडे गेले.

“ तुम्हाला वेळ असला तर चला माझ्याबरोबर पंपिंग स्टेशनवर. आता गाडी येईल. बोलायला निवांतपणा गाडीतच मिळेल. तिथेच आपण बोलू. तिथे कुणी आपल्याला त्रास द्यायला येणार नाही. ” कार्पोव म्हणाले.

पण ती आशा फोल ठरली. ते जात असताना गाडी दहा वेळा थांबवण्यात आली. प्रत्येक वेळी कार्पोव बाहेर येत होते, शांतपणे समजावून सांगत होते, सगळे सुरळीत करून देत होते. गाडीच्या उजेडात चिठ्या लिहून देत होते. एकादेवेळी रागावत होते, एखादे वेळी विनोद करत होते. त्यामुळे प्रोखोरोवबरोबरचे त्यांचे बोलणे सारखे तुटक तुटकच चालले होते.

“ मग काय ? त्या तरुण पायोनियर क्लावा गुसेवाचं म्हणणं थोडसं बरोबर होतं की नाही ? तुम्हाला काय वाटतं ? ” कार्पोवनी विचारले.

“ कळलं नाही मला काही. कोणत्या बाबतीत ? ” प्रोखोरोव म्हणाला.

“ लोकांपासून स्वतःला दूर दूर ठेवता तुम्ही कॉम्रेड प्रोखोरोव. ”

“ माझा स्वभावच तसा आहे. ”

“ एकलकोंडा ? ” कार्पोवनी विचारले.

“ त्याच्यासाठी नाही मी तुमच्याकडे आलो कॉम्रेड कार्पोव ! माझ्याबद्दलचं बोलणं ही अगदीच क्षुल्लक बाब आहे. ” प्रोखोरोव जरा घुश्श्यातच बोलला.

“ क्षुल्लक गोष्टी क्षुल्लक कामात असू शकतात. पण मोठ्या कामात क्षुल्लक गोष्टी असू शकत नाहीत. कालव्याच्या कामावरच्या प्रत्येक कामगाराची भोवतालची परिस्थिती आणि चांगली मनःस्थिती ही फार मोठी गोष्ट आहे कॉम्रेड प्रोखोरोव. ”

“ एका कामगाराच्या अशा परिस्थितीबद्दलच बोलायसाठी मी तुमच्याकडे आलो. ”

“ कोणत्या कामगाराबद्दल ? ”

“ माती खणणाऱ्या यंत्राचा ड्रायव्हर पालेयबद्दल. ”

“ काय झालंय त्याला ? ”

“ कामात फार मागे पडायला लागलाय. यात लक्ष घालणं हे अर्थातच तुमचं काम नाही ! मोठी मोठी कामं चालू आहेत. यंत्रांची जुळणी चालू आहे. अशावेळी तुमच्याकडे कालव्याच्या कामावर माती खणणाऱ्या यंत्रांचे शेकडो ड्रायव्हर असताना एकातच गुंतून पडता येणार नाही. ” प्रोखोरोव बोलला.

“ बरं, बरं ! ” कार्पोवनी पटकन उत्तर दिले. “ हे तत्त्वज्ञान आपण जरा बाजूला ठेऊ या. काय अडचण आहे पालेयच्या बाबतीत ? ”

" कसं सांगावं तुम्हाला ? " अडखळत प्रोखोरोव म्हणाला. " कदाचित या बाबतीत त्याला मदत करणं कठीण असेल. पालेय चांगला माणूस आहे. पण अति भावना-प्रधान ! त्यामुळेच त्याचं काम मागे पडतंय. गुसेवानं माझ्या भावनाशून्यतेवर टीका केली. आणि तुम्ही म्हणता एकलकोंडा ! पण होतंय असं, की माझी भावनाशून्यताच मला माझ्या कामात उपयोगी पडतेय. '

" बरं, ते आपण नंतर पाहू ! पण पालेयचं काय ? "

प्रोखोरोवला त्याबद्दल जेजे माहीत होते ते सगळे त्याने कार्पोवना सांगितले. जेन्याचे बापाबरोबर कामाच्या जागी जे बोलणे झाले ते सांगितले आणि विचारले, " याबाबतीत काहीच का नाही करता येणार, कॉम्रेड कार्पोव ? "

" हे खरंच क्षुल्लक आहे ! " कार्पोव हसले. " तुम्हाला तर माहीतच आहे की कामाचा काळ कमी केलाय. "

" असेल ! "

" म्हणून दहा यत्तांची शाळा सुरू करण्याचा प्रश्न दुय्यम दर्जाच्या प्रश्नात घेतला आहे. आणि कमी केलेल्या काळाच्या संदर्भात अशी शाळा पुढच्या सप्टेंबरला सुरू होईल. तुमचा पालेय काही एकटाच नाही. ज्यांची मुलं वरच्या वर्गात शिकताहेत असे पुष्कळ लोक आहेत आमच्याकडे. मग कोणत्या कारणानं ओरड चालली आहे ? "

" हं, समजलं ! " प्रोखोरोव बोलला आणि घोगऱ्या आवाजात मोठ्याने हसला. त्याच्या अनपेक्षित हसण्याने कार्पोव दचकून मागे सरले आणि गाडीच्या दारावर आदळले. प्रोखोरोवचे हसणे ते पहिल्यांदाच ऐकत होते.

" आणखी एक काम आहे माझं " कुत्सितपणे प्रोखोरोव म्हणाला.

" कोणतं काम ? " कार्पोवनी विचारले.

" वैयक्तिक. "

" काय उगीच काहीतरीच काढताय कॉम्रेड प्रोखोरोव ! तुमच्यासारख्या एकलकोंड्या माणसाला कसलं आलं आहे वैयँक्तिक काम ? " कार्पोव म्हणाले.

" काहीतरीच नाही काढत. " प्रोखोरोवने आपली नापसंती व्यक्त केली. " माझी माती फार उडत नाही त्याचं मर्म यात आहे. "

" काय आहे ? "

" साधं गुपीत आहे. "

" तरी पण ? "

" असं आहे, जेव्हा आपली यंत्रं बादल्या वर उचलतात तेव्हा ती त्या फारच उंच उचलतात. आणि मग दांडा फिरवतात. "

" त्याच्याबद्दल तुम्ही बोलताय होय ? काही तरी विशेष दिसतंय् ! बरं, बरं. पुढे सांगा. " कार्पोवनी उत्सुकतेने विचारले.

" त्यात जरूरीपेक्षा जास्त वेळ जातो. मी करून पाहिलंय्. मी बादली अगदी थोडी उचलतो. त्यामुळे जवळ जवळ तीन सेकंद वाचतात. उंचावरून माती ओतल्यामुळे धुराळा उडतो त्यापेक्षा कमी धूळ उडते असं केल्यामुळे " प्रोखोरोव म्हणाला.

" झकास ! " कार्पोव म्हणाले, " मी उद्या तुमच्याकडे येतो. पाहातो कसं काय होतं ते. आणि नंतर ही पद्धत इतर ड्रायव्हरांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न करू. आभारी आहे तुमचा. पालेयबद्दल जे सांगितलंत त्याबद्दल आणि धूळ न उडवता यंत्रावर काम करता त्याबद्दल. मला वाटतं इथून तुम्हाला घर जास्त जवळ पडेल. सुरेन, गाडी थांबव. "

गाडी थांबवली. प्रोखोरोव उतरला आणि चाचरत म्हणाला, " माझ्याशी आत्ता काही काम नाही ना कॉम्रेड कार्पोव ? "

" आत्ता तरी नाही. आभारी आहे. उद्या भेटूच " कार्पोव बोलले.

गाडी गेली. तिच्यापुढे प्रकाशाचा ओघळ वाहात चालला होता. त्या प्रकाशाच्या झोतात रस्त्याच्या कडेच्या झुडुपांच्या जाळ्या करड्या रंगाच्या तेजस्वी फुलांनी झाकल्याप्रमाणे दिसत होत्या. कधी प्रकाश झोतात येत होत्या कधी अंधारात बुडत होत्या.

अंधारात दिसायला लागेपर्यंत प्रोखोरोव थोडा वेळ उभा राहिला आणि नंतर घराच्या दिशेने चालू लागला.

प्रोखोरोवबरोबरच्या संभाषणानंतर लगेचच कार्पोवनी पालेयला आपल्याकडे बोलावून घेतले.

पालेयचा चेहेरा अगदी उतरलेला होता. कार्पोवनी त्याला आपल्या खोलीत बोलावलं आणि कागदपत्रे पाहून सह्या करीपर्यंत त्याला थोडे थांबायला सांगितले.

पालेय कोचावर बसला.

कार्पोवनी सेक्रेटरीला बोलावले. ती अंगाने किरकोळ असून तिने लहान लहान दोन वेण्या घातल्या होत्या. तिचे नाव लांबलचक होते " कापितोलिना कोंस्तंतिएवना !" वस्तीमध्ये ७ यत्ताऐवजी १० यत्तांची शाळा या १ सप्टेंबरपासून सुरू होत आहे आणि पालकांनी आपल्या मुलाना या शाळेत घालण्यासाठी आत्ताच अर्ज दिले पाहिजेत असे सगळ्यांना रेडिओवरून जाहीर करायला तिला सांगितले.

सेक्रेटरी निघून गेल्यावर कार्पोवनी माती काढण्याच्या कामाचा रिपोर्ट शोधून काढला आणि नजर वर करून पालेयकडे पाहिले.

" कॉम्रेड झिमल्यानोयांनी तुमच्याशी बोलायचं काम माझ्यावर सोपवलं आहे. त्यांना आणि मला काही बोलक्या आकड्यांचा परिचय करून घेणं भाग आहे. "

कार्पोवनी लाल पेन्सिलीने पालेयच्या कामाच्या आकड्यांपुढे प्रश्नचिन्ह केले आणि तो रिपोर्ट पालेयकडे सरकावला.

" आपण सगळेच कामगार आहोत. आपण सगळे मित्र, पक्षाचे कार्यकर्ते, नव्या जगाचे शिल्पकार, जुने सैनिक आहोत. म्हणतात ना, त्याप्रमाणे आपल्याला घोडयावरून खाली पाडायला तसंच महत्त्वाचं कारण घडायला हवं. तुमच्याबाबतीत काय घडलंय त्याबद्दल स्पष्टच बोलू या आणि अर्थातच त्यातून मार्ग काढू या. " थोडा विचार करून कार्पोव बोलले होते.

पालेयच्या कपाळावर घाम डवरला होता. घाबरून त्याने कार्पोवकडे पाहिले, पण रिपोर्ट घेतला नाही.

" मूर्खपणा झाला माझा अज्ञानामुळे " तो बोलला आणि त्याचा चेहरा आरक्त झाला. " पण आता सगळं ठीक होईल कॉम्रेड कार्पोव! हे आकडे मी पुसून टाकीन माझ्या कामाने. खात्री बाळगा त्याबद्दल. "

" तुमचं अज्ञान हा माझा गुन्हा आहे. " कार्पोवनी उत्तर दिले. " म्हणून मोठ्या मनाने क्षमा करा मला कॉम्रेड पालेय! "

पालेय मोठमोठ्यांदा हसू लागला. त्याने जोरात हस्तांदोलन केले आणि घाईघाईने तो खोलीबाहेर पडला. कार्पोव आरामखुर्चीच्या पाटीवर रेलले आणि त्यांनी सिगरेट पेटवली.

" भलताच चाणाक्ष निघाला हा पालेय. नक्कीच शाळेकडे पळाला असेल प्रवेशासाठी अर्ज द्यायला. " ते उद्गारले.

# ११

" अजून मुक्या असलेल्या या समुद्राला लोक नाव काय देतील ? कृपा करून मला सांगशील का ? " प्योत्र सोफ्रोनोविचनी इग्नातीय मुसियेविचला विचारले.

" कुणाला माहीत ! " इग्नातीय मुसियेविचनी अधांतरी उत्तर दिले " शोधून काढतील काहीतरी नाव. नावाच्या बाबतीत आपले लोक मोठे तल्लख आहेत. "

" असंच काही नाही ", प्योत्र सोफ्रोनोविचनं आपली नापसंती दर्शविली. "एकादे-वेळी अगदीच रटाळ नावसुद्धा देतील. एवढ्या मोठ्या समुद्राला नाव शोधायचं म्हणजे तशीच फार मोठी कल्पना शक्ती हवी इग्नातीय मुसियेविच-बडा समुद्र आहे तो ! एखादा साधा रस्ता किंवा खेडं नव्हे. "

लीखा–लेनिनग्राड मार्गावरच्या रेल्वेच्या एका डब्यात हे संभाषण चालले होते.

सोनेरी बटनांवर बोटीच्या नांगराची खूण असलेले जाकीट घातलेला नाविक शाळेतला वरच्या बर्थवरचा विद्यार्थी डोके वर करून खालच्या या म्हाताऱ्याकडे पाहात होता. हे विक्षिप्त म्हातारे कुठले आणि कुठे चालले आहेत हे त्याला मुळीच कळेना.

त्यांनाच त्याबद्दल विचारण्यात काही अर्थ नव्हता. आतापर्यंत त्यांनी सगळ्या प्रश्नांना कोड्यात बोलल्यासारखी विनोदी उत्तरे दिली होती. एखाद्या गुप्त कटवाल्यां-सारखेच वागत होते ते.

ते वोल्गा–डॉन कालव्याच्या बांधकामावर निघाले आहेत हे काही खाणाखुणांवरून कळत होते. पण त्यांचे काय काम तिथे ? गोष्टी सांगायला ? की तरुणांवर बारीक नजर ठेवायला ? कदाचित आपल्या मुलांकडे अगर:मुलींच्या सासरी पाहुणे म्हणून जात

असतील. पण त्यात दडवण्यासारखे काय आहे ?

हे कोडे सोडवण्यात डोकेफोड करायचा लेन्याला कंटाळा आला. हे म्हातारे जसे लबाडीने वागताहेत तसेच आपणही वागायचे.

" क्रिवाया मूझ्गा स्टेशनवर आपला डबा काढतील आणि कलाचला जाणाऱ्या गाडीला जोडतील. " बेफिकिरीने तो म्हणाला. " आजोबा, तुम्हाला जर पुढे स्टालिनग्राडला जायचे असेल तर तयार राहा. क्रिवाया मूझ्गामध्ये तुम्हाला गाडी बदलावी लागेल.

" अगदी बरोबर ! " इग्नातीय मुसियेविच म्हणाले.

" काय बरोबर ? "

" डबा सोडणार हे ! काय काय करायचं ते रेल्वेच्या अधिकाऱ्यांना चांगलं माहीत असतं. तशा सूचना असतात त्यांना ! "

याचा अर्थ तुम्ही पण कलाचला जाणार आहात तर ! " लेन्याने खेळीमेळीच्या सुरात विचारले.

" मग काय झालं त्यात ? कलाचमध्ये काय किंवा कलाचच्याही पुढे काय, कुठेही राहाणं चांगलंच आहे. " प्योत्र सोफ्रोनोविच उद्गारले.

" किती विनोदी आहात आजोबा तुम्ही ! " त्यांना थोडे चढवून पाहावे म्हणून लेन्या म्हणाला. " तुम्ही तुमच्या मुलांकडे चालला आहात हे लगेचच समजतंय.

" आमची बाळं—यांत्रिक जाळं ! " इग्नातीय मुसियेविचने उत्तर दिले. कोळ्याची जाळी म्हणजेच आमची मुलं आहेत. "

" एक अगदी जुनं शिपायांचं गाणं होतं. मी स्वतः ते म्हणत असे झारच्या सैन्यात असताना.

" सैनिकांनो, शूर पुत्रांनो,
कुठे तुमच्या भगिनी ?
आमच्या भगिनी ?
धारदार तलवारी संगिनी,
याच आमच्या आहेत भगिनी ! "

प्योत्र सोफ्रोनोविचने पुष्टी दिली.

" कळलं मला आता ! कोळयांचं काम दिसतंय तुमचं " थोडा विचार करून लेन्याने आपला अंदाज व्यक्त केला. " उघडच दिसतंय ते ! "

"आमचं काम उघडंच आहे आणि लोकांच्या कामाशी मिळतंजुळतंही आहे. आम्ही तिथं जाऊ, सल्ला देऊ, परत येऊ. " गाणं गायल्यासारखं इग्नातीय मुसियेविचनी उत्तर दिले.

"तुम्ही त्या त्येमरूकामधले तर नाही?" लेन्याने तर्क केला. (रशियन भाषेत रूका = हात)

त्या "त्येमरूका" पर्यंत आमचे हात पोचले नाहीत अजून" इग्नातीय मुसियेविचनी उत्तर दिले.

"याचा अर्थ तुम्ही कोणत्याही जातीचे नाही, कुठल्याही जमातीचे नाही."

"छे छे! आम्हाला जात जमात आहे ना! आमची जात कामगार आणि जमात काम करण्याची जबरदस्त इच्छा असणाऱ्यांची!" पुन्हा तसलेच कोड्यातले उत्तर इग्नातीय मुसियेविचनी दिले. या उत्तराने लेन्या बोब्रोव पुरताच अस्वस्थ झाला.

जशा काही माझ्या स्वतःच्या काळज्या कमी आहेत म्हणून मी या म्हाताऱ्यांशी असा लपंडाव खेळत राहिलोय असे लेन्याच्या मनात आले.

खरं म्हणजे तो वोल्गा-डॉन प्रकल्पाच्या जगातल्या अद्ययावत अशा सक्शन ड्रेजवर कामाचा अनुभव मिळवण्यासाठी जात होता. शाळेतले शिक्षण संपल्या संपल्याच लगेचच तिथे कामाला लागल्यावर कामात आपण थोडेसुद्धा कसे कमी पडणार नाही याचा सर्वात आधी विचार करायचा होता त्याला! या म्हताऱ्यांशी गट्टी जमवण्याचा नाही. त्यांच्याशी काय करायचं होतं त्याला!

या त्याच्या विचारात थोडी अपमानित झाल्याची भावना होती. एवढ्या मोठ्या जबाबदारीच्या आणि गाजावाजा असलेल्या मोठ्या कामावर जाणाऱ्या माझ्यासारख्या तरुण नाविक शाळेच्या विद्यार्थ्यांचा डब्यातल्या सगळ्या लोकांनी हेवा जरी नाही, तरी निदान आदर आणि कौतुक तरी दाखवायला हवे होते असे त्याला वाटत होतं.

ती त्याची भावना खरीही होती. लेन्याने आपल्या नेमणुकीबद्दल कोणत्याही सह-प्रवाशाला सांगितले रे सांगितले की ते सारे आश्चर्यमिश्रित आनंदाने म्हणायचे "बघा, एवढासा मुलगा पण त्याला एवढ्या मोठ्या प्रकल्पावर काम करायला मिळतंय! त्यातसुद्धा पुन्हा सक्शन ड्रेजवर! नशिबवान आहे बेटा!"

उत्तमातली उत्तम माणसंच या प्रकल्पावर कशी पाठवली जातात याची प्रवाशांत चर्चा सुरू होती. लेन्याला ती आवडली. पण ते दोन चिवट म्हातारे काही त्यात भाग घेत नव्हते. लेन्या बोब्रोवला सक्शन ड्रेजवर मिळालेल्या नेमणुकीचा या दोन म्हाताऱ्यांवर काहीच परिणाम झाला नव्हता. तरीही त्याने सक्शन ड्रेजासारखे एक शक्तिमान यंत्र काही हजार माणसांचे काम कसे करू शकेल याचे वर्णन त्या म्हाताऱ्यांना ऐकवले. पण म्हाताऱ्यांचा बहुधा त्याच्या या वर्णनावर विश्वास बसला नसावा. आपसात बोलताना ते लेन्याचा उल्लेख "पोरगं" असा करत होते, हे सुद्धा काहीसे अपमानास्पदच होते.

म्हणूनच क्रिवाया मूझ्गा स्टेशनवर म्हातारे डब्यातून उतरल्यावर बुजून जाऊन पाण्याच्या खजिन्यावर कसं जायचं म्हणून दिसेल त्याला विचारत सुटले तेव्हा लेन्याला

असुरी समाधानच वाटले.

शेवटी मख्ख चेहेऱ्याच्या एका ड्रायव्हरने त्यांना बरोबर नेऊन एका ट्रकमध्ये घातले आणि धूळ उडवत स्टेशनवरून वेगाने निघून गेला. लेन्या मात्र अजूनही स्तंभित होऊन हे म्हातारे आहेत तरी कोण याचाच विचार करत राहिला.

*

ट्रकचे हादरे बसत होते तरीही ते दोन्ही म्हातारे काहीसे निवांत झाले. इतकेच नाही तर त्यांनी डब्यातल्या त्या गंमतीदार तरुणाची टिंगल करायला सुरूवात केली.

"काय पोरगा होता!" इग्नातीय मुसियेविच म्हणाला. "सगळं याला कळलं पाहिजे मग त्याच्याशी त्याचा संबंध असो किंवा नसो. आपण त्याला जाम सतावलं. आपली त्याला चांगलीच आठवण राहिली असेल नाही, प्योत्र सोफ्रोनोविच?"

"मला पण वाटतं त्याला आपली चांगलीच आठवण राहील" प्योत्र सोफ्रोनोविचनी प्रश्नाला उत्तर दिले, पण अधांतरीच, आत्ता त्यांना लेन्या बोब्रोवशी काही कर्तव्य नव्हते.

जसे जसे ते त्या भावी पाण्याच्या खजिन्याच्या जवळ येऊ लागले तसे ते म्हातारे अधिकाधिकज आश्चर्याने थक्क होऊ लागले. इथे सगळेच नवे आणि न कळणारे होते. एका बाजूला सुरेख डांबरी हमरस्ता आणि त्याच्याच बाजूला मातीच्या प्रचंड टेकड्या. बकेटांचा खडखडाट करणारी माती खणणारी यंत्रे आणि पांढऱ्या निळ्या गुलाबी घरांच्या शोभिवंत वस्त्या सगळ्यावर पसरलेला सिमेंटचा पांढुरका हलकासा थर, काळ्या लोखंडी किड्यांसारखी दिसणारी यंत्रे, त्यांना काय म्हणतात त्यांचे काम काय हे कुणा लेकाला माहीत आहे इथं! डोक्याला लाल रूमाल बांधलेल्या मुली त्या यंत्रांवर कामे करत होत्या. आपल्या दुबळ्या हातांनी या मुली कशी ती यंत्रे चालवत असतील?

कोरड्या जमिनीवर, पाण्याचा थेंबही नसलेल्या भल्या मोठ्या खड्यावरचा उंच उंच कॉंक्रिटच्या मत्स्यांवर उभा असलेला पूल प्योत्र सोफ्रोनोविचनी पाहिला. ट्रकच्या इंजिनातले काही तरी साफ करण्यासाठी थांबलेल्या ड्रायव्हरने जेव्हा त्यांना सांगितले की हा पूल होणाऱ्या कालव्यावरचा--नव्या नदीवरचा आहे, तेव्हा प्योत्र सोफ्रोनोविच पुरतेच गोंधळून गेले. ते ट्रकच्या मागच्या भागातून खाली उतरले. त्यांनी नव्या पुलाच्या खांबाजवळ उगवलेल्या एका काटेरी झुडुपाला हात लावून पाहिला आणि विश्वास न बसून ड्रायव्हला विचारले,

"खरंच का इथे पाणी येणार आहे?"

"मी सांगतोय ना? म्हणजे नक्कीच असणार ते!" ड्रायव्हरने थोड्या आढ्यतेने उत्तर दिले.

प्योत्र सोफ्रोनोविचनी पुलावर एक नजर टाकली ते आश्चर्यचकित झाले. इग्नातीय मुसियेविचही चकित झाले होते.

त्याचवेळी ट्रकशेजारी जे. ई. एस. ११० या नंबरची लहान गाडी येऊन थांबली. मोटरचे दार उघडले आणि त्यातून सिमेंटच्या रंगाचा सूट आणि गमबूट घातलेला जाडजुड गृहस्थ खाली उतरला. त्याचा सूट चॉकलेटी रंगाचा आहे हे निरखून पाहिले असता लक्षात आले असते. पण त्यावर इतका धुराळा उडाला होता की तो सिमेंटच्या रंगाचा दिसत होता.

त्या जाडजूड गृहस्थाला पाहून ड्रायव्हरने इंजिनचे झाकण पाडले आणि तो अनैसर्गिक मोठ्या आवाजात म्हणाला,

" नमस्ते, कॉम्रेड बासार्गिन ! "

" नमस्ते ! " जाडजूड माणसाने प्रति अभिवादन केले आणि तो हसला. " तुम्ही कोणत्या विभागातले ? "

" कॉम्रेड झिमल्यानोयच्या विभागातला, " ड्रायव्हरने उत्तर दिले. तो ओशाळला त्याचा आवाजसुद्धा खाली आला.

" थांबलात का ? वेळ घालवू नका, इंजिन दुरूस्त करा. हे गृहस्थ कोण ? "

" दोघं आहेत... " घुश्श्यातच त्याने म्हाताऱ्यांकडे पाहिले. अगदी म्हातारे, इथलेही नाहीत...पाण्याच्या खजिन्याकडे जायला निघालेत, पण रस्ता माहीत नव्हता. म्हणून त्यांना तिथं सोडायचं ठरवलं. कॉ. बासार्गिन, आपल्याकडे म्हाताऱ्यांना सर्व ठिकाणी मान देतात, नाही का ? "

" मला दिसलंच, की तुम्ही खरोखरच कॉम्रेड झिमल्यानोयच्या विभागात काम करता त्यांनी तुम्हाला सगळ्यांना आपल्यासारखंच बोलायला शिकवलंय " बासार्गिन म्हणाले.

बासार्गिन, प्योत्र सोफ्रोनोविच आणि इग्नातिय मुसियेविचकडे वळले. तुमच्यापुढे फार मोठा अधिकारी उभा आहे असे डोळ्यांनी खाणाखुणा करून ड्रायव्हर त्यांना सांगण्याचा प्रयत्न करत होता. पण ड्रायव्हरच्या खुणांशिवायही म्हाताऱ्यांना त्याचा अंदाज आला होता.

" माणसांच्या हातांनी घडवलेल्या या वस्तूंचं—या पुलाचं आम्हाला फार कौतुक वाटलं कॉ. बासार्गिन ! हा पूल चांगला बांधलाय याचं नाही नवल वाटलं आम्हाला. पण कुरणात हा पूल बांधलाय आणि त्याच्याखाली तर पाण्याचा थेंबही नाही अजून याचं मोठं नवल वाटतंय. केवढी दूर दृष्टी ! "

" माणसाच्या दूर दृष्टीचं नवल वाटतंय. " इग्नातीय मुसियेविचने खुलासा केला.

" पाण्याच्या खजिन्यावर काय आहे ? काही काम निघालंय का ? " बासार्गिननी विचारले.

" निःसंशय ! एक लहानसं काम आहे तुमच्या या वाळवंटात. " इग्नातीय मुसियेविच अजिजीच्या सुरात म्हणाले. आणि त्यांनी आपण दोघे या वाळवंटात कशाला आलो

आहोत ते प्रमुखांना सांगितले.

बासार्गिनयांच्या थकलेल्या चेहेऱ्यावर स्मित उमटले. " माझ्या गाडीत बसा. मी तुम्हाला पाण्याच्या खजिन्यापर्यंत पोचवतो. त्या खटाऱ्यात कुठे धक्के खात जाता ! " बासार्गिन म्हणाले.

बासार्गिननी त्या ट्रककडे नजर टाकली आणि खोखो हसू लागले. ड्रायव्हरप्रमाणेच तो ट्रकही गोंधळून गेलेला अपराधी दिसत होता.

म्हाताऱ्यांनी एकमेकांकडे नेत्रसंकेत केला आणि स्वतःच्या वस्तू ट्रकमधून काढून घेऊन कण्हत कुथत, प्रशस्त गाडीकडे विस्मयाने पाहात ते जपूनच गाडीत जाऊन बसले. दारे बंद झाली. चाकाखाली धुळीचे फवारे उडवत वेगाने पाण्याच्या खजिन्याच्या दिशेने निघाली. तिच्याकडे दृष्टी टाकून ड्रायव्हर म्हणाला.

" खटारा काय ? जे. ई. एस. ११० चालवणं म्हणजे काही आकाशातला चंद्र हाती लागणं नाही. आम्हालासुद्धा चालवता येते म्हटलं जे. ई. एस. ११०, बडे साहेब ! "

म्हाताऱ्यांच्या भेटीने बासार्गिनना फार आनंद झाला. ती भेट म्हणजे त्यांच्या दृष्टीने मोठाच विरंगुळा, " मोलाचा बदल " होता.

झोपेचे तीन चार तास सोडले तर शेकडो महत्त्वाची आणि बाजूस न टाकता येणारी कामे त्यांना डोक्यात ठेवावी लागत होती. थकून जाऊन काम करण्याचे मनाने नाकारू नये म्हणून त्यांना असले " बदल " किंवा शिकारीसंबंधी बोलणे किंवा एखादी कादंबरी किंवा या म्हाताऱ्यांशी झालेल्या भेटीसारखी एखादी अनपेक्षित भेट याची त्यांना नितांत गरज होती. अशा तऱ्हेच्या प्रत्येक बदलाने त्यांच्या मनाला विसावा मिळे.

आत्ता, गाडीत बसून या म्हाताऱ्यांबरोबर त्यांच्या गोष्टी ऐकताना त्यांना अझोव समुद्रावरचे वालुकामय भुशीर, घरांचे मातीचे उंच उंबरठे, जिकडे तिकडे जमिनीरव वाळत घातलेली बारीक जाळी दृष्टीसमोर दिसत होती. या काल्पनिक दृष्याने त्यांना इतका उत्साह आला की जणू ते खरोखरीच भूशीरावर गेले होते, एक दोन तास गार सावलीत सुळसुळीत गवतावर प्लेतेनखाली समुद्राचे संगीत ऐकत त्यांनी विश्रांती घेतली होती.

त्या म्हाताऱ्यांकडे पाहून त्यांना आपल्या वडिलांची आठवण झाली. बासर्गिन चेष्टेने म्हणायचे, " मी साधा माणूस नाही, तर बांधकामाची एक संस्थाच आहे. जुन्या आठवणी काढायलासुद्धा माझ्यापाशी वेळ नाही. "

पण असे असूनही त्यांना आपले उरलेले आयुष्य गोर्कीत कंठीत असलेल्या आपल्या धातुकामगार वडिलांची या दोघा म्हाताऱ्यांप्रमाणेच स्वस्थ न बसणाऱ्या आपल्या हाताऱ्याची वरचेवर आठवण येई. गावाच्या वेशीवरच्या आपल्या घराच्या परसात लिंबाची जोपासना करत ते शांतपणे आयुष्य कंठत होते.

" नवलाची गोष्ट आहे. माणसाला काही स्वस्थ बसवत नाही. नेहमी काहीतरी

नवीन गोष्टीत स्वतःला गुंतवून घ्यायला हवं असतं त्याला" त्यांच्या मनात विचार आला.

आपले वडीलही या म्हाताऱ्यांसारखेच उदार मनाचे आणि बारीक लक्ष असलेले आहेत. नजीकच्या भविष्याची चाहूल देणारी गोष्ट त्यांच्या लगेच लक्षात आली. अजून पाणी नसलेल्या नदीवरचा तो पूल पाहून त्यांच्या लगेच लक्षात आलं भविष्याचं चित्र! आणि किती आनंदले ते म्हातारे तो पूल पाहून!

ज्या कामासाठी ते इथे आले आहेत ते कामही भविष्याशी निगडीत असंच आहे. या आमच्या अवाढव्य प्रकल्पाच्या बांधकामाच्या मानाने त्यांचे ते काम लहानसेच असेल, पण तरीही ते चांगले आणि जरूरीचे आहे. त्यांना या कामात मदत करायलाच हवी.

बासार्गिननी आपल्या सहप्रवाशांना सिदेरेकोच्या घराजवळ उतरवले, त्यांचा निरोप घेतला आणि गाडी कालव्याच्या बाजूने वोल्गाच्या दिशेने भरधाव सोडली.

बासार्गिन सिगरेट ओढत होते आणि स्वतःशी हसत होते. त्यांच्या दृष्टीने हे दोन म्हातारे म्हणजे प्रकल्पाच्या पूर्ततेचे अग्रदूत होते! नवीन होणाऱ्या कार्पोव तलावाच्या किनाऱ्यावरील लोकांचे जीवन मांडून देण्यासाठी एखाद्या नातेवाइकाच्या आस्थेने ते इथे आले होते.

*

झिमल्यानोय आज भल्या पहाटेच आपल्या ऑफिसात आले. जमिनीचा आणि भिंतीवर टांगलेल्या कुंडीतल्या चेब्रेत्सचा ओलसर वास नाकात भरत होता. झिमल्यानोय टेबलाशी बसले. कागदपत्रे, तक्ते, नकाशे यांच्या बाजूला एक पुस्तकांचा ढीग होता. झिमल्यानोयनी एका जाडजूड मासिकाचा ताजा अंक घेतला आणि त्याची पाने उलटायला सुरूवात केली. गेल्या काही दिवसात त्यांना वाचनाला वेळच उरत नव्हता.

त्यांनी मासिक उघडून धरले. पण वाचायला सुरूवात न करता विचारात गढून गेले.

प्रकल्पाच्या बांधकामावरच्या प्रत्येक कामाच्या दिवसातली प्रत्येक बारीक सारीक गोष्ट–कॉंक्रिटच्या शेवटच्या मिक्सिंगपर्यंत त्यांना माहीत असायची. प्रत्येक दिवस असाच अगदी अर्थपूर्ण असला पाहिजे असे त्यांच्या मनात आले.

झिमल्यानोयनी खिडकीतून बाहेर पाहिले. सकाळच्या धुक्यातून जांभळटसर रंगाचे ढग आकाशात झेपावत होते.

अविरतपणे चाललेल्या या कामात सतत मातीचे डोंगर, ट्रकमध्ये पडणारा कॉंक्रिटचा प्रवाह, लोखंडी सांगाडे, माती खणणारी यंत्रे हेच त्यांच्या दृष्टीत भरे. धरणाने बंदिस्त केलेल्या स्टेपमधल्या या खोलगट भागात उभे असताना एकदाही त्यांना अशी भावना झाली नाही की आपण एका भावी तलावाच्या तळावर उभे आहोत. क्वचित तसा विचार त्यांच्या मनात डोकावून जात असे, पण या विस्तीर्ण खळग्यात

ठरावीक खुणेपर्यंत पाणी भरेल तेव्हा सभोवतालची भूमी कशी दिसू लागेल याची स्पष्ट कल्पना मात्र त्यांच्या डोळ्यापुढे येत नव्हती.

त्यांच्या मातृभाषेत "खूण" याचा अर्थ गजबजलेल्या किनाऱ्यावर लाटांच्या रूपाने आदळणाऱ्या या खोल पाण्याची मर्यादा असा होता. इंजिनियरच्या नजरेतून ते या तलावाचा विचार करीत. या तलावाची खोली आणि विस्तार त्यांना माहीत होता. नंतर त्यात भरणाऱ्या पाण्याची खोली त्यांना माहीत होती. आत्ता ते त्याला "पूरक्षेत्र" म्हणत.

तलावाचा तळ पाण्याच्या आगमनासाठी तयार होता. या शुष्क चिकणमातीवर तातार्निकची फुले शेवटचीच फुलली होती. शेवटचे गवत लोंब्यांमधले बी निरर्थकपणे उधळत वाऱ्याने थरथरत होते. जिथून बोटी जाऊ शकतील एवढा मोठा कालवा जाणार होता तिथल्या टेकड्यांवरील बेरकुतीची झुडुपे समुद्रातल्या तरंगत्या खुणां-सारखी भासत होती.

पण झिमल्यानोयच्या ते बिलकूल लक्षात आले नाही. त्यांचे विचार अगदी वेगळ्या गोष्टीबद्दलच चालले होते. धरणाला जास्त बळकटी कशी आणायची आणि जास्त पाणी कसे काढून लावायचे याबद्दल ते विचार करत होते. ड्रेनेजगेट तपासून पाहायला हवे होते. दररोज नवीनवी कामे निर्माण होत होती. ती पुरी करण्यासाठी शोधक बुद्धीची, परस्परविरोधी प्रकारातले ज्ञान एकत्र आणण्याची जरूरी होती.

या कामात इंजिनियरिंग क्षेत्रातल्या पूर्वीच्या समजुती टाकून द्याव्या लागत होत्या. निसर्गाच्या पुनर्रचनेसाठी दूर दृष्टीची आवश्यकता होती. अतिसूक्ष्म सजीव पेशीच्या गुंतागुंतीच्या रचनेत, मग ती बर्चच्यापानातली पेशी असो की मानवी शरीरातली असो, जसे सहकार्याने काम करावे लागते, सारी हयात घालवावी लागते, तसेच या क्षेत्रातही करावे लागते.

टेलिफोनची घंटा किणकिणली. झिमल्यानोयनी रागारागाने फोन उचलला. "हो ना! फक्त अशा सकाळीच जरा उकाड्यापासून सुटका असते. मोठ्या माती खणणाऱ्या यंत्रात थोडी गडबड आहे. ॲंगल ऑफ व्हिजन थोडा कमी आहे आणि वळवण्याची यंत्रणा थोडी अडतेय. कारखान्याला त्याबद्दल आम्ही कळवलंय. प्रोखोरोवशी समझोता करायचा? जरूर जरूर! कोणते म्हातारे? हं, हं! कॉंक्रिटचा कामगार सिदेरेंकोकडे राह्यलेत ते ना? बघा ना! आणि मला मात्र त्याबद्दल काहीच माहिती नाही. हो, हो. बरोबर आहे. "मानव आपल्या असीम मातृभूमीवर राजासारखा वावरतो" तसंच माझं आहे. माझी सवयच आहे सारखं सगळीकडे फिरायची ती काही बदलणं शक्य नाही, कॉम्रेड बासर्गिन! ठीक आहे. त्या म्हाताऱ्यांची सगळी व्यवस्था अगदी नीट करू. मी त्यांना कार्पोवकडे सोपवतो म्हणजे सारं ठीक होईल. बराय!

झिमल्यानोयनी फोन बंद केला आणि कार्पोवना फोन केला. ते लगेच आले

उंबरठ्यावर पाय टाकताच त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या.

"फार सिगरेट ओढतोस." ते झिमल्यानोयना म्हणाले " सोव्हिएट युनियनचा सगळा आग्नेय पट्टा तुझ्या सिगरेटच्या धुराने दूषित होऊन गेलाय. काय नवी खबरबात ?

" बासार्गिननी फोन केला होता. प्रोखोरोवशी समेट करा म्हणताहेत ! "

" हं ! " कार्पोव उत्तरले आणि स्वतःही सिगरेट ओढू लागले.

" तुझ्यासाठी एक लहानसं काम आहे "

" लहान सहान कामं आम्ही घेत नसतो " ते विनोदाने म्हणाले.

" तरीही हे काम तू घेशील. माहीत आहे मला काम साधं आहे. इथल्या सामुदायिक शेताशी संबंधित आहे. मच्छिमारी सोसायटी काढताहेत असं दिसतं. आणि आपल्याला काही पत्ताच नाही. "

" हं ! " कार्पोव म्हणाले.

" सारखं हं हं काय लावलं आहेस ? " झिमल्यानोय रागावले. " ऐकून घे काय आहे ते. "

झिमल्यानोयनी कार्पोवला आझोव समुद्रावरून आलेल्या दोन कोळ्यांबद्दल सांगितले.

कार्पोव खो खो हसत सुटला आणि झिमल्यानोयच्या खोलीत फेऱ्या मारू लागला.

" असं आहे तर ! छान छान ! " तो म्हणाला. " म्हणजे तुला समजलेलंच आहे तर, हे सगळे काय आहे ते ! आपल्या विभागात सगळ्यांना किती आनंद होईल, नाही ! आपल्या सगळ्या ड्रायव्हरना, कॉंक्रिटच्या कामगारांना, वेल्डर्सना सांग त्यांच्याबद्दल. त्यांचं मन भरून येईल. सगळे या आपल्या " कामाच्या धबडग्यात " सामील होताहेत ! म्हताऱ्यांची शाबास आहे ! प्रोखोरोववरही मी खूष आहे ! उत्तम कामगार आहे तो ! क्लावा उगीचच घसरली त्याच्यावर. "

" तिचं तरूण वय बरं त्याला कारण ! " झिमल्यानोय म्हणाले. " कीव करावीशी वाटली मला तिची.

स्तारोस्तिन इथून गेल्यावर दुसऱ्या दिवशी क्लावा आपल्याकडे स्वतःच्या तुकडी-संबंधी बोलायला कशी आली होती ते त्यांना आठवले. झिमल्यानोयनी तिला तुकडीची प्रमुख केली होती. बोलता बोलता स्तारोस्तिन निघून गेल्याचे तिला कळले तेव्हा एकदम रडवेली झाली अगदी आणि एकदम गप्पच झाली.

झिमल्यानोयनी तिच्याकडे पाहात एक उसासा टाकला.

" फार चांगली पोरगी आहे ! " स्वतःशीच बोलल्याप्रमाणे ते उद्गारले. आणि एकदम रागावून तिला म्हणाले, " हे काय हे ? तू तुझ्या यंग पायोनियरांच्या तुकडी-बद्दल बोललीस तर जास्त बरं होईल. "



आत्ता माती सारखी करणाऱ्या यंत्रावर काम करत असताना क्लावा विचार करत

होती, पुन्हा कधीतरी स्तारोस्तिन भेटेल का आपल्याला? की त्याची आणि आपली कधीच भेट होणार नाही! झालीच भेट, तर कुठे होण्याची शक्यता आहे? कदाचित एखाद्या नव्या प्रकल्पावर भेट होईल आपली!

त्यांची भावी भेट कुठे आणि कशी होईल ते अज्ञातच होते अजून. सिदेरेंकोंच्या घरात लहानग्या बंड्याच्या मृत्यूबद्दल म्हातारी सांगत असताना आपण एकत्र बसलो होतो याची त्याला कदाचित आठवणही राहाणार नाही. कालिनिनमधल्या या मुलीची त्याला आठवण करून दिली पाहिजे.

कलावाच्या मनात आले, "प्रेमाला प्रतिसाद मिळतोच म्हणे. पण ते म्हणणं अगदी मूर्खपणाचं आहे. अगदी हास्यास्पद आहे हे विधान. प्रतिसादाविनाही प्रेम करणं शक्य आहे. आपल्या मैत्रिणी म्हणतात त्याप्रमाणे प्रतिसादाविना प्रेमाने हृदय काही दुभंगून जात नाही." पण कलावाच्या हाती फक्त एकच गोष्ट होती. तिच्या कल्पनेतल्या एका उंच काळ्याभोर डोळयाच्या सुंदर मुलीबरोबर स्तारोस्तिन लेनिनग्राडमध्ये नेहमी हसतो आहे, बोलतो आहे आणि सफेद हातमोजे घातलेली ती मुलगी त्याच्याकडे पाहून हसते आहे असे चित्र कल्पनेने पाहाणे. कल्पनेतले ते दृश्य पाहून कलवाचे नेत्र असूयेने आंधळे झाले आणि तिने इंजिनचा दांडा बोटे दुखेपर्यंत घट्ट पकडला. चांगली अद्दल घडवली असती तिने त्या लेनिनग्राड मधल्या मुलीला!

# १२

त्सिमला विद्युत् केंद्राच्या बांधकामावरच्या कामगार कर्मचाऱ्यांच्या त्या गावाला "नवे सल्योनोवस्क" म्हणत. काही दिवसांपूर्वी डॉनच्या डाव्या तीरावर असलेल्या सल्योनोवूस्क खेड्याचे नावही कुणाला माहीत नव्हते.

नव्या सल्योनोवूस्क गावाच्या बागांच्यामधून, चिकट तेलकट धुळीने भरलेल्या रुंद रस्त्यांजवळून, रेल्वे मार्गाजवळून, दक्षिणी पद्धतीच्या शुभ्र घरांजवळून मोठे मोठे काळे नळ गेलेले होते. डॉनपासून धरणापर्यंत ते पोचलेले होते. तेच या गावाचे राजे होते. ते रस्त्यांच्या कडेकडेने, परसदारच्या बागांमधून जाऊन सार्वजनिक बागेत गुप्त झाले होते. अंगणांमधून गेले होते, फुटपाथच्या बाजूने विसावले होते. या थंडगार नळातून कसलं तरी मिश्रण खडखड आवाज करून जात असायचे. तो वाळू आणि पाण्याचा काला होता. दणकट सक्शन ड्रेज तो लगदा डॉनच्या पात्रातून खेचून घ्यायचे. धरणाची उंची वाढत होती.

नव्या सल्योनोस्कवूमधले हॉटेल माणसांनी गजबजून गेले होते. मी एका लहानशा सोयीस्कर खोलीत उतरलो होतो. तिथल्या खोल्या सफरीवरच्या लोकांसाठी राखून ठेवलेल्या होत्या. हॉटेल बागेच्या मध्यभागी होते. त्या बागेच्या मधूनही पाईप गेलेले होते.

संध्याकाळी बांधकामावरून परत येत असताना प्रत्येक वेळी मी बागेत थांबत असे आणि पाईपमधून येणारा वाळूमातीच्या लगद्याचा आवाज कान देऊन ऐकत असे. दिवसापेक्षा संध्याकाळी नळामधला आवाज जास्त स्पष्ट ऐकू येई.

बांधकामावरून येणारा यंत्रांचा अस्पष्ट पण कर्कश आवाज, माणसांच्या उत्तेजित

संभाषणांचे आवाज, त्यांचे हसणे खिदळणे " सकाळ उजाडताच झगमगू लागतील दिवसाची किरणे " हे स्येनस्कीयचे गीत गाणाऱ्या कझ्लोवूस्कीचा स्वर, बोटींचे भोंगे, अंधाऱ्या आकाशातील रात्रीच्या विमानांची घरघर, हे सारे मला सताड उघड्या खिडकीतून ऐकू येत होते. ते ऐकून माझ्या मनात विचार आला, या नव्या शहरात जीवन आपल्या तालबद्ध पदन्यासाने प्रवेश करते आहे. पुष्कळदा, आपल्या भोवती घडणाऱ्या अनेक चागल्या आणि महत्त्वाच्या गोष्टी माणसांच्या लक्षातच येईनाशा होतात. रात्रंदिवस सातत्याने इथून आपल्या उशापायथ्यापासून, पुस्तकांचे ढिगारे, नकाशे, आराखडे यांनी भरलेल्या टेबलापासून दोन पावलांवरून धरणाच्या उभारणीच्या कामातून निघालेला अदृश्य धागा, तो वाळूचा जबरदस्त प्रवाह वाहातो आहे हे त्यांच्या लक्षातच येत नसे.

आइस्क्रिमच्या गाडीभोवती मुले गोळा होतात तशी ती दुपारच्या कडक उन्हात या थंडगार पाईपभोवती गोळा होत.

मी इथे आल्याच्या दुसऱ्या दिवशी कमान्डन्टने दोन नवे रहिवासी आणले. एक इंजिनियर बाई आणि त्यांचा मुलगा. माझ्या खिडकीतून बाहेर पडलेल्या उजेडाच्या पट्ट्यातून ती चालत येत होती.

बाईंनी सगळे सामान लावले आणि त्या स्त्योपासह बागेतल्या नळावर खूप वेळ हातपाय धुवून स्वच्छ करत राहिल्या.

मुलगा प्रश्न विचारत होता ते मला ऐकू येत होते.

" आई ग, कसला आवाज येतोय ? डॉनचा का ? "

" नाही बांधकामाचा. मान चोळ चांगली. "

सकाळी मी बांधकामावर गेलो. बांधकामावर जाताना मी अजूनपर्यंत एकदाही गाडीने किंवा बसने गेलो नाही. पावलापावलाला बांधकामाचे स्वरूप बदलून नागरी जीवनाच्या खुणा या नव्या शहराच्या चित्रात कशा उमटत जात आहेत हे पाहात गावापासून बांधकामापर्यंत पायी जाणे मला अधिक मनोरंजक वाटायचे.

स्त्योपा प्रवेशद्वारापर्यंत माझ्याबरोबर आला. तिथे माझ्या ओळखीचा तो बोटीवरचा सहप्रवासी, ' बूट घालणारा मुलगा ' आधीच उभा होता. तिथून तो कुंपणापलीकडल्या तलावाच्या खळग्याकडे, मोठ्या रस्त्याकडे आधाशीपणाने पाहात होता.

स्त्योपा लगेच कुंपणापाशी आला आणि खिळल्यासारखा उभा राहिला. नेहमीपेक्षा अगदी वेगळे जग त्या कुंपणापलीकडे पसरले होते. गुदामे, ट्रान्स्फॉर्मिंग सेंटर्स, लाकडांच्या थप्प्या, लोखंडी चौकटी, इंजिने, सिग्नलचे दिवे, लाल निशाणे फडकवत उभे असलेले निरीक्षक मनोरे, घोषणांचे फलक आणि फरारे, यंत्रांचे भाग आणि या सगळ्यावर पसरलेला सिमेंटच्या धुळीचा हलकासा थर !

त्याच्याही पलीकडे कॉंक्रिटच्या धरणावर लाकडी सांगाडा दिसत होता. खोलातली

लाल रंगाची पंपिंग सेंटर्स, मातीचे डोंगर, माती उचलणाऱ्या यंत्रांची बकेटे, मोठ्या ढिगाऱ्यावरच्या कमांडिंग पोस्टवरचे निशाण हे सारे दिसत होते.

ट्रकची रांग चालली होती. ती तयार कॉंक्रिट लोखंडी पिंपामधून धरणावर आणत होती. रेल्वे रुळांच्या जाळ्यामधून इंजिने सहजपणे पण मोठा आवाज करत फिरत होती.

खळग्याच्या बाजूचे उतार नीडिल फिल्टरांमुळे पिनकुशनसारखे दिसत होते. ज्वालामुखीच्या मुखातून धूर निघावा त्याप्रमाणे खळग्यातून गरम पिवळसर धुळीचे लोट आकाशात जात होते.

नव्या सल्योनोवस्कच्या बागेमध्ये ऐकू येणाऱ्या आवाजाचे इथे जणू पृथक्करण होत होते. आणि वेगवेगळे आवाज कानांवर येत होते. इंजिने फुसफुसत, गुरगुरत होती. बफर्स गुणगुणत होती. बोटींचे भोंगे कर्कश ओरडत होते. वेल्डिंगच्या ठिणग्या तडतडत होत्या. पंपातले पाणी गात होते. कमांडिंग पोस्टमधून दणकट आवाजात लाऊड स्पीकर ट्रकच्या रांगांना हुकूम देत होता. माती खणणारी यंत्रे सरपटत होती. बकेटमध्ये कॉंक्रिट गरगरत होते. इलेक्ट्रिक व्हायब्रेटरचा तालबद्ध ठेका चालू होता. आणि पलीकडे मातीच्या धरणाच्या उतारावरच्या पाईपमधून जाणारे कॉंक्रिट खसखसत होते. विजेच्या खांबांमधून वारा शीळ घालत होता. बांधकामाच्या गदळाने गढूळ झालेल्या डॉनच्या लाटा नाचत होत्या.

खळग्याकडे जाताना माझे लक्ष त्या दोन मुलांकडे गेले. कुतूहलाने त्यांचे डोळे चमकत होते. मी जर चित्रकार असतो आणि मला या प्रकल्पाचे चित्र काढायचे असते तर त्या चित्रात मी प्रकल्पाबरोबरच त्या दोन मुलांचाही आवर्जून समावेश केला असता.

त्यांची चिमुकली मने उत्साहाने किती भारून गेली आहेत! या वैराण निर्जल प्रदेशात समुद्र निर्माण करण्याच्या कामापुढे ज्यूल व्हर्न आणि इतर सगळ्या अद्भुत कथा आणि परिकथा लिहिणाऱ्यांच्या कादंबऱ्यांचा काय पाड लागणार? अगदी बालवयातच जे असल्या अद्भुतरम्य विलक्षण घटनांचे साक्षीदार बनले आहेत त्या या मुलांचे भावी जीवन किती अर्थपूर्ण आणि कुतूहलपूर्ण असेल!

# १३

सामुदायिक शेताच्या मालकीच्या तीन नव्या मच्छिमार होडया एका टेकाडाशेजारी कुरणात उभ्या होत्या. त्यांच्याभोवती लाकडाचा भुसा पसरला होता. भुशाच्या जाड थराने गवत झाकून गेले होते.

आजचा इग्नातीय मुसियेविच आणि प्योत्र सोफ्रोनोविच यांनी शेवटची बोट घोडा बसवून तयार केली होती. तिला डांबर लावायला हवे होते. पण या वस्तीत डांबर तयार करणारा माणूसच सापडला नाही.

त्यासाठी झिमल्यानोयकडे मागणी घेऊन माणूस पाठवण्याबद्दल चर्चा झाली. सामुदायिक शेतावरचा वान्या सावुश्किन याला त्यासाठी पाचारण करण्यात आले. “कुठलंही काम तो चुटकीसरशी करतो. त्याला मुळी कोणत्याही कामाला उशीरच लागत नाही.” असे त्याच्याबद्दल लोक सांगत. वान्याच्या लेखी अडचण हा शब्दच नव्हता. त्याला कोणतीही गोष्ट करायला सांगा, टोपी मागे सारून काडीपेटी शोधण्यासाठी घाईघाईने खिशात हात खुपसत तो चटकन म्हणायचा, “हो हो. होईल की! एक दोन तीन म्हणायच्या आत काम खलास!”

वयोवृद्ध पारास्या सिदरेंकोच्या बरोबरच वान्या दोन्ही म्हाताऱ्यांना होडया तयार करायला मदत करत होता. मधूनमधून संथ संभाषण चाले.

“दोन दिवसांपूर्वी माझी मुलगी आणि नात काळया समुद्रावरून इकडे आल्या आहेत. विश्रांती घेऊ दे त्यांना दोन दिवस. म्हाताऱ्यांपेक्षा या तरुण मुलांचीच जास्त कीव करावीशी वाटते.” प्योत्र सोफ्रोनिविच म्हणाले.

" चांऽऽगलं माहीत आहे मला ते ! " सिदेरेंको आजीने दुजोरा दिला.

" खरं हे कायम खरंच राहतं " इम्नातीय मुसियेविच म्हणाला. " तरुणांबद्दल म्हणता ना ? मग ऐका तर, मी तुम्हाला तरुणपणची एक गोष्ट सांगतो..."

लेल्या आज भल्या पहाटेच जागी झाली. चुलीत घालायला भुसा आणण्यासाठी म्हणून होड्यांच्या बाजूला गेली. नतालिया पेत्रोवना सकाळपासून चुलीवर दुपारसाठी जेवण तयार करत होत्या. कोंद्रात सिदेरेंको सबंध दिवस बांधकामावर असे. फक्त रात्री तो घरी येई.

लेल्या घराच्या बाजूने एकदम भुसा पडलेला होता तिथे आली. होड्यांच्या आडोशाला जमिनीवर टेकली आणि इम्नातीय मुसियेविचची गोष्ट ऐकू लागली.

सूर्य थोडासा वर आला होता. कुरणावर चपळ लावी पक्षी पळत होते. हवा स्वच्छ आणि ताजी होती.

" तर काय सांगत होतो ? हं ! असा घडला तो प्रसंग. आमच्या भूशिरावर मारूस्या नावाची एक कोळ्याची पोर होती. पारास्या, तुला बहुतेक ठाऊक असेल ती. "

" ठाऊक कशी नसेल ? आम्हा सगळ्या मुलीत सुरेख होती ती. " सिदेरेंको आजी म्हणाली.

" एकदा आमच्या भूशिरावर एक चित्रकार आला. रोस्तोव, मॉस्को किंवा लेनिनग्राड इथला कुठलातरी असावा तो. फार आनंदी माणूस ! तुमच्या घराशेजारी रंगसामान घेऊन बसेल, एका डोळ्यानं मापं घेइल, तोंडानं शीळ घालेल, नंतर ब्रशानं थोडे फटकारे मारेल. आणि मग पहाल तर कापडावर तुमचं घर झळकलेलं दिसेल. त्याच घरात तुम्ही बाळपणापासून राहिलेले असता. नक्कीच तुम्हाला त्या घराचा कानाकोपरा माहीत असणार. पण जरा थांबून त्यानं काढलेलं तुमचं घर पाहाल आणि थक्कच होऊन जाल. जणू ते तुमचं घर नव्हेच. तर स्वर्गातलंच एखादं घर असावं ! असा होता तो चित्रकार ! त्यानं आमच्या मारूस्याचं चित्र काढलंन्. ती अशी समुद्राजवळ उपड्या होडीवर बसून जाळं नीट करतेय आणि हा तिचं चित्र काढतोय. त्याच्या पाठीशी मुलं गोळा व्हायची पण श्वास घ्यायलासुद्धा घाबरायची. आमच्या भूशिरावरचे लोक दुसऱ्याच्या कामाचा मान राखणारे, मग तो माणूस तरुण असो अगर म्हातारा ! मारूस्या बसलेली. चेहरा किंचित फिकट दिसतोय तिचा. दिसतंच आहे, की लाजतेय त्या चित्रकारापुढे. सारखी दृष्टी खाली वळवते आहे ती आणि तो तिला रागावतोय त्याबद्दल. केव्हा केव्हा असंही व्हायचं, की तिनं दृष्टी खाली वळवू नये म्हणून तो आधीच ओरडायचा. तिचे डोळे समुद्रावरच्या त्या निळ्या निळ्या चांदणीसारखे होते. "

" मी पाहतोय, इम्नातिय मुसियेविच, मारूस्याच्या सौंदर्याच्या बाबतीत तुम्ही

काही अगदीच तटस्थ नव्हता असं दिसतंय." प्योत्र सोफ्रोनोविच विनोदाने म्हणाले.

वान्या सावुश्किन हसू लागला. तशी इग्नातीय मुसियेविच म्हणाले, "ओघळणारं हसू–ढासळणारं कुसू! दोन्ही सारखीच निरूपयोगी!"

"सारखं दुसऱ्यांना हसण्याची ही कुठली रीत लोकांनी उचललीय कुणास ठाऊक! त्यात काही पराक्रम नाही." सुस्कारा टाकत सिदेरेंको आजी म्हणाली.

वान्या शरमेने लाल झाला आणि क्षमायाचनेच्या सुरात म्हणाला,

"मी आपला सहज हसलो. टिंगल करायचा उद्देश नव्हता माझा."

"बरं, बरं!" इग्नातीय मुसियेविच समाधान होऊन म्हणाले. "त्यानं तिचं चित्र काढलं. ते त्यानं आमच्या इथं नाही ठेवलं, तर लेनिनग्राडला आपल्याबरोबर घेऊन गेला. त्या वेळेपासून मारूस्या फारच अबोल झाली. त्या चित्रकारानं तिच्या मनावर ताबा मिळवला होता. माझ्या मुलीजवळ एक दिवस ती बोलली, "त्यान माझंच का चित्र काढलंत्? बराच काळ उलटून जाईल. माझं तारुण्य ओसरून जाईल. पण लेनिनग्राडमध्ये त्याला मात्र मी आहे तशीच तरुण आणि चमकदार डोळ्यांची दिसत राहीन. देव करो आणि तो पुन्हा इथं न येवो! आणि त्या चित्रातल्यापेक्षा वेगळं माझं रूप त्याला न दिसो! तेव्हा त्याला माझ्याकडे पाह्यला आवडणार नाही, शब्दसुद्धा बोलायला आवडणार नाही, या विचारानं माझं मन विदीर्ण होतं. तो आला तर मी कुरणात पळून जाईन, नाहीशी होईन," पण असं घडलं नाही."

इग्नातीय मुसियेविच थांबले. त्यांनी सिगरेट वळायला सुरवात केली.

"पुढे काय झालं?" लेल्याला ओरडून विचारावंसं वाटलं. पण तिने स्वतःला आवरलं.

"आणि घडलं ते तिला वाटलं तसं नाही. क्रांतीनंतर सगळ्या आमच्या बायका जशा मासेमारीचं काम करू लागल्या, तशीच मारूस्याही होडीबरोबर जाऊ लागली. पहिल्यांदा मदतनीस म्हणून, नंतर कोळी म्हणून, काही काळानंतर ती तुकडीची मुख्य झाली. खरं सांगायचं तर तिला खूप मासे मिळवायची विद्या चांगली अवगत होती. उघडच आहे, त्यामुळे मानसन्मान चालून आला तिच्याकडे. मॉस्कोच्या पेपरातही तिच्याबद्दल छापून आलं! एक दिवस मारूस्या समुद्रावरून परत आली. गमबूट घातलेली, ओलीचिंब झालेली! तिला वादळानं गाठलं होतं. सामुदायिक शेताच्या अध्यक्षानं तिला किनाऱ्यावर गाठलं आणि तिला आपल्याबरोबर सामुदायिक शेताच्या ऑफिसात यायला सांगितलं. कशासाठी ते तिला माहीत नव्हतं. ती ऑफिसात शिरली आणि लाल टेबल क्लॉथ घातलेल्या टेबलामागच्या भिंतीवर ते स्वतःचे चित्र तिला दिसलं. ते पाहिल्यावर तिचे गाल लाल लाल झाले.

"हे काय? हे कुठून आलं इथं?" ती बोलली.

तिने डोक्याचा रूमाल काढला, केस नीट केले. त्या चित्राकडे पाहिले आणि ती हसली.

“ हे बघ, कसं घडलं ते सांगतो. ” अध्यक्ष म्हणाले. “ मारूस्या, चित्रकारानं तुझ्याबद्दल वर्तमानपत्रात वाचलं आणि त्यानं तुझं हे चित्र आम्हाला भेट म्हणून पाठवलं आणि तो लिहितो, या उन्हाळ्यात पुन्हा तुझ्याकडे यायची त्याला इच्छा आहे. तुझ्या नव्या सन्मान चिन्हासह तुझं चित्र काढण्यासाठी. त्याच्या मनात ठाण मांडलेलं दिसतंय बहुतेक तू ! ” अध्यक्षानं विनोदाने म्हटले. आणि नवलच घडलं. आमची मारूस्या २० वर्षांनी तरुण झाली. चेहऱ्यावरच्या सुरकुत्या कुठे गेल्या कुणास ठाऊक ! डोळे तेजस्वी झाले, आवाज आणखीनच मंजूळ झाला आणि आपल्या पूर्वीच्या सौंदर्यानं आमच्यात उठून दिसायला लागली. ”

“ हर्ष माणसाला हवं तसं बनवतो. काळाच्या ताजव्यातनं वीस वर्षं गळूनच गेली.” प्योत्र सोफ्रोनोविच बोलले.

“ चित्रकार आला की नाही ? ” वान्या सावुश्किनने उत्सुकतेने विचारले.

“ आला ना ! तिला त्यानं आधी कळवलं. मारूस्या त्याला गावाच्या शिवेवर भेटली. अंगावर शाल घेतलीन् घाईनं आणि माल्वाचं रोपटं संध्या-प्रकाशानं उजळून निघावं तशी आनंदानं फुलून गेली. चित्रकारानं तिला पाहिलं आणि तो थबकलाच.

“ मी तुमचं नवं चित्र काढायला आलो होतो. पण नवं चित्र काढण्यासारखं काहीच नाही. जणू मधला काळ लोटलाच नाही ! मारूस्या, तुम्ही अगदी होतात तशाच आहात अजून ! ” मारूस्या फक्त हळूच हसली. एक शब्दसुद्धा बोलू शकली नाही. डोळ्यांत येणारी आसवं लपवण्यासाठी तिनं दृष्टी खाली वळवली. ” इग्नातीय मुसियेवेच गप्प झाले.

“ पुढे काय झालं पण ? ” सिदेरेंको आजीने विचारले.

“ पण पुढे काय घडलं ते सांगायचं वचन नाही दिलं आम्ही तुम्हाला. ” इग्नातीय मुसियेविचऐवजी प्योत्र सोफ्रोनोविच म्हणाले. “ तुम्हीच कल्पना करा. ”

“ लग्न झालंच असेल ना त्यांचं ? ” सिदेरेंको आजीने आनंदाने विचारले.

“ जगात सगळ्या तऱ्हेच्या गोष्टी घडतात ! ” इग्नातीय मुसियेविचनी उडवाउडवीचे उत्तर दिले. “ प्योत्र सोफ्रोनोविच, तुमच्या नातीकडे पाहिलं की मला मारूस्याची आठवण येते. त्यांच्यातल्या साम्यानं मी चकित होतो. ”

“ असेल कदाचित् साम्य ! ” प्योत्र सोफ्रोनोविचनी दुजोरा दिला.

लेल्या उठली आणि आपल्याकडे लक्ष जाऊ नये अशा तऱ्हेने हळूच घराकडे निसटली. तिचा चेहरा उजळून निघाला होता.

“ अखंड बोलत राहतात नुसते. हे इग्नातीय आजोबा बडबडे आहेत नुसते ! ”

कॉकेशसच्या पायथ्याजवळून लेल्या दोन दिवसांपूर्वी नतालिया पेत्रोवनाबरोबर स्टेप-मध्ये आली होती.

प्योत्र सोफ्रोनोविचना त्या येतील असे वाटले नव्हते. मुलीला आणि नातीला

पाहिल्याबरोबर इतर म्हाताऱ्यांप्रमाणेच त्यांचे डोळे भरून आले. आपण 'कामात असताना' त्यांना दिसलो याचा त्यांना विशेष आनंद झाला.

ते सगळे सिदेरेंकोकडे राहात होते. घरात खूप गर्दी झाली होती आणि उकडतही होते. पण वातावरण समाधानी आणि आनंदी होते.

म्हाताऱ्यांनी आपल्याला चार लोकात खाली बघायला लावले नाही याचा सिदेरेंको आजीला अभिमान वाटला. ते इथे आले आणि इथल्या लोकांना अगदी नवीन असलेल्या कामाची तयारी करायला मदत करताहेत याचे तिला समाधान वाटले. ती म्हातारी असली तरी सुद्धा नव्या जीवनाची जुळणी करण्यासाठी मदत करत होती. पूर्वी एकटा कोंद्रात काम करायचा. पण आता ती या सगळ्या कामात स्वतःचा वाटा उचलत होती.

रिकाम्या वेळात ती इग्नातीय मुसियेविच आणि प्योत्र सोफ्रोनोविचना त्यांच्या कामात मदत करायची. होड्या दुरुस्त करणे, जाळी दुरुस्त करणे आणि दुसरी सगळी मासेमारीची कामे तिला लहानपणी करावी लागत ते दिवस तिला आठवत.

प्योत्र सोफ्रोनोविच भेटल्याबरोबर नतालिया पेत्रोवना आझोव पद्धतीने बोलायला लागल्या.

"बाबा! तुम्ही स्वतःचं वय विसरू नका हं. जिवाविशेष उडी घेऊ नका. आणि सिगरेटीसुद्धा वयाच्या मानानं जास्तच ओढता तुम्ही!" ती म्हणाली.

"ए, तू उगीच धमक्या देऊ नकोस. नताल्का, तावून सुलाखून टणक बनलेला आणि समुद्राचा वारा प्यालेला माणूस आहे मी! मी अजून चांगलं जगणार आहे या जगात. मोठीमोठी कामं निघतील! प्रत्येकानं मनापासून हात लावला पाहिजे त्यांना." प्योत्र सोफ्रोनोविच म्हणाले.

या उन्हाळ्यात लेल्याची अवस्था सर्वस्वी नवी, विस्मयजनक होती. ती १० वीत गेली होती. आतापर्यंतची वर्षे अभ्यासात, वाङ्मयाच्या आकर्षणात, नाट्य विभागात काम करण्यात फार भराभर सरली होती. लांबलचक हिवाळ्यात सारातोवमध्ये कधी कधी नाटक, कधी कॉन्सर्ट, कधी व्याख्याने अशा कार्यक्रमात दिवस जायचे, आणि उन्हाळ्यात वोल्गा किनारी विश्रांती, होड्यांच्या शर्यती, पायी काढलेल्या सफरी यात दिवस सरायचे. फक्त या उन्हाळ्यात ज्याला ती 'जग' म्हणते ते तिने पाहिले. समुद्र, कॉकेशस, स्टेप प्रदेश, माणसांनी घडवलेली अवाढव्य वास्तू, नव्या माणसांशी भेट-खमारा, म्हातारे कोळी आणि नव्या समुद्रकाठचे रहिवासी! काळ पूर्वीपेक्षा फारच जलद गतीने जात होता.

नतालिया पेत्रोवना म्हणे त्याप्रमाणे जीवनात स्वतःला ओळखले पाहिजे. आणि स्वतःच्या कामाची दिशा ठरवली पाहिजे. नतालिया पेत्रोवनांनी लेल्याला हेतुपुरस्सरच कोणताही सल्ला दिला नाही. लेल्याने स्वतःचा कल पाहून स्वतःच आपला व्यवसाय

ठरवावा असे नतालिया पेत्रोवनांना वाटत होते.

" जे तुला व्हावंसं वाटेल ते तू हो ! डॉक्टर, इंजिनियर, कलावंत, भूगर्भशास्त्रज्ञ, शेतीतज्ञ काहीही हो. पण उदार आणि प्रामाणिक माणूस हो ! " नतालिया पेत्रोवना म्हणाल्या,

ज्यात अनेक गुण एकवटलेले आहेत आणि मानवी जीवनाच्या नव्या असाधारण अंगांवर ज्यात प्रकाश टाकला जातो असा व्यवसाय निवडावा असे लेल्याला वाटत होते. पण ते अजून सगळेच अस्पष्ट होते.

" व्यवसायाच्या निवडीचा विचार शरदऋतूनंतर करू. कदाचित काळच काही तरी व्यवसाय सुचवेल. "

लेल्याने भुसा आणला होता. त्याने ती चूल पेटवीत होती. त्या चुलीलाच चहाच्या समवारचा नळा जोडलेला होता. धुराची वलये निघू लागली. चुलीच्या रुंद फटीतून काळे किडे बाहेर पळाले. चुलीपुढे गुढग्यावर बसून लेल्या विस्तवाला फुंकर घालत होती. थांबलेल्या गाडीतून सिदेरेंकोच्या घराकडे येणाऱ्या कार्पोवना तिने पाहिले नाही.

ते लेल्याजवळ आले. काळ्या रिबिनी लावलेल्या तिच्या लांब वेण्यांकडे त्यांचे लक्ष गेले. लेल्या आपल्याशीच बोलत होती.

" आजोबासुद्धा फार चांगले आहेत. आपल्या मित्राच्या—इग्नातीय मुसियेविचच्या साऱ्या गोष्टींना त्यांची संमती असते. "

ते खोकले. लेल्या झटकन गर्रकन वळली.

" ओ हो ! इथं आलात काय तुम्ही ? नमस्ते ! " कॉर्पोवनी आश्चर्याने विचारले.

लेल्या उभी राहिली आणि गोंधळून हसत तिने कॉर्पोवकडे पाहिले.

" तुम्ही ? " तिने अखेर शेवटी एकदाचे विचारले.

" हो मीच ! " कॉर्पोव म्हणाले.

" मिळाला का तुम्हाला हवा तो सिमेंटचा प्रकार ? " तिने विचारले.

" मिळाला. "

" आई ग ! इकडे ये ! लवकर ! गाडीत भेटलेले कॉम्रेड कार्पोव आलेत. " लेल्या ओरडली.

नतालिया पेत्रोवना उंबऱ्याजवळ आल्या. डोक्यावर येणाऱ्या उन्हासाठी डोळ्यांपुढे पंजा धरून त्यांनी कार्पोवकडे पाहिले. त्यांनीही त्यांना ओळखले. कार्पोवनी इतक्या सहजपणाने नतालिया पेत्रोवनांना अभिवादन केले की जणू कालच त्यांनी नोवोरोसिइस्क स्टेशनवर एकमेकांचा निरोप घेतलेला होता.

जेव्हा त्यांना कळले की नतालिया पेत्रोवना प्योत्र सोफ्रोनोविच यांची मुलगी आहे तेव्हा त्यांना फार आनंद झाला.

ते स्वतःही इल्मेन सरोवरावरच्या कोळयाच्या कुटुंबातलेच होते.

" म्हणजे आपलं एक प्रकारचं नातंच आहे. फार चांगले आहेत तुमचे वडील. उदार स्वभावाचे आहेत म्हातारबुवा ! आमची गट्टी जमलीय. त्यांनी मला माझ्या कामात मदत केली, आता मी त्यांना मदत करायला आलो आहे." कार्पोव म्हणाले.

" हो, पण त्यांनी काय तुम्हाला मदत केली ?" शंकेखोरपणाने नतालिया पेत्रोवनांनी विचारले. " ते तर अगदीच म्हातारे झाले आहेत."

" उदाहरणच द्यायचं झालं तर आमच्या बांधकामाच्या सगळ्या विभागात या म्हाताऱ्यांच्या दुकलीबद्दल माहिती आहे. कुणालाही आता अडचणींबद्दल तक्रार करायला किंवा सबब सांगायला तोंड नाही. या म्हाताऱ्यांना आमच्याकडे विनोदाने आणि कौतुकाने 'समाजवादी म्हातारे' म्हणतात." कार्पोव म्हणाले.

" काय म्हणतात ?" नतालिया पेत्रोवनांनी विचारले.

" समाजवादी म्हातारे." कारण समाजवादात सगळे म्हातारे यांच्यासारखे असले पाहिजेत.

नतालिया पेत्रोवनांना हसू आले. " होय, खरोखरीच ते चांगले आहेत. पण फार गोष्टीवेल्हाळ आहेत. पण म्हातारपणी ते क्षम्य आहे" त्या म्हणाल्या.

# १४

धरणाच्या दरवाज्यांचा विभाग हा सर्वांत महत्त्वाचा विभाग समजला जात असे. त्यांचा कॉंक्रिटचा पाया, त्यांचा तळ तयार झाला होता. तळाच्या दोन्ही बाजूल दरवाज्यांच्या भिंतीची हलकी आणि जाळीदार फ्रेम उभी होती.

दिवसाचा बराच वेळ झिमल्यानोय या दरवाज्यांवरच घालवी. कॉंक्रिटच्या कारखान्याच्या एका टोकाकडून कॉंक्रिटचे लापशीसारखे मिश्रण अखंडपणे वाहत येत ट्रकमधे पडत होते. ते लगेच तळात टाकले जात होते. ते ताजं ताजं कॉंक्रिट सारखं करण्यासाठी इलेक्ट्रिक व्हायब्रेटर त्यावर काम करत होते.

दरवाज्यांच्या खड्ड्यात उभे राहून काही हुकूम देत असताना झिमल्यानोय केव्हा केव्हा वर बघत तेव्हा त्यांना फ्रेमच्या जाळ्यातून धुळीने फिकट दिसणारे आभाळ आणि स्थिरावलेले ढग दिसत. लवकरच इथे पाण्याचा पारदर्शक थर येईल आणि तळातल्या शेवाळाने हिरवट झालेल्या दरवाज्यांमधून सुरीकने रंगवलेली बोटींची नाके तरंगताना आढळतील.

सगळे ठरल्याप्रमाणे घडेल. पण सध्या झिमल्यानोयना फक्त स्टेपमधले आकाश अस्वस्थ करत होते. पाहता पाहता त्याचा रंग फिका झाला. करड्या धुरकट रंगावरून आकाशाच्या मूळच्या निळ्या रंगाची फक्त कल्पना करता येत होती. लांब क्षितिजापाशी आकाशाला उदास दगडी रंगाची छटा आली होती.

जितके आकाश अधिक काळपट होई, तितका उकाडा जास्तच त्रासदायक होई.. कामगारांच्या चेहेऱ्यावर घामाचे नुसते थेंब उभे राहत नव्हते, तर घामाचे लोट

वाहत होते.

त्या दिवशी क्लावा गुसेवा दरवाज्यांच्या जागेपाशी माती खणण्याच्या कामावर होती. धुराळ्याचा दाट थर माती ओतलेल्या जागेवर तरंगत होता. हवा बिलकुल हलत नव्हती. त्यामुळे धुराळ्याचा थरही हालत नव्हता. धूळ यंत्रांवर, वाळलेल्या गवतावर बसत होती. घामाने भिजलेल्या चेहऱ्यांवर चिकटत होती. तपकिरी रंगाचे धुळीचे ओघळ झुडुपांवरून घांदोट्यांसारखे लोंबत होते. तोंडाला हात लावायची काही सोय नव्हती. धूळ कातडीत शिरली तर दोन दोन दिवससुद्धा धुतली तरी निघणार नाही असे वाटत होते.

संध्याकाळी तर धग फारच वाढली. फारच भयानक होती ती! धुराने कोंदलेल्या आगीतून जसा वास येतो तसला वास गच्च झालेल्या आभाळातून येत होता. जवळचे वाळवंट माणसांवर जणू हल्ला करायची तयारी करत होते. आपली सगळी शक्ती गोळा करत होते.

असं वाटत होतं, की पेटती एकच काडी गवतात पडली तर सबंध स्टेपप्रदेश लाल लाल ज्वाळांनी क्षणात वेढून जाईल.

धुराळ्याच्या थरात सूर्य बुडून गेला. बरोबर सहा वाजून दहा मिनिटांनी दूरवर दीर्घ गंभीर आवाज घुमला. आकाशमध्याकडे सरकत सरकत त्या आवाजाने जमिनीचा आणि आकाशाचा सर्व दृश्य विस्तार आपल्या तीव्र उग्र गडगडाटाने भरून टाकला. ते पहिले वादळ होते. झिमल्यानोयला नक्की वेळ आठवत होती कारण त्याचवेळी त्यांनी घड्याळात पाहिले होते—सहा वाजून दहा मिनिटे झाली होती.

नंतर त्याच धूसर वातावरणात एकात एक गुंतलेल्या निळ्या फांद्याच्या प्रचंड वृक्षाचे डोळे दिपवून टाकणारे दर्शन क्षणभरच झाले. आणि क्षणात तो अदृश्य झाला. त्या मोसमातली पहिलीच वीज होती ती!

स्टेपप्रदेशात क्वचितच होणाऱ्या ओल्या वादळाच्या विध्वंसक शक्तीची झिमल्यानोयना कल्पना होती. गडगडाट करणाऱ्या काळ्या ढगांनी गच्च भरलेल्या आकाशाकडे पाहताना त्यांना कळले की आत्ता नाहीतर अर्ध्याएक तासाने सबंध बांधकामावर चिकणमातीच्या चिखलाशी जीवघेणी झटापट करावी लागेल.

त्यांनी टेलिफोनवरून बांधकामाच्या सर्व विभागांना नजिकच्या धोक्याची सूचना दिली. पुढे काय वाढून ठेवलेले होते? मुसळधार पावसाच्या पाण्याचे लोट आणि त्यात विघळणारी माती!

कदाचित या वादळी पावसाने कालव्याच्या काठांना धोका निर्माण होईल. ते ढासळून जातील. चिखलात रुतून बसू नयेत म्हणून यंत्रे ताबडतोब बाहेर काढायला हवी होती.

त्याशिवाय बांध घालून आडवलेली ही स्टेपमधली लहानशी निरुपद्रवी कार्पोवका! पण तिचे रूपांतर तुफानी प्रवाहात होणे शक्य होते. आणि तसे झाले तर ती सारे

बंधारे पुरे साफ करून टाकेल.

झिमल्यानोयनी साऱ्या सूचना अगदी शांतपणाने दिल्या. त्यांचा आवाज एकदा-सुद्धा चढला नाही. पण त्यांच्या त्या शांत स्वरात एक हुकमत जाणवली. ती म्हणजे निसर्गाच्या हल्ल्याला प्रत्युत्तर देण्यासाठी सर्व मनुष्यबळ आणि प्रचंड यंत्रबळ एकत्रित गोळा करण्याची!

ज्या तुकडीत क्रावा काम करत होती त्या माती सारखी करणाऱ्या तुकडीला बंधाऱ्याच्या भागात टाकले होते. कारण तिथल्या कामाची गती वाढायला हवी होती. तिथल्या साऱ्या यंत्रांची गती वाढवून बाहेर यायला हवे होते. कार्पोवकात किती पाणी चढेल याची कुणालाच कल्पना करता येत नव्हती.

बंधाऱ्याजवळ माती खणणारी यंत्रेही काम करत होती. त्यातच प्रोखोरोवचे लहान यंत्रही होते. क्रावाच्या मनात प्रोखोरोवबद्दल अजूनही अढी होतीच.

क्रावाने आपले यंत्र बंधाऱ्याकडे नेले. डोळे दिपवणाऱ्या विजेच्या उद्रेकातून ती बंधाऱ्याकडे चालली होती. धोक्याच्या सिग्नलप्रमाणे शेकडो विजा चमकून गेल्या.

धोक्याच्या सिग्नलची ही कल्पना फक्त क्रावाच्याच मनात चमकून गेली नाही, तर तसाच विचार झिमल्यानोय आणि कार्पोव यांच्याही मनात आला.

"प्रकाशाची जणू भिंतच तयार झालीय. थोडं जरी वारं सुटलं असतं तर यंत्रां-वरच्या माणसांना भारी जड गेलं असतं यंत्र बाहेर नेणं." झिमल्यानोय म्हणाले.

झिमल्यानोय ऑफिसच्या व्हरांड्यात आले. गाडी त्यांची वाट पाहत उभी होती.

"गाडी नको. ट्रॅक्टर आणा. गाडीने आपण रुतून बसू."

ट्रॅक्टर येईपर्यंत ते आभाळाचे निरीक्षण करत राहिले. त्यांना वाटलं की आभाळ हळू हळू जमिनीवर उतरतंय.

कालव्याच्या साऱ्या मार्गावरचे दिवे जळत होते. वादळी अंधारामुळे नेहमीपेक्षा लवकरच ते लावण्यात आले होते. सबंध बांधकाम उजेडाच्या संरक्षक आवरणात गुंडाळल्यासारखे दिसत होते.

झिमल्यानोय यांची सारी संरक्षणाची तयारी कोलमडून गेली. वादळाची बिनीची फौज म्हणून वाऱ्याची प्रचंड भिंतच चालून आली वादळी वाऱ्याने हवेचे रूपांतर धूळ आणि अंधार यांच्या काल्यात केले.

वारा धुळीचा जाड थर यंत्रांच्या चालकांच्या तोंडावर मारत होता. क्रावाचे यंत्र करकरत, घसरत मातीच्या भिंतीने आडवेपर्यंत अंदाजानेच जात होते.

क्रावाने यंत्र वळवले, माती भरून घेतली, यंत्र बंधाऱ्याकडे वळवले न वळवले तोच तिला वेगाने अंगावर चालून येणाऱ्या मुसळधार पावसाचा आवाज ऐकू आला.

पावसाच्या मुसळधारा एकाएकी कोसळू लागल्या. जमीन कुठे, आकाश कुठे, बंधारा कुठे, जवळची यंत्रे कुठे आहेत हे समजणेही कठीण झाले. लहानशा कोरड्या जमिनीच्या

तुकड्यावर यंत्र फिरतंय आणि सभोवती काळपट पाण्याचे गरम प्रवाह वाहात आहेत असं वाटत होतं.

क्लावाने दात ओठ खात यंत्र त्या प्रवाहात घातले. माती उचलली. बंधाऱ्याकडे सरपटत गेली आणि तिथे आपले ओझे टाकले. ती अस्वस्थ झाली. तिच्या मनात आले, आणखी काही मिनिटांतच ट्रॅक्टरच्या पात्यांखालच्या मातीचे रूपांतर चिकट लुकणात होईल, यंत्र त्यात अडकेल आणि काम थांबेल.

क्लावाला काहीच दिसत नव्हते, त्यामुळे पाणी किती चढतेय, धोका वाढतो आहे का ते तिला काहीच कळले नाही. यंत्राला धोका पोहोचू द्यायचा नाही एवढेच तिला कळत होते. तिने यंत्राची शक्ती एकवटली.

पण यंत्र प्रत्येक पावलाला फारच जड येऊ लागले. ते मोठमोठ्याने कण्हतंय असे क्लावाला वाटले, "काही नाही झालं!" यंत्राची समजूत घातल्याप्रमाणे क्लावा म्हणाली. "कामाला कमी पडू नको, पावसाळ्यात पुरामध्ये यापेक्षा वाईट स्थिती होते. चल, थांबू नको."

पण स्क्रेपर ओढणे ट्रॅक्टरच्या शक्तीबाहेर झाले, तेव्हा क्लावा रागाने ओरडली,

"काय हे तुझं? घसरून पडायचं आहे का? तुला ओढ म्हणून सांगताहेत ना, मग ओढ!"

चढावर यंत्र घसरायला लागले. ते थांबले, मागे यायला लागले आणि एका बाजूला खचू लागले.

क्लावाने यंत्र पूर्ण वळवले पण तरीही ते घसरतच राहिले. आणि आणखी आणखी कलू लागले.

"अरे बापरे!" तिच्या मनात विचार आला. "हे आता पुरं आडवं होईल आणि मला मातीत चिरडून टाकील. मग खेळ खलास!"

क्लावाला माहीत होते की अगदी तिच्याशेजारीच प्रोखोरोवचे यंत्र काम करतेय. मुसळधार पावसातूनही तिला त्याच्या दिव्याच्या प्रकाशाचा गढूळ प्रवाह दिसत होता. पण तो उजेड तिच्या यंत्राच्या बाजूने बंधाऱ्यावर पडत होता. त्यामुळे अर्थातच क्लावाचे काय होतेय हे त्याला कळले नाही.

"प्रोखोरोव!" कलावा ओरडली.

पावसाच्या आवाजातून आणि त्याच्या यंत्राच्या खडखडाटातून त्याला हाक ऐकू जाईल अशी कोणतीही आशा न ठेवता तिने हाक मारली आणि जरी हाक ऐकू गेली तरी तो कितपत मदत करू शकेल? स्वतःच्या यंत्राचा लोखंडी हात तो स्क्रेपरजवळ आणू शकला असता. पण त्याने काय होणार? बकेटप्रमाणे स्क्रेपर तर काही त्याला अडकवता येणार नाही? किंवा धरूनही ठेवता येणार नाही.

क्लावाने सर्व शक्ती पणाला लावून यंत्र घसरण्याचे थांबवले. लहानशा हालचालीनेही

ते आडवे पडेल आणि तिला चिखलात बुडवील असे तिला वाटत होते. काळ जणू थांबला होता. प्रकाशाचा झोत हळूहळू वळतो आहे असे वाटत होते. पण अजून काही प्रकाश यंत्रावर पडला नव्हता. तितक्यातच अतिशय मंद गतीने एका बकेटने माती घेतली. मातीचे पाणी क्लावाच्या अंगावर सांडत ते तिच्या डोक्यावरून पलीकडे गेले, आणि ज्या बाजूला क्लावाचे यंत्र कलत होते त्या बाजूच्या फाळाखाली माती टाकली.

क्लावाला जाणवले की आता यंत्र घसरत नाहीये. प्रोखोरोवने आणखी एक बकेटवर माती यंत्रापाशी टाकली. झटकन् दांडा बाजूला वळवला आणि पुन्हा बंधाऱ्यावर भर टाकायला सुरवात केली.

क्लावाला जरी खूप वेळ गेल्यासारखे वाटत होते तरी हे सगळे फारच जलद गतीने घडले. मातीमुळे कपाळावर चिकटलेले केस क्लावाने मागे सारले आणि तीक्ष्ण आवाजात हवेत तोंड करून ओरडली,

"प्रोखोरोव, फार फार आभारी आहे तुझी!" तिने बाहीने ओला चेहरा पुसला.

डोळ्यांची फारच आग होत होती. बहुधा माती गेली असावी डोळ्यांत. जमा होणाऱ्या आसवांमुळे डोळे चुरचुरत होते पण क्लावा ते कबूल करायला तयार 'नव्हती. तरीही केबिनमध्ये बसून ती रडत होती. सोसलेल्या ताणामुळे, प्रोखोरोवबद्दल वाटणाऱ्या कृतज्ञतेमुळे. नुकताच तिने प्रोखोरोवचा सभेत अपमान केला होता. भर सभेत त्याला ती हसली होती.

"शी! किती वाईट मुलगी आहे मी! दुसऱ्याला शिकवायला निघाले! स्वतःचंच कौतुक करून घेतलं मी सभेत! मूर्ख, अगदी शतमूर्ख आहे मी!"

तिला झिमल्यानोयचे शब्द आठवले. "सर्वांत आधी प्रत्येक व्यक्तीत असलेलं चांगलं शोधून काढलं पाहिजे." पण आपण फक्त वाईट तेवढंच शोधतो, स्वतःचे दोष झाकण्यासाठी.

अचानक पसरलेल्या शांततेने भांबावलेली क्लावा कान देऊन ऐकू लागली.

मुसळधार पाऊस जसा आकस्मित सुरू झाला होता तसाच तो नकळत थांबला. विजा मात्र अखंड चमकत होत्या. त्यामुळे डोक्यावरचे आभाळ मात्र धुरकट पळत्या प्रकाशाने जळत होते.

विजेच्या प्रकाशात बंधारा व प्रोखोरोवचा ट्रॅक्टर आणि धरणाच्या भिंतीच्या बाजूने जडपणाने येणारा प्रचंड अनोळखी ट्रॅक्टर स्पष्ट दिसत होता.

क्लावाने सीटखालून फडके काढले आणि त्याने तोंड स्वच्छ केले.

दूर, दक्षिणेच्या बाजूला आभाळ स्वच्छ झाले. सायंकालीन प्रकाशाच्या हिरवट पट्ट्यावर ताऱ्याचा शांत प्रकाश दिसला. संथपणाने उत्तरेकडे निघालेल्या ढगांच्या राशीवर तो तिला पावसाच्या रूपेरी थेंबासारखा भासला.

अश्रुभरल्या नेत्रांनी क्लावा हसली. तिने भिजून जड झालेल्या बॉयलर सूटची

कॉलर उघडी केली.

पावसाने स्वच्छ धुऊन काढलेल्या रात्रीची शांतता आणि निर्मळपणा तिला एखाद्या जादूसारखा भासला. सुखदायक मंदशीतल असा वेगळाच जाईसारखा गंध जमिनीतून येत होता. हा वास ओझोनचा, वादळाच्या उद्रेकाचा होता !

मोठा ट्रॅक्टर तिच्या यंत्राजवळ आला आणि थांबला. झिमल्यानोय आणि कार्पोव ट्रॅक्टरमधून बाहेर आले.

" जिवंत आहेस का ग ? " कार्पोवने क्लावाला विचारले आणि म्हणाला, " थांब, तुला नाही उतरता येणार. मी तुला हात देतो. "

केबिनमधून बाहेर यायला त्यांनी क्लावाला मदत केली. क्लावाला दिसले की तिचे यंत्र पाण्याने भरलेल्या एका खोल खळग्याच्या कडेवर उभे होते.

" प्रोखोरोवनी मला वाचवलं. ही माती त्यानेच टाकली आणि यंत्र थांबवलं, नाही-तर मी यंत्राखाली कायमची मातीत झोपी गेले असते. "

" संपलं एकदाचं, " बहुधा क्लावा काय बोलली ते ऐकू न येताच झिमल्यानोय बोलले. " वादळ गेलंय, गडगडाट थांबलाय. सगळं पाणी कार्पोवकाच्या आधीच्या पात्रात सोडून दिलंय. फक्त तीन यंत्रं अडकली आहेत. "

" प्रोखोरोवने मला वाचवलं. " क्लावा पुन्हा म्हणाली. पण झिमल्यानोयने पुन्हा काहीच उत्तर दिले नाही आणि त्यांनी अगदी वेगळाच विषय काढला.

" सारख्या विजा चमकत राहातात त्या रात्रींना काय म्हणतात, माहीत आहे का तुम्हाला ? "

" नाही. " क्लावाने उत्तर दिले.

" चिमण्यांच्या रात्री. " कारण तीव्र प्रकाशामुळे चिमण्या जाग्या होतात. हवेत घिरट्या घालायला लागतात. आणि विजेचा प्रकाश लुप्त होतो तेव्हा अंधारात न दिसल्याने झाडांच्या फांद्यावर किंवा भिंतींवर धडकतात. चल ये, इकडे आमच्या ट्रॅक्टरमध्ये बस. ट्रॅक्टरने तुझे यंत्र उद्या बाहेर काढू. मग ते स्वच्छ धुवून काढ आणि तपासून बघ. आणि प्रोखोरोवबद्दल म्हणशील, तर त्यानं काहीही विशेष केलेलं नाही असं मला वाटतं. नेहमीसारखंच कृत्य आहे ते ! ठीक आहे, जाऊ या आता " झिमल्यानोय म्हणाले.

# १५

वादळानंतर कोरडे " अस्त्राखान " वारे वाहू लागले. त्यामुळे जमीन लगेच वाळून गेली. श्वास घेण्याइतकीसुद्धा उसंत न घेता हे वारे वाहात होते. साधारणपणे संध्याकाळी वारा जरा पडतो पण हे वारे जराही शांत झाले नाहीत. आपल्या क्रूर छुप्या सामर्थ्या-निशी वारा वाहात होता. त्याचा वेग सारखा वाढतच होता. प्राचीनकाळी मानवाच्या रानटी अवस्थेत तो या रूक्ष तप्त भूमीत मनमानेल तसा संचार करायचा, तसा संचार पुन्हा करायला मिळावा म्हणून जणु काही त्याला या भूमीचं रूप पालटणाऱ्या माणसांना आणि यंत्रांना स्टेपमधून घालवून द्यायचे होते.

दुसऱ्या दिवशी आकाशाचा सगळा नीलिमा नाहीसा झाला. त्याने पुन्हा धुरकट रंग धारण केला. पण त्या धुराळ्यातून सौम्य दिसणारा सूर्य कधीही न अनुभवलेल्या उष्णतेने भाजून काढत होता. गुदमरून टाकणाऱ्या हवेने लोकांना हैराण केले होते. या घुसमटून टाकणाऱ्या हवेपासून कुठेही गेले तरी सुटका नव्हती. घराच्या सावलीत नाही, इतकंच काय पण नदीच्या साठलेल्या, पण आटत चाललेल्या पाण्यातसुद्धा गारवा नव्हता. ते पाणी चहाइतके गरम झाले होते. कोरडया गरम हवेने जीव असलेली प्रत्येक वस्तू जणू जळून खाक झाली होती. फक्त काळ्या काळ्या लठ्ठ जळवा चिखलात वळवळत होत्या आणि काटेरी फुलांचं झुडुप वाऱ्याबरोबर खुळखुळत होते.

निसर्गाच्या या नव्या अवताराने बांधकामावरचे सगळे लोक हैराण झाले होते. या स्टेपवर माणसांनी आपली पकड पुरती घट्ट करीपर्यंत निसर्गाकडून कोणतेही संकट येण्याची शक्यता होती.

तिसऱ्या दिवशी या "अस्त्राखान" वाऱ्याचे रूपांतर धुळीच्या वादळी वाऱ्यात झाले. त्याने कास्पियन समुद्रापलीकडच्या वाळवंटी प्रदेशातून डोळ्यात बोट घातले तरी दिसणार नाही अशा गडद अंधाराची भिंतच्या भिंत डॉन प्रदेश, वरन्येज सारातोव या प्रदेशावरून पळवत आणली. तो क्रूरपणाने माती खणणाऱ्या यंत्रांच्या दांडयांमधून घुमत पिंगा घालत होता. प्रत्येक पलीनच्या झुडुपाच्या बुंध्याशी त्याने धुळीचा ढीग आणून रचला होता. नाकातोंडात धूळ उडवत होता. त्या प्रदेशातला उरला सुरला हिरवेपणाही नष्ट करीत चालला होता तो! यंत्रांच्या छोट्या पथदर्शक आरशांवर इतक्या जोराने थपडा मारीत होता की फक्त दात ओठ खाऊन वाऱ्याला शिव्या देण्यापलीकडे काही करण्याचीही शक्ती त्यांच्यात उरली नव्हती.

कार्पोव बासर्गिनकडे आले. प्रमुखाच्या खोलीच्या खिडक्या बंद होत्या. चक्कर यावी इतकी खोलीतली हवा गरम झाली होती. बासर्गिन टेबलाजवळ बसले होते. पांढऱ्या शर्टाची सगळी बटने त्यांनी काढून टाकली होती. टेलिफोन खणखणत होता. बासर्गिननी टेलिफोन उचलला. तो धुळीनं माखला होता.

"आत्ता मी फोन केला आणि लगेच त्यावर पुन्हा इतकी धूळ जमली." ते बोलले.

"ह्या सैतानी वाऱ्याचा जोर काही अजून कमी होत नाही. माणसं अगदी वैतागली आहेत. चिडचिडी झाली आहेत. एवढंसं काहीतरी घडतं आणि लगेच गैरसमज होतात." कार्पोव सांगत होते.

"होय. हा सैतान सगळयांची मनं कुरतडून टाकतोय. पण त्याला थांबवणं आपल्या हातात आहे का?" बासर्गिन म्हणाले.

"या "अस्माखानबरोबर" लढण्याची तयारी आपण केली पाहिजे. युद्धात आघाडीवर जसं आपण समोरासमोर लढलो तसं लढण्याची! आणि पाणीही हवं. आणखी पाणी पुरवलं पाहिजे बांधकाम कामगारांना, त्या वाऱ्याला कळलं पाहिजे की पृथ्वीवर अजून थंडगार शुद्ध पाणी अस्तित्वात आहे! पाणी भरपूर आहे या विचाराने सुद्धा मन हलकं होतं पुष्कळ! सगळया विभागात रेती वाळू डोळयात जाते, काही दिसत नाही. श्वास घ्यायला सुद्धा स्वच्छ हवा नाही. आणि पायाखाली धूळचधूळ. पाण्याचा मागमूसही नाही. एकादं तरी हिरवं गवताचं पातं उगवावं? सूर्य झाकोळलेल्या आकाशात आहे. पण तरीही यंत्रं मात्र सगळी तापून निघताहेत. जे जे मिळेल ते ते गोळा केलं पाहिजे–सगळी टँकर्स, सगळी पिपं, सगळ्या टाक्या, सगळे रिकामे ट्रक! आणि लोकांना थंड करण्यासाठी या सैतानी स्टेपमध्ये पाणी वाहून आणलं पाहिजे." कार्पोव बोलत होते.

"माझ्या इंजिनियरच्या आतापर्यंतच्या आयुष्यात मी सगळया तऱ्हेची संकटं पाहिली. पण असलं दुष्ट संकट कधी पाहिलं नव्हतं. दलदलीत रूतलो, भयानक थंडीत गोठून गेलो. पण या मानानं ते पुष्कळच हलकं होतं. मनावर असलं भयानक दडपण

नव्हतं. " बासार्गिन म्हणाले.

" मीही तेच म्हणतोय ! " कार्पोवनी पुष्टी दिली.

" पाणी मिळेल ! " बासार्गिननी आश्वासन दिले. ते विचार करत थोडे थांबले आणि पुढे बोलले, " पण एवढंच करून भागणार नाही हे उघड आहे. "

पुन्हा टेलिफोन खणखणला. बासार्गिननी गरम झालेला रिसिव्हर उचलला, कानाला लावला आणि तोंड वाकडं केलं.

सहाव्या विभागातून टेलिफोन आला होता. स्क्रेपर धुळीत रूतत होते. त्या विभागाच्या प्रमुखाकडून काम थांबवून स्क्रेपर ड्रायव्हरना जरा श्वास टाकायला फुरसत मिळावी म्हणून थोडा वेळ काम थांबवण्याची मागणी करण्यात येत होती.

बासार्गिनच्या ऑफिसमधून कार्पोव थेट सहाव्या विभागात गेले, जाता जाता ते क्लावाकडे गेले आणि त्यांनी तिला बरोबर घेतले. क्लावाने थोड्या नाखुषीनेच यायचे कबुल केले.

" इथं माझं काम गळ्याला टेकलंय ! " नाखुषीने क्लावा म्हणाली. " सहाव्या विभागातले ते तगडे जवान कुकुली बाळं आहेत का अगदी या वाऱ्याला घाबरायला ! पण मी काय तुम्हाला मदत करणार त्यात ? "

" तूसुद्धा घाबरशील बघ ! माणूस म्हणजे काही दगड नाही ? " कार्पोवनी उत्तर दिले.

" आणि मी दगडाची आहे का ? " क्लावाने विचारले.

" असं काय ? म्हणजे तूसुद्धा कचरते आहेस असाच याचा अर्थ ! याला म्हणतात नशिबाचा छुपा वार ! तुझ्या भरवशावर होतो मी, " कार्पोव थोड्या घुश्शानेच म्हणाले.

" चला ! मी कुचराई करते का काय, ते माझ्या कामावरून समजत नाही तुम्हाला ? पूर्वीइतकंच काम होतंय माझं अजूनही. " क्लावा बोलली.

" एकाच वेळच्या कामावरून काही ठरवता येत नाही ते ! " कार्पोव बोलले.

" ठरवा तुमच्या मर्जीला येईल तसं ! मला काय सगळं सारखंच. "

" समजलं का ? कृपा करून येऊ नकोस माझ्याबरोबर. मला अशी नको आहेस तू. " कार्पोवनी सांगितले.

" अशी म्हणजे कशी ? " क्लावाने विचारले.

" आंबट तोंड केलेली ! " कार्पोवनी उत्तर दिले.

क्लावाचे डोळे चमकले. " चला ! तिथेच दिसेल मी आंबट चेहऱ्याची आहे का कशी आहे ते. "

सहाव्या विभागात स्क्रेपर ड्रायव्हर वारा टाळून एका लाकडी बराकीत बसले होते. सोडलेले स्क्रेपर मातीच्या ढिगाऱ्यात उभे होते. त्या खळग्यातून चक्री वादळाने उठवलेले स्तंभ गरगरत पळत होते.

" तुम्ही जा स्क्रेपर ड्रायव्हरांकडे. काहीतरी कामासाठी आल्यासारखे करून मी मागून येईन. तेच जास्त बरं दिसेल. " क्लावा कार्पोवना म्हणाली.

" ठीक आहे! दहा मिनिटांनी ये. " कार्पोवनी संमती दिली.

कार्पोव बराकीत शिरले. भिंतीच्याकडेने धुळीने काळवंडलेले स्क्रेपर ड्रायव्हर उघड्या अंगांनी बसले होते. कार्पोव आत आले, तरी एकही जण हलला नाही. फक्त धिप्पाड शरीराच्या, कपाळाला आठ्या घातलेल्या वदोब्रोयेवने तिरक्या नजरेने कार्पोवकडे पाहिले कार्पोव यांच्या लक्षात आले की त्याच्या डोळ्याचा पांढरा भाग रक्तासारखा लाल झाला आहे. सगळ्या स्क्रेपर ड्रायव्हरांचे डोळे तसेच झाले होते.

" चष्मे घालून का काम करत नाही तुम्ही ? " कार्पोवनी विचारले.

" चष्म्याशिवाय एक रेघ दिसत नाही. " नखुषीनेच वदोब्रोयेवने उत्तर दिले. "पण मरू घातलेल्याला ॲस्पिरिन, तेवढाच उपयोग होतो आम्हाला चष्म्यांचा ! "

कार्पोवनी सिगरेट ओढायला सुरवात केली. ते खिडकीजवळ स्टुलावर जाऊन बसले. ते गप्प होते. सगळे स्क्रेपर ड्रायव्हरही गप्प होते.

" गप्प का राहिलात कॉम्रेड कार्पोव ! स्वतःची ड्यूटी नाही बजावलीत ! " अनपेक्षितपणे तांबूस चेहेऱ्याच्या, तरुण स्क्रेपर ड्रायव्हरने विचारले.

" कसली माझी ड्यूटी ! " शांतपणाने कार्पोवनी विचारले.

" आमची समजूत घालायची, प्रचार करायची, लोकांना शहाणं करायची ! आमच्यात प्रचार करायची काहीएक गरज नाही. तुमच्या इतकंच आम्हालाही कळतं. " रागारागाने तो ड्रायव्हर बोलला.

" असेलही ! " कार्पोवनी शांतपणाने उत्तर दिले.

" हवा इतकी उष्ण आहे, कशाने श्वासोच्छ्वास करायचा ! गरम वाफारा घेतल्यासारखं वाटतंय श्वास घेताना. " वदोब्रोयेव बोलला.

" मग काय ! हवा पाण्याबद्दलही बोलता येईल हवं तर ! " कार्पोवनी दुजोरा दिला.

पुन्हा सगळे गप्प झाले. कार्पोवना जाणवले, की नेहमी सारखे गंमतीदार बोलणे निरर्थक आहे. रखरखीत वाऱ्यामुळे लोक गळून गेले होते. ते अशा अवस्थेला येऊन पोचले होते, की जेव्हा लालसर चिकट धुके डोळ्यासमोर तरंगे, तेव्हा नुसते उठायलाच काय, पण वळून हात लांब करून पाण्याचे भांडे घ्यायलासुद्धा जड वाटावे.

" कॉम्रेड कार्पोव, आपल्याकडची एकादी लहानशी नदी नुसती बघायला मिळाली तरी मी माझं अर्धं आयुष्य द्यायला तयार आहे. त्यासाठी तिच्या काठावर जरा आडवा झालो असतो, पाणी प्यालो असतो. इतकं पाणी प्यालो असतो, की सगळं शरीर थंड व्हावं. आपल्याकडे नदीच्या पात्रात झरे असतात. स्वच्छ थंड पाणी ! वाहातंय नुसतं, वाहातंय ! " दृष्टी वर न उचलता तो तांबूस वर्णाचा स्क्रेपर ड्रायव्हर

बोलत होता.

" आणि तलावातलं पाणी ? मी स्वतः इलमेन तलावाकाठचा आहे. तुमच्याकडचं पाणी उग्र गंभीर असतं. पण आमच्या सरोवरातलं पाणी म्हणजे जसा चांदीचा रस ! वाळूचा तळ स्वच्छ, घट्ट असतो. " कार्पोव म्हणाले.

" आमची कूस्कॅमधली वनं तुमच्या सरोवरांपेक्षा काही कमी नसतात ! दवानं आच्छादलेल्या ओलसर वनातल्या रानटी बेरींच्या जाळ्यांमधनं जायचा प्रयत्न करा, भिजून चिंब व्हाल ! सगळे कपडे काढून पिळावे लागतील इतकं दव असतं ! " धुळीने निग्रोसारखा काळा पडलेला स्क्रेपर ड्रायव्हर कोपऱ्यातून आळसटपणे बोलत होता.

पुन्हा सगळे स्तब्ध झाले. कार्पोव उठले आणि म्हणाले.

" बराय तर ! तुम्ही घ्या विश्रांती. मी जातो. तुमच्या इथं आता मला काहीच करता येण्यासारखं नाही.

स्क्रेपर ड्रायव्हरनी चुळबूळ केली.

" तुम्हाला काय सांगायचं ? तुम्ही स्टालिनग्राडच्या लढाईत होतात. मॉस्कोचं रक्षण केलंत, बर्लिन घेतलंत, त्या वेळी काय करायचं ते तुम्हाला शिकवायला कुणीच आलं नव्हतं. तुम्ही स्वतःच सगळं जाणलंत, मरणाला भ्याला नाहीत ! आणि इथं सध्या तशीच आघाडी उघडलेली आहे. आणि मला वाटतं, जेव्हा आपल्याला आपण एकादं काम पुरं करू शकू असा विश्वास वाटत असेल तेव्हाच त्या कामाला हात घालावा. " कार्पोव म्हणाले.

" कॉम्रेड कार्पोव तुम्ही जरा सोपं करून सांगा. " वदोवोयेवने आगाऊ सूचना केली.

" मी असंच आपलं जाता जाता बोलतोय. तुमची परिस्थिती खरोखरच अगदी वेगळी आहे. या विभागातल्या इतका हा " आस्त्राखान " वारा इतर कुठेच तीव्र नाही. तुम्हाला नाही दोषी ठरवत त्याबद्दल. चूक झाली. माणूस दुबळा ठरला. पण त्या चुकीबद्दल तुम्हाला नाही जाब द्यावा लागणार ! आम्हाला जाब द्यावा लागेल !

" तुम्हाला का जाब द्यावा लागेल ? आणि कुणापुढे ? " तांबूस वर्णाच्या स्क्रेपर ड्रायव्हरने विचारले.

" आम्ही माणसांची पारख नीट केली नाही म्हणून. निष्कारणच त्यांच्याकडून फार अपेक्षा केली. आम्हांला जनतेपुढे जाब द्यावा लागेल. रखरखीत स्टेपमधे ज्यांचं पुनर्वसन केले आहे, आम्ही त्यांच्या खेड्यांपर्यंत पाणी कधी आणतो याची जे चातकासारखी वाट पहात आहेत त्यांच्यापुढं. नवा समुद्र त्यांच्या गावच्या वेशीला आम्ही कधी आणून भिडवतो याची वाट पहाणाऱ्या जनतेपुढे, त्या आतुर जनतेपुढं ! बरं ठीक आहे. बसा तुम्ही ! विश्रांती घ्या. " असे म्हणून कार्पोव जायला वळले.

त्यांनी दाराकडे जायला पाऊल उचललं, पण त्याचवेळी वाऱ्याच्या घोंघावण्यातून

ट्रॅक्टरच्या इंजिनाचा दमदार आवाज ऐकू येऊ लागला. उभ्या असलेल्या स्क्रेपरांच्या मधून एक ट्रॅक्टर कसा गेला आणि लगेच धुळीने भरलेल्या वाऱ्यात कसा गडप झाला ते कार्पोवनी खिडकीतून पाहिले.

" थांबा ! " वदोब्रोयेव ओरडला आणि त्याने उडी टाकली. " कोण आहे माझ्या स्क्रेपरवर ? "

सगळे स्क्रेपर ड्रायव्हर उड्या टाकून बाहेर आले.

" कुणीतरी मुलगी दिसतीय ! " तांबूस वर्णाचा स्क्रेपर ड्रायव्हर घाई घाईने तोंडावरचा घाम पुसत म्हणाला. " तुझं यंत्र बिघडून टाकील. "

पण वदोब्रोयेवने त्याचे बोलणे ऐकलेच नाही. त्याने बराकीबाहेर उडी टाकली. स्क्रेपरकडे पळता पळता काहीतरी ओरडला. पण तेवढ्यात जमीन सारखी करत स्क्रेपर दूर गेला. क्लावाचा लाल रुमाल मधेच दिसत होता, मधेच अदृश्य होत होता.

वदोब्रोयेवच्या मागोमाग सगळेच स्क्रेपर ड्रायव्हर पळत आले.

"ही क्लावा असणार. मला वाटलंच होतं ही काहीतरी पिल्लू सोडून देईल म्हणून !" असे बोलत कार्पोव हळूहळू बराकीतून बाहेर पडून भाजून काढणाऱ्या उन्हात आले.

कार्पोव तिथे पोचले तेव्हा रागाने लाल झालेली क्लावा वदोब्रोयेवचा हात घट्ट पकडून स्क्रेपर ड्रायव्हरांच्यामधे उभे राहून ओरडत होती.

" शीः ! हात उगारतोय ! मुलीवर हात उगारायला तुला शक्ती आहे आणि काम करायची वेळ आली, की तुझ्या अंगातली शक्ती जाते ! मी तुझ्यासाठी काय करू ? ऑरेंजची बाटली देऊ का तुला एकादी ? म्हणजे उन्हानं वितळणार नाहीस ! नाजूक बाई माझी ती !

कार्पोवनी मोठ्या मुष्किलीने ते तापत जाणारे भांडण मिटवले आणि क्लावाला बाजूला नेले. त्यांनी मागे वळून पाहिले. मातीच्या ढिगावर धुराळा उडायला लागला होता. सगळे स्क्रेपर कामाला लागले होते.

" माझी सगळी तयारी तू फुकट घालवलीस " विनोदाने कार्पोव म्हणाले. " लोकं तयार झाली होती. आणखी दोनचार शब्द बोललो असतो की कामाला लागले असते पण तू हा देखावा केलास. "

" याचा अर्थ तीन मिनिटे वाचवली मी ! तुम्ही तुमच्या परीनं काम केलंत, मी माझ्या परीनं ! " कुत्सितपणे हसून क्लावा म्हणाली.

वाटेत पाण्याचा टँकर लागला. कार्पोवनी तो थांबवला.

" कुठे नेताय पाणी ? पोटभर पाणी प्यायला हरकत नाही आता. " कार्पोव म्हणाले.

शोफरने उत्तर दिले, " सहाव्या विभागात नेतोय पाणी. पोटभर पाणी पिणारे काही तुम्ही पहिलेच नाही ! आत्तापर्यंत चाळीस जणांना वाटेत पाणी पाजलंय. जगात

कुठेच असं चवदार पाणी मिळायचं नाही.धरणाच्या दरवाज्यांच्या जागेवरच खडकातलं पाणी आहे हे."

क्लावाने डोळे मिटून पऱ्याच्या ग्लासातून हावरटासारखे पाणी प्यायले. क्लावाच्या अंगातून अद्भूत गारवा वाहू लागला. कार्पोव स्वतःशीच हसत क्लवाकडे पहात होते.

पहिल्याच जोमाने "आस्त्राखान" वारा वाहात होता. धूळ उडत होती. पांढऱ्या पडलेल्या आभाळातून ऊन सांडत होते. पण क्लावाने डोळे उघडले तेव्हा त्यात इतकी ओलसर चमक होती, की जणू आता तिथे रखरखाट नव्हताच !



क्रिवाया मूझ्गा स्टेशनवर म्हाताऱ्यांचा निरोप घेऊन लेन्या बोब्रोव कलाचला पोचला. त्सिमला धरणावर पाणी उपसण्यासाठी वापरलेल्या सक्शन ड्रेजवर त्याची नेमणूक झाली असल्याचे त्याला समजले. तो पुन्हा गाडीत बसला आणि मरोझोवस्काया खेड्यात गेला. तिथून नव्या रेल्वेलाईनवरून त्सिमला बांधकामापर्यंत गेला.

ही लाईन नुकतीच बांधली होती. सगळ्या वाटभर लेन्याने खिडकी सोडली नाही. तो सारखा चकित होत होता. नवनवीन गोष्टी दिसत होत्या. नेहमीपेक्षा अधिक लांबी असलेल्या आगगाड्यांचे त्याला नवल वाटत होते. त्या एक एक किलोमीटर किंवा त्याहूनही जास्त लांबीच्या होत्या. एवढ्या लांबलचक गाड्या पण त्यांना फक्त एकच वाफेचे इंजीन असायचे. ते पाहून तो चकित झाला. या शक्तिशाली वाफेच्या इंजिनांचे त्याला नवल वाटले. शिटी वाजताना बाहेर पडून आभाळाकडे जाणाऱ्या वाफेच्या झोतांवरून ती इंजिने किती दाबाने काम करत आहेत त्याचा अंदाज करता येत होता.

धुराळ्याने भरलेल्या आपल्या लहानशा खोलीत कंडक्टर लेन्याला माहिती देत होता. प्रकल्पावर सामग्री वाहून नेणाऱ्या वॅगन अखंडपणे जात राहाव्या म्हणून अशी योजना केली होती. डबल ट्रॅक्शनवर डबल इंजिने लागली असती आणि गाड्यांची संख्या निमपट झाली असती.

"चालक मंडळींना थोडी भीती वाटत होती. पण आम्ही धोका पत्करला. आणि आता तुम्ही पहातच आहात. आम्ही सुरक्षितपणे गाड्या नेतो आहोत. मॉस्कोच्या भुयारी रेल्वेप्रमाणे आमच्याही गाड्या साखळी पद्धतीने जातात."

गाडी जो जो डॉनच्या जवळ जाऊ लागली तो तो वरचेवर रुळांच्या कडेला लांब लांब लोखंडी पट्ट्या पडलेल्या आढळू लागल्या. वाळक्या गवतावर त्या पडलेल्या होत्या.

कंडक्टर पुन्हा लेन्याला समजावून सांगू लागला. धरणाच्या भिंतीच्या अलीकडे

खूप खोलवर टणक दगडाचा थर लागेपर्यंत डॉनच्या वालुकामय पात्रात या पट्टया ठोकण्यात येत आहेत. दोन पट्टयांच्यामधे बारीकशीही फट राहू नये आणि त्यातून पाणी झिरपू नये अशा तऱ्हेने या पट्टया ठोकण्यात येतात. अशा तऱ्हेने नदीच्या तळात पट्टयांची भिंतच उभी करतात. धरणाच्या भिंतीपासून भूमिगत पाण्याला दूर ठेवण्यासाठी हे केले जातेय.

हे ऐकून लेन्या चकित झाला. गाडी खंदकात शिरली. डॉनच्या दिशेने खाली उतरू लागली. आणि एका वळणापलीकडे अनपेक्षितपणे बांधकाम चित्रासारखे गरकन् फिरले. लेन्याने खिडकीच्या चौकटीला उत्तेजित होऊन घट्ट धरले. कुठे पाहावे तेच त्याला समजेना.

प्रथम त्याला असे भासले, की एकाद्या अद्‌भुत कथेतल्यासारखी हजारो यंत्रे आणि माणसे जमिनीच्या पोटात तिच्या मध्यबिंदूपर्यंत खोल भोक पाडताहेत.

सभोवतीची सगळी सृष्टी पातळ धुक्याच्या थराने झाकून टाकली होती. उंच वालुकामय बांध, धरणाचा सांगाडा, या धुक्यात घुसला होता. मोठाले नळ तिथपर्यंत आणले होते. आधारासाठी उभ्या असलेल्या खांबांच्या तिकाटण्यावर ते नळ सोंडा उंचावल्यासारखे दिसत होते. नळातून धरणावर गढूळ पाण्याचे फवारे उडत होते.

लेन्याला कळले, की हे सक्शन ड्रेज नळांनी धरणाचे शरीर घडवत आहेत. इथेच आपल्याला आता काम करायचे आहे.

धरणाच्या बांधकामावर शिंपलेले पाणी एकत्र जमून त्याची लहान लहान तळी जमत होती. वाळू तळात बसत होती. त्या तळयांमधून पाणी पुन्हा डॉनमधे टाकत होते. धरणावर यंत्रे उभी होती. ती बांध सारखा करत होती, दाबून टणक बनवत होती.

आणि पलीकडे नळ, मातीचे ढिगारे, फिकट हिरवटसर पाण्याचे पात्र यांच्याही पलिकडे धुळीचा ढग पसरला होता. वेल्डिंग करताना उडणाऱ्या निळसर ठिणग्या त्या ढगात चांदण्यांप्रमाणे चमकत होत्या. इतकेच नव्हे तर इथपर्यंत डॉनच्या या किनाऱ्यावरही कान बधिर करून टाकणारा बांधकामाचा प्रचंड आवाज तरंगत येऊन पोचत होता. लेन्या गाडीतून खाली उतरला तो कान अगदी बधिर होऊनच. आता कुठे जायचे ! रस्त्यांचे जाळे, मोठाली गुदामे, लोखंडी तुळया आणि लाकडी ओंडके, रेल्वेचे रूळ, कुंपणांचे खांब, ट्रॅक्टर, मालगाड्या, लोखंडी नळ, वाळूचे डोंगर, समुद्रातले गोटे या सगळ्या गुंत्यात फसणे अगदी शक्य होते.

कॉंक्रिटच्या पांढऱ्या धुळीने नखशिखान्त न्हालेल्या एका पॉइंटसमनने लेन्याला हाताला धरून एका आडव्या काळया नळाकडे आणले आणि म्हणाला.

" या नळाच्या कडेकडेने पहिल्या सकशन ड्रेजपर्यंत जा आणि पुन्हा तिथे विचार. " अशा तऱ्हेने लेन्या आपल्या सकशन ड्रेजवर येऊन पोचला. तिथे पुन्हा

चकित होण्याची त्याच्यावर वेळ आली सकशन ड्रेज विभागाचा प्रमुख म्हणजे एखादा वयस्क कॅप्टन असेल अशी लेन्याची अपेक्षा होती. पण सकशन ड्रेजचा प्रमुख हा एक सावळा, नाविकवेशातला अगदी तरुण निघाला. त्याचे नाव लिओनिद मात्वेइचुक.

मात्वेइचुकने त्याचे स्वागत केले. त्याला नीट न्याहाळून वर्तमानपत्राची गुंडाळी त्याच्या खांद्यावर मारत म्हणाला,

" छान झालं, तूही एक तरुणच आहेस. आमच्या इथे सकशन ड्रेजर तरुणांच्या कडे आहे. तेव्हा ओघानंच आलं की कामाचा उत्कृष्ट दर्जा सिद्ध करून दिला पाहिजे. कळलं ? "

" कळलं ! " लेन्याने मान्य केले.

" आव्हानाचं निशाण आपल्या केबिनमधे खडे आहे. ते तिथे ताठ मानेनं उभं आहे. बांधकाम संपेपर्यंत ते दुसऱ्या कुठच्याही विभागाकडे जाता कामा नये हे पण लक्षात ठेवायला हवं. कळलं ? "

" कळलं ! " लेन्याने पुन्हा मान्यता दिली.

" तुम्हाला आश्चर्य वाटत असेल नाही ? की मी खलाशी असून नदीच्या सकशन ड्रेजवर काम कसं करतोय ? " मात्वेइचुकने विचारले.

" तसं नाही, तसं नाही !" लेन्याने चाचरत उत्तर दिले. "त्यात आश्चर्य वाटण्या-सारखं काय आहे कॉम्रेड ? "

" मला दिसतंय तुम्हाला नवल वाटतंय ते. म्हणून खुलासा करतो. मी खलाशी आहे. पण स्वयंस्फूर्तीने इथं काम करायला आलो आहे. काम संपलं, की पुन्हा समुद्रा-वर जाईनच. कळलं ? "

" कळलं ! " लेन्याने तिसऱ्यांदा मान्य केले.

" आता जेवायला जा. मटनाचे तुकडे घातलेले बोर्शसूप आणि तळलेले सुदाक मासे आहेत जेवायला आज. जेवण झाल्यावर आरूतुन्यानकडे जा तो तुम्हाला कामाला लावील. कळलं ? "

" कळलं ! " लेन्याने चवथ्यांदा आणि शेवटचे उत्तर दिले.

त्याच घडीपासून काम सुरू झालं.

स्वतः खणलेल्या खड्डयातल्या डॉनच्या गढूळ पाण्यात सकशन ड्रेज उभा होता. आणि नदीच्या तळातून पाणी मिश्रित वाळूचा लगदा तीन किलोमीटरवरच्या धरणा-वर हलवत होता.

धरणावर एक निरीक्षक बसलेला होता. आणि वेळोवेळी टेलिफोनवरून लगदा कसा येतोय याबद्दल सकशन ड्रेजवर कळवत होता.

एक तासानंतर लेन्याला आरूतुन्याकडून कळले की सकशन ड्रेजमधून तासाला तीनशे क्यूबिक मीटर वाळू सर्वसाधारण निघते. पण प्रत्यक्षात मात्र हे सकशन ड्रेज

दीडपट जास्त वाळू काढते आहे. या सकशन ड्रेजने सहा हजार माणसांची जागा घेतली आहे.

नीपर डॅमच्या बांधकामाच्या वेळेला होते तसले तासाला फक्त शंभर क्यूबिक मीटर माल काढणारे नाहीत हे सकशन ड्रेजर! लेन्याला लगेच या आपल्या यंत्राबद्दल आपुलकी वाटू लागली. आता त्याला वोल्गावरच्या प्रचंड सकशन ड्रेजवर काम करणाऱ्या कॉम्रेडसचा मुळीसुद्धा हेवा वाटेना. तो सकशन ड्रेज इतका शक्तिमान आहे की तो तासाला एक हजार दोनशे क्यूबिक मीटर माल काढतो आणि २० हजार माणसांची जागा घेतो.

ओकून आणि सुदाक यांच्यापेक्षा योर्श मासा आकाराने लहान असला तरी तो सुद्धा लढणाराच मासा असे आरुतुन्यान म्हणाला तेव्हा ते लेन्याला पूर्ण पटले.



मात्वेइचुकने लेन्याला काढलेल्या वाळूवर लक्ष ठेवायला पाठवले. धरणाच्या विशालतेची लेन्याला आता सवय झाली होती. डॉनच्या एका किनाऱ्यापासून दुसऱ्या किनाऱ्यापर्यंत ते पोचले होते. धरणाचा बराचसा भाग बांधून पुरा झाला होता. आता त्याने त्याची पूर्ण उंची गाठली होती. आणि कुठे कुठे वरचा कॉंक्रिटच्या फरशांचा थर बसवायलाही सुरुवात झाली होती.

मातीच्या धरणाचा मधला चाळीस मीटर उंच आणि ५० मीटर लांब भाग कॉंक्रिटने जोडलेला होता. तो भीमकाय आकार पायाच्या खळग्यात करड्या हत्ती-सारखा दिसत होता.

धरणावर काम करताना लेन्याचे मन फार हळूवार बनले होते. त्याला सारखे वाटायचे की आपला सकशन ड्रेज सर्व सामर्थ्यानिशी आपले काम करत नाही. आपले संपूर्ण "जीवन अर्पण" करत नाही. पण ते खरं नव्हतं. कारण त्याच वेळी सगळे हिशेब बाजूला सारून धरणाची उंची दिवसाला पन्नास साठ सेंटिमीटर वाढत होती —नेहमीच्या दिवसाला तीस सेंटिमीटर या प्रमाणाहून अधिक!

या सकशन ड्रेजला स्वतःचा शौर्यशाली इतिहास होता. लेन्याला त्याच्या तरुण वयाला अनुसरून आपण फार उशिरा, काम संपण्याच्या वेळेला इथे आलो याचे वाईट वाटत होते. बांधकामावरच्या हिवाळ्यातल्या धावपळीमध्ये आपल्याला भाग घ्यायला मिळाला नाही, वसंतातला डॉनचा पूर आपल्या पाहायला मिळाला नाही, याचे त्याला वाईट वाटले. लोक सांगत होते, की डॉन सैतानासारखी झाली होती. पाणी वेड्यासारखे वेगाने धावत होते. नव्या बंधाऱ्यांनी आणि पंपिंग स्टेशनांनी धरण वाचवले. धरण वाचवणे हे त्यावेळी एकच एक तातडीचे काम होते.

हिवाळ्यात असली तातडीची कामे निघाली नव्हती. पण मात्वेइचुकच्या मते

" काम " एकूण कठीणच होते.

हिवाळ्यात बर्फ फोडणाऱ्या यंत्रांप्रमाणे सकशन ड्रेजही बर्फ फोडायचे काम करायचा आणि अखंडपणे वाळू काढण्याचे काम करायचा. उन्हाळ्यात हे काम अधून मधून थांबले तरी एक वेळ चालण्यासारखे होते. पण हिवाळ्यात थांबण्याचा विचारसुद्धा करणे शक्य नव्हते. कडाक्याची थंडी होती. काही मिनिटे जरी यंत्र थांबले असते तरी त्या लांबलचक नळातून वाहाणारा पाणी मिश्रित वाळूचा लगदा क्षणात गोठून त्याचा दगड झाला असता. त्याचप्रमाणे धरणाच्या भिंतीवरचा नुकताच पसरलेला कॉंक्रिटचा थरही बर्फ बनून गेला असता. हे घडू देणे शक्यच नव्हते. म्हणून सगळे अडथळे विचारात घेऊन सकशन ड्रेजरवरच्या नोकरवर्गाने यंत्र क्रोनोमीटर-प्रमाणे नियमित चालावे अशी व्यवस्था अस्तित्वात आणली होती.

रात्र अंधारी आणि तुफान वाऱ्याची असायची. कधी स्टेपमधून भुसभुशीत बर्फाची भिंतच भिंत सरकत यायची तर कधी बोचरे बर्फाचे छरे! काळे ढग इतके खाली उतरायचे की माती खणणाऱ्या यंत्रांचे दांडेसुद्धा काही काळ झाकून जायचे. आधीच लहान दिवस! त्यातून तोही बर्फाच्या बुरबुरीने धुसर व्हायचा. मातीत मिसळलेले काळपट बर्फ जमिनीवर, कॉंक्रिटच्या आवाढव्य आकृतीवर, यंत्रांवर डॉनच्या किनाऱ्या-वर उदासपणे पसरलेले असायचे. या बर्फाखालून मधून मधून कुठे कुठे झुडपे डोकावायची.

सांगण्याचे तात्पर्य काय, तर हिवाळा काही सोपा गेला नव्हता. विशेषतः हिवाळ्या-तल्या रात्री! पण जेव्हा बर्फ वितळायला लागते आणि पायाखालची, यंत्रांच्याखालची जमीन पातळ डिंक पसरल्यासारखी निसरडी होते तो वसंतऋतूचा काळ फार कठीण होता.

आणि उन्हाळ्यातला दिवस तर फारच भयानक! एक दिवस डॉनच्या वरच्या बाजूने जोरदार वाऱ्याला सुरुवात झाली. पाहता पाहता त्याने सबंध बांधकामाच्या जागेवर धुळीचे स्तंभच्या स्तंभ उठवले. आणि गरगर फिरवत ती धूळ माळावर वाहून नेली, लोकांच्या डोळ्यात फेकण्यासाठी ड्रायव्हरांना आंधळे करण्यासाठी, गवतामधे पिंगा घालण्यासाठी, रस्त्यावर उधळण्यासाठी!

संध्याकाळच्या सुमाराला वाऱ्याचा जोर आणखीनच वाढला. डॉनवर भिंतीएवढ्या फेसाळ लाटा धावत होत्या. रात्री तर वाऱ्याचे नुसते झोत वाहात नव्हते, तर एकदा मोठा जोरदार प्रवाहच येऊन आदळावा तसा तो वाहात होता.



रात्री लेन्या ड्यूटीवर होता. दोर करकरत होते. होडीच्या सभोवती लाटा घुमत होत्या. मधून मधून वारा रानटी श्वापदासारखा क्रूरपणाने असा हल्ला करत होता की

पायांवर उभे राहण्यासाठी कठड्याला घट्ट धरून उभे राहावे लागत होते.

बांधकामावरच्या आणि नोवोरोसिइस्कामधल्या दिव्यांची प्रतिबिंबे पाण्यावरच्या तरंगत्या सिग्नल लाईटसारखी दिसत होती. डॉनवर अनिर्बंधपणे संचार करता यावा आणि स्टेपवर आपले अधिपत्य प्रस्थापित करावे यासाठी या वाऱ्याला मोठी झेप घेऊन इथले सगळे मातीचे ढिगारे आकाशात उधळून लावायचे होते आणि सगळे दिवे विझवून टाकायचे होते की काय असे वाटत होते.

पण दिवे विझले नाहीत, त्यांनी वाऱ्याशी सामना दिला. वाऱ्याचे घोघावणे बांधकामाचा आवाज बंद पाडू शकले नाही. मोटारींच्या कण्यांचे आवाज सकशन ड्रेजपर्यंत ऐकू येत होते आणि जणु सांगत होते की असल्या भयानक हवेच्या रात्रीही यंत्रे अविरत काम करत आहेत. कितीही भयंकर धुळीचे वादळ कॉंक्रिटचा अखंड प्रवाह थांबवू शकले नाही.

नंतर वाऱ्याचा आवाज आणि किनाऱ्यावरच्या यंत्रांचा अखंड एकसुरी आवाज यात एक नवाच सूर येऊन मिसळला. लेन्या कान देऊन ऐकू लागला. जिथे तराफ्यावर नळ घातलेले होते तिथून सूऽऽऽ असा आवाज येत होता.

लेन्याने माल्वेइचुककडे धाव घेतली. एका मिनिटातच आवाजाचे मूळ सापडले. लाटा तराफे हालवत होत्या त्यामुळे नळांमधला सांधा निखळला होता. त्यातून वाळू आणि मातीचे कारंजे उडत होते. किनाऱ्याजवळ जादा नळ होते. खराब झालेल्यांच्या जागी नवे नळ घालायला हवे होते. लेन्यासह आरूतुन्यानने अंधारातच होडीत उडी टाकली. ती आवाज न करता हेलकावत होती आणि सकशन ड्रेजच्या बाजूवर चिकटत होती.

लाटेने लेन्याच्या हातातले वल्हे खाली खेचले. लेन्याने सगळी शक्ती लावून कुंथत वल्हे मागे खेचले. एक सेकंदसुद्धा थांबता उपयोगी नव्हते. नाहीतर वाऱ्याने होडी डॉनच्या प्रवाहाबरोबर वाहून नेली असती.

पण पुढचेच काम सर्वांत अधिक कठीण ठरले. आरूतुन्यान आणि लेन्या यांनी नवे नळ घेतलेला तराफा नांगरला. आता तो टग बोटीने सकशन ड्रेजकडे ओढून नेणे भाग होते.

वारा अगदी वेडापिसा झाला होता. वाऱ्याचे झोतचे झोत पाठीवर आदळत होते. आरूतुन्यान आणि लेन्याने जोरात वल्ही मारली. तळ हाताची कातडी सोलून निघाली होती. मदतीला दुसरी होडी आली. नवे नळ बसवले. थोडी झटापट केल्यावर वाळूपाण्याचा लगदा पुन्हा उतरत्या किनाऱ्यावरून अंधारात गडप झालेल्या धरणाकडे वाहून नेला जाऊ लागला.

माल्वेइचुकने लेन्याच्या खांद्यावर थोपटले.

" या सत्कृत्याचे प्रमाणपत्र मिळेल तुला. कळलं ! "

"कळलं!" ओला झालेला चेहेरा बाहीने पुसत लेन्याने उत्तर दिले.

कपडे वाळवण्यासाठी लेन्या खलाशांच्या खोलीत गेला. आता घडलेली घटना कुणालातरी सांगावी असे त्याला फार फार वाटत होते. पण त्यात त्याला यश आले नाही. खलाशाच्या खोलीत कुणीही नव्हते. फक्त एक डोळे दिपवणारा झगझगीत दिवा तेवत होता. त्याच्या प्रकाशाने भिंतीवरचा गॉर्कींचा फोटो उजळून निघाला होता.

वाळवण्यासाठी तो बूट काढू लागला आणि तो एकदम गोंधळला. फोटोतल्या लेखकाचे किंचित आकुंचित झालेले हसरे डोळे त्याच्याकडे रोखून पाहात होते.

लेन्याने काढलेले बूट नकळत पायाने कॉटखाली सारले आणि पायावर पाय चढवून बसला. त्याला जणू संथ स्वर ऐकू आला,

"पोरा, गोंधळलाहेस का इतका? फारच छान काम केलं आहेस तू! हात कॅर-बॉलिक साबणाने धुतले पाहिजेत आणि त्याला बँटेज बांधलं पाहिजे."

"हो बांधीन, शप्पत बांधीन!" पेंगुळलेल्या लेन्याने भीतभीत उत्तर दिले.

वारा इतक्या जोराने आदळत होता, की सगळे सकशन ड्रेज हालत होते, करकरत होते. अंधारात कुठे तरी तरंगत होते. नांगराच्या साखळ दंडाच्या खळखळीचे रूपांतर पदरवात झाले.

आरूतुन्यान खलाशांचा खोलीत आला तेव्हा लेन्या कॉटवर पाय पोटाशी घेऊन बसल्या बसल्याच झोपी गेला होता.

आरूतुन्यातने लेन्याला जागे केले, सरळ झोपायला लावले, जाकीट लेन्याच्या अंगावर पांघरले आणि तो निघून गेला. इलेक्ट्रिकचा झगझगीत दिवा पूर्वीसारखाच जळत होता. आपल्या प्रकाशाने गॉर्कींचा फोटो आणि सकशन ड्रेजचा नकाशा उजळून टाकत होता.



# १७

शिखराखालच्या बोगद्याच्या बांधकामाबद्दल रिपोर्ट करण्यासाठी सारायेव बासार्गिन यांच्याकडे कलाचला आले होते. डॉनचे पाणी शेतीला पाणी पुरवणाऱ्या कालव्यात ओतण्यासाठी हे बोगदे तयार केले होते.

बांधायच्या चार बोगद्यांपैकी पहिल्या बोगद्याचे काम चालू होते. हे बांधकाम वेगाने चालू होते. सगळ्या बांधकामाच्या वेगापेक्षा या बांधकामाचा वेग मुळीच कमी नव्हता! पण बोगद्याच्या खोदलेल्या भागात अचानक एक तात्पुरता अडथळा उभा राहिला. खणणारे यंत्र पिठासारख्या वाळूवर अडखळले. टणक चिकट मातीच्या थराच्या कपच्या काढण्याचे काम ते यंत्र करत होते. पण त्याचे काम अडवायला हा वाळूचा थर पुरेसा होता.

पिठासारखी वाळू पाण्याप्रमाणे ट्रॉलीच्या फटीमधून गळून जात होती. त्यामुळे कपच्या गोळा करायचे आणि वर न्यायचे काम थांबल्यासारखेच झाले. या अनपेक्षित अडथळ्यातून बाहेर पडण्यासाठी कुठली तरी दुसरी कामाची पद्धत शोधून काढायला हवी होती. ती वाळू स्वतः एकदा बघून या धोकेबाज वाळूचे काय करायचे ते तिथले इंजिनियर आणि खोदकाम करणारे कामगार यांच्याबरोबर चर्चा करून ठरवण्यासाठी बासार्गिननी बोगद्याच्या बांधकामावर स्वतः जायचे ठरवले.

पण सारायेव यांच्याबरोबरच्या बोलण्यानंतर बासार्गिन लगेच बाहेर पडू शकले नाहीत. सारायेवना दुसऱ्या दिवसापर्यंत त्यांची वाट पाहात थांबावे लागले.

सारायेव प्रकल्पाच्या ऑफिसात वाट पाहात थांबलेले असताना माझी त्यांच्याशी

गाठ पडली. क्रूर, बोचरा वारा व्हरांड्यात संचार करत होता. कधी जाड पडद्यात शिरून शिडाप्रमाणे फुगवत होता, तर कधी बाहेर ओढून फडफडवत होता. अशावेळी ती इमारत असंख्य निशाणे लावलेल्या जहाजाप्रमाणे दिसायची, नंतर क्षणात ती निशाणे अदृश्य व्हायची. सगळे पडदे गरम हवेच्या झोताने आत ढकलले जायचे.

" मी तुमच्याकडे यायच्या विचारात आहे. मी सारायेवना म्हणालो.

" फारच छान ! मी उद्या बासार्गिनच्या गाडीतून तिकडे येतोय. त्यामुळे आज गाडी पूर्णपणाने तुमच्या दिमतीला आहे. उन्हाला घाबरत नसाल तर एक तासाने तुम्ही निघू शकाल, " सारायेव म्हणाले.

या प्रवासातल्या त्रासाची काहीच कल्पना नसल्याने मी होकार दिला.

गाडी तापलेल्या स्टेपप्रदेशातून एखाद्या प्रचंड भट्टीतून जावे तशी जात होती. या भट्टीची वरची बाजू आकाशाने बनलेली होती आणि तळ उन्हाने भेगाळलेल्या तप्त जमिनीचा होता. गाडीचं स्टियरिंग व्हील हात लावला तर भाजेल एवढे तापलेले होते. धुळीपासून बचाव करण्यासाठी गाडीला प्लायवूडचे वेष्टण केलेले होते. त्यामुळे आत भलतेच गरम होत होते. त्याचवेळी पेट्रोलच्या उग्र वासाने आतली हवा भरून गेली होती.

मी गाडीचे दार उघडले आणि आपटू नये म्हणून पाय लावून उघडे ठेवले. दाराच्या रेट्याने पाय लगेच थकला. आणि दुखायला लागला. प्रत्येकवेळी दुसरी गाडी आली की गरम धुळीने गुदमरू नये म्हणून दार बंद करावे लागत होते. हा धुळीचा लोट एकाद्या एकसंध तांबूस भिंतीसारखा चाल करून यायचा. आणि खूप वेळ टिकून राह्यचा. धुळीच्या पट्ट्यातून लवकर पार होण्यासाठी स्तेपान तिमोफेयेविच ड्रायव्हरने गाडीला वेड्यासारखा वेग दिला.

सगळ्या स्टेपप्रदेशाला धूसर क्षितिज रेषेवर धुळीच्या दुतोंडी जिभा फुटल्यासारख्या दिसत होत्या. क्वचित जेव्हा धुळीचा पडदा बाजूला व्हायचा तेव्हा दूर डॉनचे पात्र दिसायचे.

रस्त्याच्या दोन्ही बाजूना एकटदुकट उगवलेले एकाद दुसरे सूर्यफूल धुळीने माखून करडे दिसत होते. करडा रंग चढलेली माणसं, घोडे, गाड्या मधून मधून दिसायच्या आणि लगेच धुळीच्या पडद्याने झाकून जायच्या.

"इथे बाजूला एक लहानसं खेडं आहे. तिथं जरा जाऊ आणि थोडा श्वास टाकू." स्तेपान तिमोफेयेविच म्हणाले. ते प्रौढ वयाचे होते आणि मोठा चांगला माणूस होता !

गाडी मोठ्या रस्त्यावरून खेड्याकडे जाणाऱ्या रस्त्यावर आली. पांढरा पांढरा सूर्य डोक्यावर तळपत होता आणि निर्विकारपणे जमिनीला भाजून काढत होता. पण धुराळ्यापासून सुटका झाल्यामुळे गरम वारासुद्धा स्वच्छ झाल्यासारखा वाटू लागला.

खेडे खरोखरीच एका दरीच्या वाकणात दडलेले होते. घरांजवळ उष्णतेमुळे मरगळलेल्या बागा होत्या. पण तरीही त्यांची सावली सुखकारक वाटत होती. दरीच्या तळातून एक ओढा वाहात होता तो एका लहानशा बांधाने आडवला होता. त्यामुळे तिथे एक लांबट चिंचोळे भरलेले तळे झाले होते. त्याचे पाणी पाणवनस्पतींमुळे हिरवट दिसत होते. पण झुडुपात बदके पोहत होती. आणि ताजेतवाने होण्यासाठी आपल्या माना तळ्याच्या कोमट पाण्यात बुडवून बसत होती.

ऊन उतरेपर्यंत या खेड्यातच थांबायचे मी आणि स्तेपानने ठरवले. स्तेपान तिमोफेयेविचने गाडी बाभळीच्या विरळ छायेत उभी केली. ताबडतोब शेजारच्या कुंपणाजवळ मुले गोळा झाली.

"बघ, बघ गाडी नव्या तऱ्हेची दिसतेय."

गाडी ऑरेंज रंगाची होती हीच तिची नवलाई होती. तिच्या रंगावर धुळीची इतकी पुटे चढली होती की तिचा रंग ऑरेंज ऐवजी गढूळ गुलाबी दिसत होता.

या रंगामुळे ड्रायव्हर या गाडीला "कोलंबिना" म्हणतात. डोक्यानं शोधून काढलंय त्यांनी हे टोपण नाव! हुशार आहेत बेटे! आणि आमची ही "कोलंबिना" कसलीही दुरुस्ती न लागता ९०० शे किलोमीटर पळाली. तीही या असल्या रस्त्याला. फार सोशिक आहे ही गाडी. बाकीच्या सगळ्या लहरी आणि हट्टी आहेत. आपलेच नखरे दाखवतात. पण माझी गाडी तशी नाही. मुळीच त्यातली नाही. फार प्रेमळ आहे ती!" स्तेपान सांगत होता.

मुले आमच्या गाडीकडे आणि आमच्याकडे टक लावून पहात होती. पण तळ्यात कपडे धुणाऱ्या दोन मुलींनी वळूनसुद्धा पाहिलं नाही. लाकडी बांगड्या घातलेले कोपरापर्यंत उघडे असलेले त्यांचे ओले हात तालात वरखाली होत होते आणि उन्हात चमकत होते.

गंभीर चेहेऱ्याचे आणि पिकलेल्या मिश्यांचे सामुदायिक शेताचे अध्यक्ष आमच्या पाशी आले आणि त्यांनी आम्हाला आपल्या झोपडीत नेले. तिथे स्वच्छ आणि थंड वाटत होते. खिडकीत ओलसर हिरव्या रंगाच्या बुंध्याचे बाल्झामिनचे झाड उभे होते, त्याच्याकडे पाहिल्याबरोबर पाणी प्यावेसे वाटू लागले.

"डॉनचं पाणी तुमच्यापर्यंत येणार आहे का?" मी अध्यक्षांना विचारले.

"आमच्यापर्यंत येणार म्हणजे काय, येणारच, आम्ही कधीची वाट पाहातोय!" त्यांनी उत्तर दिले.

"त्यानंतर तुम्ही सगळं बदलून टाकणार काय?" स्तेपान तिमोफेयेविचने विचारले.

"आम्हाला न बदलून कसं चालेल? आमच्याकडे सगळी आखणी अशी झाली आहे की एका गाण्यात म्हटलं आहे ना, तसं होईल, "हरित स्वर्णभूमी, साक्षात

हरित स्वर्गभूमी " कुठल्याही विमानातनं दिसणारसुद्धा नाही इतकं आमचं गाव आत्ता लहान आहे. पण नंतर ते बहरेल."

त्याच वेळी तळयावर कपडे धुणाऱ्या मुलींपैकी एकजण खोलीत आली. तिने ओले कपडे दांडक्यावरून आणले होते. ते लाकडी टबात ठेवले. नंतर तिने पालथ्या हाताने चेहेऱ्यावरचा घाम पुसला, केस सारखे केले आणि नंतरच आम्हाला अभिवादन केले.

"माझी मुलगी. शेजारच्या खेडयात शिकवते आणि अर्थातच उन्हाळयात माझ्या जवळ राहते." अध्यक्षांनी ओळख करून दिली.

मुलगी उघडया खिडकीपाशी बसली आणि तिने रुमालाने वारा घ्यायला सुरुवात केली.

"हूऽऽश्श! भयंकर उकडतंय. आमच्या खेडयापर्यंत कधी समुद्र आणताय?" तिने विचारले.

ती हसली तेव्हा तिचे ओलसर ओठ सावळया चेहेऱ्यावर चमकले. मुलीच्या मागचे बाल्झामिनचे झाड वाऱ्याच्या झुळकीने थरथरले.

"आमच्या नव्या जीवनासाठी आम्ही कशी तयारी करतो आहोत याबद्दल आमच्याकडे येणाऱ्यांना फार कुतूहल असतं. मग का नाही सांगायचं त्यांना त्याबद्दल? तो प्लॅन दे मला. कपाटाच्या खणात आहे. वरच्या कप्प्यात तुझ्या शालीखाली!" मुलीचे वडील म्हणाले.

मुलगी शेजारच्या खोलीत जाण्यासाठी उठली. कोरडया स्वच्छ जमिनीवर उन्हाचा पट्टा पडला होता. त्या उन्हाच्या पट्टयात तांबूस करडया तोंडाचे एक कुत्रे माशा उडवण्यासाठी कातडी हलवत पेंगळून पडले होते. त्याला उन्हाळयाचा त्रास होतोय असे वाटत होते. पण खरे म्हणजे त्याला आळशीपणानेच उठायचे नव्हते.

कपाटावर निळया फुलदाणीत कविलची फुले ठेवलेली होती. वाळक्या बांबूच्या फ्रेममध्ये घातलेला अध्यक्षांच्या मुलीचा सैनिकी वेशातील फोटो फुलदाणीला टेकून ठेवलेला होता.

शेजारच्या खोलीच्या सजावटीत चटकन् लक्षात न येणारे पण काहीसे सागरी वातावरणाशी मिळते जुळते असे वैशिष्टय होते. मी बारीक नजरेने पाहिले आणि मला भिंतीवर लढाऊ जहाजाचा फोटो दिसला. ते अध्यक्षांच्या लक्षात आले आणि त्यांनी खुलासा केला,

हे "मरात" आहे. सुप्रसिद्ध लढाऊ जहाज. माझा मुलगा त्याच्यावर कामाला होता. ए पोरांनो! अनपेक्षितपणे ते ओरडले. "पळा इथून! माणसं पाहिली नाहीत का कधी? आणि काय रे, शाळेत जाणारी मुलं आहात की नाही तुम्ही?"

लगेच खिडकीच्याबाहेरून घाईघाईने जाणाऱ्या अनवाणी पावलांचा आवाज ऐकू

आला आणि जवळच, घराच्या कोपऱ्याशी तो शांत झाला.

मुलीने चतकोर घडी घातलेला प्लॅन आणला आणि तो उघडून टेबलावर ठेवला.

" या इथं टेबलावर आमचा भविष्यकाळ तुमच्या पुढे ठेवलाय. तो कसा असेल हे कृपाकरून लक्षपूर्वक पाहा. इथे या दरीच्या आमच्या बाजूच्या उतारावर द्राक्षाचे मळे असतील. काबेर्न जातीचे. दारू करण्याचा आणि बेदाणे करण्याचा विचार आहे आमचा. या इथे सामुदायिकाच्या शेताचा जंगलाचा पट्टा असेल आणि त्याच्या पलीकडे अर्थातच गहू असेल. पाणी असल्यावर आमच्याकडे चांगलाच गहू पिकला पाहिजे. टप्पोरा सोनेरी दाणा आणि सुरेख रंग ! गव्हाच्या शेतावरून वारा वाहू लागला की कणसं सळसळतील, लाटा उठतील आणि तिथून हलू नयेसं वाटेल. उभं राहून नुसतं पाहात राहावंसं वाटेल ! या इथे खोलगट भाग आहे. पाहिलंत ? तिथे पाणी साठवणं सोपं जाईल. इथे तांदूळ होईल. जो तांदूळ आमचे वाडवडील हातावर घेऊन निरखायचे आणि माना हलवत आश्चर्याने विचारायचे, " काय हो हे ? काय करतात याचं ? " तोच तांदूळ आता आम्ही पेरणार ! पाण्यावर ! शिवाय या पडणाऱ्या बारीकशा धारेच्या जागी ३० हेक्टरचं स्वच्छ गोड्या पाण्याचं तळं निर्माण होईल. मासेमारी-साठी तळं. कार्प, लीन, कारास ओकून मासे इतके पिकवू, की फक्त या एका तळ्यातून दिवसाला पाच किंवा त्याहूनही अधिक रूबलची रोजच्या उत्पान्नात वाढ होईल. "

" माझ्या बाबांचा हा सर्वांत आवडता विषय आहे, " मुलगी म्हणाली. " मी शाळेत शिकवते आणि शेतात मी फळबागा पसंत करते. "

" होतील हं तुझ्यासाठी फळबागा ! " अध्यक्ष म्हणाले. " एवढंच नाही, तर फळं हवाबंद करायचा कारखानाही होईल. सफरचंद आणि प्लीवाचा जाम बनवू. काळ्या पांढऱ्या चेरींचा तर समुद्र फुलेल आमच्याकडे ! परसबागांबद्दल तर मी काहीच बोलत नाही. ते प्रत्येकाच्या इच्छेवर राहील. नव्या पालेभाज्या पिकवू. जमिनीला एकदा पाणी आलं की मनात येईल ते करू शकू आम्ही. जमिनीला तुम्ही फक्त पाणी पाजा, ती तुम्हाला शंभर पट परत देईल. ती तुमचं ऋण फेडून टाकते. तुम्हाला पोसते. सांगायचं काय, तर ती कितीतरी काळ तहानलेली आहे ! "

" आणि समुद्राबद्दल तर तुम्ही साफच विसरलात जसे काही, बाबा ! " मुलगी म्हणाली. " या खिडकीतून समुद्र दिसेल. त्याऽऽ तिथे. निळा, निळा ! सदोदित समुद्रावरून वारा येत राहील. गारवा आणील. विश्वासच बसत नाही याच्यावर ! जागं होऊन पहाल तर समुद्रावर लाटा खेळताहेत, शांत धुकं पसरलं आहे. त्या धुक्यातून बोट पुढं पुढं येतेय, मॉस्कोहून डॉनवरच्या रोस्तोवला जातेय. समुद्रपक्षी तिच्यामागून उडताहेत. "

" ज्याला जे हवं तसं त्यानं पहावं " अध्यक्ष म्हणाले " सामुदायिक शेताची संपत्ती पूर्णपणे वाढवू. पण या कामाला दूरदृष्टी हवी. म्हणून मी आता जातो. माफ करा

कसली तरी काळजी आणि अन्न याशिवाय माणूस जगू शकणार नाही. वार्या, तू पाहुण्याना चहापाणी दे."

चहाबरोबर सुकवलेली सफरचंदे होती. चहाचा आस्वाद घेत आम्ही खूप वेळ चहापान केले. पाणबदके व्हरांड्याच्या गारव्याला आली, पाळीपाळीने घरात डोकावली आणि असंतुष्टपणे कलकलत राहिली.

बासार्गिन आणि सरायेव आम्हाला या लहानशा खेड्यात गाठतील असे मला आणि स्टेपनला वाटले होते. पण ते काही आले नाहीत. तेव्हा आम्ही पुढे जायचे ठरवले.

संध्याकाळी जेव्हा जरा गार व्हायला लागले तेव्हाच आम्ही निघालो. तांबड्या रंगाचा सूर्य क्षितिजावर तरंगत होता. पण उन्हाने हुळहुळया झालेल्या कातडीला त्याची उष्णता दुपारच्या उन्हाइतकी जाणवत होती. सूर्य मावळून गेल्यावर जरा हायसं वाटले. स्टेपवर कुठूनतरी संध्याकाळची निळसर हवा झिरपू लागली. थोड्याच वेळात त्या हवेने आसमंत भरून गेला आणि टेकड्यांची टोके हळूहळू अंधारात बुडू लागली.

उत्तररात्री गाडी पाणथळीत शिरली. बल्शाया मार्तिनोवका मधल्या वस्तीवरच्या काळसर दिसणाऱ्या बागांच्या गारव्यात शिरली. या वस्तीत सारायेव यांचे ऑफिस होते. बडा कालवा आणि बोगदे यांच्या बांधकामाचे ऑफिस होते.

तासाभराने मी एका लहानशा लॉजमधल्या खोलीत घडीच्या कॉटवर पडून माझ्या खोलीतला शेजारी कावेरिनचे "दोन कप्तान" स्वतःशीच मोठ्याने वाचत होता ते ऐकत होतो.

दूरवर माळावर कसला तरी हलता गूढ प्रकाश लुकलुकत होता. इलेक्ट्रिकच्या दिव्यांच्या चांदण्या होत्या की कोरड्या वादळी विजा चमकत होत्या कोण जाणे.



# १८

लाल निशाणे डोक्यावर घेतलेले, एकमेकांपासून फार दूर नसलेले उघडया बोडक्या स्टेपमधले मनोरे जवळच्या टेकडीवरून स्पष्ट दिसत होते. ते मनोरे बांधकाम सुरू असलेल्या बोगद्यावरचे होते. त्यांनी मैलांच्या दगडाप्रमाणे जमिनीखालून वाहणाऱ्या चार नद्यांचा मार्ग दाखवला जात होता.

यातील प्रत्येक नदी सहा किलोमीटर लांबीची होती. त्या सगळ्यानी मिळून सेकंदाला २४० क्यूबिक मीटर पाणी वाहून न्यायचे होते. उन्हाळयात डॉन जेवढे पाणी वाहून नेते त्यापेक्षा दीडपट जास्त. हे पाणी बडया कालव्यातून शेतीला पाणी देणाऱ्या कालव्यात जाईल.

बासार्गिननी मिनिटभर गाडी उभी केली. सारायेव आणि बासार्गिन बाहेर आले. त्यांनी सभोवती पाहिले.

स्टेपप्रदेश दक्षिणोत्तर पसरला होता. आळसटलेल्या, पुढे जावे की नाही की इथेच रेंगाळत उष्ण आकाशात वितळून जावे याचा जणु विचार करत बसलेल्या पिसा-सारख्या ढगांच्या रांगा त्यावर तरंगत होत्या.

ढगांच्या सावल्या जमिनीवर पडल्या होत्या. ढगांच्या दरीच्या उतारावर आणि मैदानावर पडलेल्या प्रकाशाच्या वेगवेगळया छटा, दूरच्या डॉनची निळाई यामुळे स्टेपप्रदेश विविधरंगी दिसत होता.

उत्तरेकडच्या शिखराच्या उतारावरून चंदेरी पाणी अनेक धारांनी वाहात होते.

“ पिसासारखं आहे हे गवत ! ” सारायेव म्हणाले.

ते पुन्हा गाडीत बसले रस्ता पिसासारख्या कविल गवतात शिरला. उन्हाचे तरंगते पट्टे त्या गवतावरून सरकत होते. या तरंगत्या प्रकाशामुळे डोळ्याला त्रास होत होता. गवताच्या सळसळीमुळे डुलकी येत होती. ती गवती सळसळ नव्हती तर पियानोच्या पट्टयांच्या सुरांसारखा कविल गवताच्या तारांचा सूर होता तो !

बोगद्याच्या खोदकामाच्या जागेवर सारायेव आणि बांधकाम प्रमुख इंजिनियर रायेवस्किय यांच्यासह बासार्गिन विभाग प्रमुखाच्या खोलीत आले आणि जडपणे खुर्चीवर बसले, पिठासारख्या बारीक वाळूचे भांडे टेबलावर ठेवलेले होते ते त्यांनी जवळ ओढले. त्या काचेच्या भांड्यावर टकटक आवाज करीत ते म्हणाले,

" घाण केलीन् या वाळूनं सगळी ! पण ठीक आहे. खाली खोदकामावर जाऊ या "

" बरं पाच मिनिटांनी जाऊ. दगड वर आणताहेत ते काम थांबवलं पाहिजे. " रायेवस्कीयनी उत्तर दिले.

रायेवस्कीय आणि सारायेव बाहेर पडले. बासार्गिन एकटेच राहिले. भिंतीवर लावलेल्या ड्रॉइंगकडे ते डोळे बारीक करून पाहू लागले. तो शिखराचा उभा छेद होता. बरोबर पायथ्याशी बोगदा जात होता. फिक्या चॉकलेटी रंगात रंगवलेला चिकण मातीचा थर आणि करड्या जाडसर वाळूचा थर यांच्यामधे विषारी जिभेसारखा पिठासारख्या बारीक वाळूचा थर पसरला होता.

बासार्गिनच्या कपाळावर आठ्या पडल्या. " दुष्ट कुठली ! ड्रॉइंग काढणाऱ्याने उगीचच ती विशोभित काळपट गुलाबी रंगात रंगवली आहे. त्या भूगर्भशास्त्रज्ञांच्या नजरेतून ही कशी सुटली ! किती अडथळे होते बोगद्यात ! पण सगळे दूर केले गेले. आणि इथंच पाहा कसं अडलं पुन्हा ! "

अडचणी खूपच होत्या. बोगद्याचा सरळपणा आदर्श असा असायला हवा. सगळ्या सहा किलोमीटर लांबीत फक्त ५ सेंटिमीटरचा बाक होता. त्याशिवाय बोगद्याच्या भिंतीचे काम असे व्हायला हवे होते की त्याचा पृष्ठभाग आरशासारखा गुळगुळीत झाला पाहिजे. एखाद्या लहानशा उंचवट्यानेही पाण्यात भोवरा निर्माण केला असता आणि बोगद्यातल्या प्रवाहाच्या प्रचंड वेगामुळे ते धोक्याचे ठरले असते.

बासार्गिन खुर्चीत मागे टेकले आणि खिडकीबाहेर पाहू लागले. खोदकामाच्या बाहेर लोखंडी नळ्या पडलेल्या होत्या. आणि त्याच्यापलीकडे सगळे माळरान पसरलेले होते.

" या माळावरून शतके लोटली पण प्रत्येक वसंतात एक पलीनचं झुडूप जाऊन तिथे दुसरं उगवण्यापलीकडे त्या काळात इथे काहीच घडले नाही. उगवलेलं नवं झुडूपही उन्हाळ्याच्या मध्याला ठरल्याप्रमाणे सुकून जायचं आणि वाळूच्या कणांसारखं दिसणारं बी टणक जमिनीवर पसरून ठेवायचं.

माणसाला या सपाट प्रदेशाची गरज नव्हती तोवर हजारो दिवस आणि हजारो

स्मशानशांततेच्या भयाण रात्री मानवी आवाजाशिवाय या कुरणावरून गेल्या. पण आता...या दूरच्या स्टेप प्रदेशात विजेचे दिवे तेवत आहेत, अत्युकृष्ट तंत्रज्ञान या जागी केंद्रित झालंय आणि धडपडणारी नवनिर्माणक्षम बुद्धी इथे राबते आहे."

फिकट आकाशात तरंगत बेरकुत पक्षी जमिनीवरचे उंदीर टेहेळत होता. तो इतक्या आळसटपणाने उडत होता की जणू रोजचे एक कंटाळवाणे काम म्हणूनच तो हे करत होता. खोदकामाच्या बाजूला काही तो आला नाही त्याने फक्त आपल्या पिवळसर क्रूर दृष्टीने त्याच्याकडे पाहिले.

"एकूण तुला भीती वाटतेय, आता आपलं राज्य संपणार म्हणून!" बासार्गिन म्हणाले.

रायेवस्कीय परत आला. त्याने आता खाली जायला हरकत नाही असे सांगितले. बासार्गिन उठले आणि घाईघाईने खोदकामावरच्या इमारतीकडे निघाले.

"फारच मजेदार गृहस्थ आहे हा रायेवस्कीय!" बासार्गिनच्या मनात आलं. "एक अनुभवी इंजिनियर आहे. पण दिसतो मात्र विद्यार्थ्यासारखा साधासुधा आणि बुजरा. सगळ्या याच्या सवयी अगदी तरुण पायोनियर सारख्या आहेत. कदाचित मॉस्कोची भुयारी रेल्वे बांधताना तरुण पायोनियरांचा तो पुढारी होता. त्या वेळच्या सवयींचे अवशेष असावेत ते."

खोदकामाच्या ठिकाणी ट्रॉलींच्या सगळया फटींमधून ती पिठासारखी वाळू कशी गळत होती हे बासार्गिन कपाळाला आठ्या घालून पाहात होते. ट्रॉलीच्या सुपलीला ती वाळू उचलायल फारच प्रयास पडत होते.

"एखादा पातळ पदार्थ असता तर गोठवून टाकला असता आणि काम भागलं असतं!"

"हे सगळं तोंडात आळंबी उगवावी तसं झालंय" रागाने बासार्गिन म्हणाले. "माहीत आहे का तुम्हाला ती गोष्ट?"

"आता आपल्याला गोष्टीशी काही कर्तव्य नाही." समजुतीच्या स्वरात धारायेव म्हणाले "गोष्टीने काही काम होणार नाही आपले."

"काम होणार नाही ते कळतंय मला. आपल्याला सगळ्यांनाच विचार केला पाहिजे याचा. तुम्हाला, मला, सगळ्यांना. खोदकामावरच्या सगळ्या कामगारांना सुद्धा!

"मार्ग शोधायची गरज निर्माण झालीय म्हणताना आपण मार्ग शोधून काढूच." रायेवस्कीय तक्रारवजा सुरात म्हणाला.

"पण केव्हा? तिथेच तर सगळी मेख आहे." बासार्गिननी पुन्हा वाळूकडे पाहिले "पाण्यासारखी पातळ नाही, खडकासारखी टणक नाही. काही कळत नाही काय करावं ते."

उदास होऊन बासार्गिन वर आले, सगळ्यांचा निरोप घेतला आणि रात्री मला फोन करून वाळूची परिस्थिती काय आहे ते कळवा असे सांगून निघून गेले. सारायेवनी ९ वाजता इंजिनियर, तंत्रज्ञ आणि खणणाऱ्या यंत्राचे उत्तम कामगार यांची बैठक बोलावली.

सगळे खोदकाम प्रमुखांच्या खोलीत जमा झाले. सगळेजण अचाटच सिगरेटी ओढत होते. सारायेवनी खिडकी पूर्ण उघडली. एव्हाना बाहेर काळोख झाला होता.

●

बासार्गिनची गाडी कलाचकडे पळत होती. रस्ता नोवोसल्योनोवकाजवळून जात होता. रस्ता सबंध मोकळा होता. अंधारात कविल गवत चमकत होते. नोवोसल्योनोव कामधे डॉनपाशी गाडी थांबली. लांबलचक मालगाडी क्रॉसिंगवरून सावकाश सरपटत जात होती. बासार्गिननी गाडीतून उतरून सिगरेट पेटवली. त्यांचा राग अजून शांत झाला नव्हता.

थंड चित्ताने जाणाऱ्या डब्यांच्या चाकांचा रुळांवरून तालबद्धपणे होणारा आवाज आणि रेल्वे रुळांच्या कडेने टाकलेल्या लगदा वाहून नेणाऱ्या नळात होणारा दगडांचा खडखड आवाज ते ऐकत होते. डॉनचे पाणी आणि वाळूबरोबरच खडी नळांमधून धरणापर्यंत वाहून नेली जात होती.

कुणीतरी एक लहानखुरा माणूस त्या नळाच्या कडेने जात होता. तो दिव्याच्या उजेडात आल्यावर त्याची बोटीच्या नांगराचे चिन्ह असलेली सोनेरी बटने चमकली. हा माणूस म्हणजे एक लहान वयाचा तरुणच निघाला. तो थांबला. कुतूहलाने त्याने प्रथम गाडीकडे आणि नंतर बासार्गिन यांचेकडे पाहिले. "अरेच्चा! जे ई·एस ११०!" तो आदराने उद्‌गारला.

"इथे का तुम्ही उगीच फिरताहात!" बासार्गिननी कठोरपणे विचारले.

"मी उगीचच नाही फिरत. मी सकशन ड्रेजचे प्रमुख कॉम्रेड माल्वेइचुक यांच्या हुकुमाची अंमलबजावणी करतोय. धरणावरून सकशन ड्रेजवर चाललोय. इथं आमच्याकडे एक लहानसं नाटक घडलं. धरणावरून आम्हाला कळवण्यात आलं, की नळातून आम्ही वाळूपेक्षा पाणीच जास्त उपसतोय. कळलं! ते शोधून काढण्यासाठी गेलो होतो." तरुणाने उत्तर दिले. तो लेन्या बोब्रोव होता.

"तर मग काय आढळलं तुला, तरुण गृहस्था!"

"पण तुम्हाला काय करायचंय जाणून घेऊन!" लेन्या बोब्रोवने संशयाने विचारले.

"कारण मी प्रकल्पाचा प्रमुख आहे."

भांडण्याच्या पवित्र्यात लेन्या बोब्रोवने मागे वळून पाहिले आणि शंकेखोरपणाने विचारले, "कॉम्रेड बासार्गिन!"

" अगदी बरोबर. आता तरी सांगाल ? "

" कारण अगदी साधं आहे. " लेन्या ओशाळून म्हणाला. " सकशन ड्रेज अशा जागी पोचला आहे की जिथे या तळाला फार बारीक पिठासारखी बारीक वाळू आहे. यंत्रच ते. तेव्हा त्याने वाळूपेक्षा पाणीच जास्त खेचायला सुरुवात केली. "

" असल्या अंधारात तुम्ही कसे चालता आहात ? पाय मुरगळून घ्याल. " बासार्गिन म्हणाले.

" इथले सगळे खड्डे मी दिवसा पाहून ठेवलेले आहेत. " बोब्रोव म्हणाले.

" बराय आभारी आहे. नाव काय तुमचं ? " बासार्गिनने विचारले आणि ते गाडीकडे निघाले.

" लिओनिद बोब्रोव, सकशन ड्रेजवरचा २०४ नंबर "

" आभारी आहे लिओनिद बोब्रोव ! " बासार्गिन पुन्हा म्हणाले. गाडीत बसले. आणि ड्रायव्हरला म्हणाले,

" मागे घ्या ! खोदकामावर परत जाऊ. फक्त जोरात चला ! "

ड्रायव्हरने घाईघाईने गाडी वळवायला सुरुवात केली.

" मागे कशाला घेता ? गाडी आत्ता निघून जाईल. "

तेवढ्यात आपला लाल डोळा मिचकावत रेल्वेगाडी निघून गेली.

बासार्गिन यांची गाडीही पळत सुटली नोवोसल्योनोवस्कनंतर गाडी बडाकालवा खणणाऱ्या यंत्रांजवळून गेली. त्यांची लांबलचक माळ उभी होती. त्यांच्या बकेटच्या दांड्यांवर लावलेल्या दिव्यांवरून त्यांची संख्या मोजता येत होती. नंतर कालवा बाजूला पडला. उघड्या खिडकीतून पलीनचा आणि पिल्पाचा औषधी वास आत घुसत होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंचे दाट गवत गाडीच्या दिव्यांच्या प्रकाशात मंद ठिणग्यांसारखे चमकत होते.

" काय आहे हे चमकणारं ? काजवे ? " बासार्गिननी शोफरला विचारले.

" छे, छे ! हे मला वाटतं दवाचे थेंब चमकताहेत कॉम्रेड. " शोफरने उत्तर दिले.

बंधाऱ्याजवळ बासार्गिननी घड्याळात पाहिले. मध्यरात्र झाली होती. त्यांनी खिडकीतून डोकं बाहेर काढलं. त्यांच्या चेहऱ्याची आग होत होती. ते क्वचितच यशाच्या खात्रीने उत्तेजित होत अतिशय स्थिरचित्र होते ते. पण आता ते अतिशय अधिर झाले होते. गाडीत ड्रायव्हर नसता तर त्यांनी गायलाच सुरुवात केली असती.

आकाशदीपांच्या उजेडातून, पळणाऱ्या वाऱ्याच्या संथ होत चाललेल्या वेगातून, गवताच्या गंधातून मध्यरात्रीचा पदरव ऐकू येत होता. पण बासार्गिनना वेगळाच भास होत होता. जणु त्यांची गाडी एकाद्या अज्ञात भूमीवरून दाट गवतातून, घनदाट झाडीतून, दवाच्या पखरणीतून फुलांचा साज लेवून मध्यरात्रीच्या अंधारात दडलेल्या

पाण्याच्या शांत प्रवाहाजवळून जाते आहे.



सारायेवनी कान देऊन ऐकले आणि ते सावध झाले. दुरून बासार्गिनच्या गाडीचा ओळखीचा कर्णा ऐकू येत होता. गंभीर, पण मंजुळ, तीन सुरांचा, वाल्तोर्न वाद्यासारखा!

सारायेव उडी मारून उठले आणि घाईने बाहेर आले. सगळे घाबरून त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात राहिले. सभा थांबली.

सारायेव खोदकाम ऑफिसच्या बाहेर धावले. गाडीच्या वेगामुळे हालणारा गाडीच्या दिव्यांचा पांढरा झोत सामोरा आला. गाडीला ब्रेक लागले. बासार्गिन बाहेर आले. सारायेवनी त्यांच्याकडे झेप घेतली.

" हे काय ? तुम्ही परत आलात ? " सारायेवनी उत्तेजित स्वरात विचारले.

" ओरडू नकोस " बासार्गिन हळू आवाजात म्हणाले, " मला वाटतं मला उत्तर सापडलंय् म्हणून परत आलो. चल, बोलू या जरा. "

बासार्गिन अनपेक्षितपणे खोदकाम प्रमुखांच्या ऑफिसमधे शिरले तेव्हा सर्वांनी एकमेकांकडे पाहिले.

" हे पहा कॉम्रेडस, ऐका. मला एक विचार सुचलाय. ती पिठासारखी वाळू आपण ओली केली तर काय होईल ? तिला पाणी पाजायचं. चिखल करायचा आणि मग डॉनच्या तळातून सक्शन ड्रेजने लगदा काढतात तसा तो नळातून वर आणायचा."

" अरे वा ! आम्हाला अगदी हेच हवं होतं. " रायेवस्की हळूच उद्‌गारला आणि हसायला लागला. " बस्स ! कळलं. त्यात सगळं साधणार. आभारी आहोत इवान वासिलियेविच ! आणि आम्ही म्हणे सगळे अनुभव संपन्न ! इकडे तिकडेच धावा धाव करत होतो. " रायेवस्की बोलला

" एका प्रसंगाने हात दिला. " बासार्गिन उद्‌गारले. सभेत आनंदाची लाट उसळली. " चला, कामाला लागा ! एक ताससुद्धा वाया घालवू नका. जे जे लागेल ते ते सगळं पुरवलं जाईल तुम्हाला " बासार्गिननी घाई केली.

सकाळी बासार्गिन जरा थकून पण शांत होऊन आपल्या ऑफिसमधे बसले होते. आणि कार्पोवकाच्या पाण्याच्या खजिन्यावरच्या पंपिंग स्टेशनच्या यंत्रांच्या जुळणीचा अहवाल झिमल्यानोव देत होते ते ऐकत होते. अहवाल ऐकल्यावर ते झिमल्यानोयना काही म्हणाले नाहीत. ते उठले त्यांचा हात घट्ट पकडून हस्तांदोलन केले आणि त्यांचा निरोप घेतला.

सेक्रेटरी झिनाइदा फिलिपोवनाच्या बाजूने जाताना जिमल्यानोय म्हणाले, " त्यांच्या चेहऱ्यावरून काही कळलं नाही. त्यांना काय वाटलं ते ! "

" उलटं आहे. त्याचं अगदी समाधान झालंय. " झिनाइदा फिलिपोवनाने उत्तर दिले.

" आभारी आहे ! " झिमल्यानोय म्हणाला. " माहीत आहे का तुला ? प्रोत्साहन मिळाले की त्याचा आमच्यावर फार परिणाम होतो. या अतिथ्यशील घरात फक्त तुमच्याकडून प्रेमळ शब्द ऐकायला मिळतो. "

ते हसत हसत गाडीत बसले आणि आपल्या विभागात गेले. खूप थकलेले असूनसुद्धा कामाचा शेवट जवळ आल्यामुळे ते आनंदात होते. पण उगीचच काहीतरी अस्वस्थ होण्यासारखी खुसपटे शोधून काढत होते. वास्तविक आता अस्वस्थ होण्यासारखे कोणतेही कारण नव्हते. पण तसे काही कारण असले म्हणजेच त्यांना हायसं वाटत असावे. सतत अशी कसली तरी विवंचना असली म्हणजेच ते उत्साही, दक्ष, तत्पर आहेत असे वाटे. असंच असेल कदाचित् !



# १९

योग्य वेळी स्टेप प्रदेशात शरदऋतूचे आगमन झाले. रात्री थोड्या थंड झाल्या. स्वच्छ तेजस्वी आकाशाखाली गवताळ कुरण पसरले होते. दूरवर तपकिरी रंगाचे गवताचे भारे दिसत होते. पुष्कळदा शरदऋतूच्या उबाऱ्यामुळे पिवळ्या पडलेल्या गवताला बारीक बारीक साधीसुधी फुले दुसऱ्यांदा येतात, सकाळच्या उत्तर-वाऱ्याने ती लगेच नाहीशीही होतात. पण क्षणकाल दृष्टीला सुख देतात.

दक्षिणेकडे स्थलांतर करून जाणारे पक्ष्यांचे थवे स्टेपवरून उडत जात होते. जमिनीवर काय चाललंय हे पाहण्यासाठी त्यांनी आपला वेग थोडा कमी केला.

शरदऋतूत मी दुसऱ्यांदा त्सिमलाच्या बांधकामावर आणि नोवोरोसिइस्कमधे आलो होतो. नव्या पात्रातून, नुकत्याच पूर्ण झालेल्या धरणातून डॉन कशी जाते ते मला पहावयाचे होते. पण या प्रसंगाची वाट पाहत मला काही दिवस नोवोसल्योनोवस्कमधे थांबावे लागले. मला कळले होते की, शेजारच्या त्सिमला गावात हवामानशास्त्राचे आणि पर्यावरण शास्त्राचे नवीन स्टेशन उघडताहेत. म्हणून मी तिकडे गेलो. मला त्या स्टेशनच्या कामाचा परिचय करून घ्यायचा होता. आग्नेयेकडच्या या प्रदेशात पाण्याच्या नव्या खजिन्याच्या निर्मितीनंतर आणि झाडांच्या नव्या लागवडीनंतर हवामानात काय बदल होतात त्याचा अभ्यास या स्टेशनमधे करण्यात येणार होता.

या स्टेशनने नुसती कामाची तयारी केली आहे असे दिसले. अजून सगळी साधनसामग्री आली नव्हती. असिस्टंट जागेची आणि फर्निचरची मांडामांड करत होते. तरीही मी तिथे गेलो. एका सडपातळ, तपकिरी रंगाच्या युनिफॉर्ममधल्या मुलीने मला

दार उघडले. गडद रंगाच्या रिबिनी लावलेल्या दोन वेण्या तिने पुढे घेतल्या होत्या. तिने मला सांगितले, स्टेशन डायरेक्टर घरी नाहीत पण लवकरच येतील. म्हणून तिने मला थांबायला सांगितले.

" या स्टेशनची डायरेक्टर माझी आई आहे. आम्ही इथंच राहतो, चला फिरून पाहू." मुलीने माहिती दिली.

त्या स्टेशनसाठी नुकत्याच बांधलेल्या घरात जागा दिली होती. अजून थंड असलेल्या हॉलमधे साधनांच्या न उघडलेल्या पेट्या पडल्या होत्या. रंगाचा वास येत होता. आम्ही एका रिकाम्या खोलीत शिरलो. तिथे फक्त एक बुटके बाक होते. आणि भिंतीवर रोमानिनच्या चित्राची प्रतिकृती टांगलेली होती.

मुलीने मला बाकावर बसायला सुचविले आणि ती स्वतः एका टोकाला बसली. नंतर माझ्याकडे पाहत सांगू लागली.

" आम्ही नुकत्याच आलो आहोत. अजून सामानही लावलं नाही. "

त्या मुलीला पाहिल्यापासून मला सारखे वाटत होते की आपण या मुलीला केव्हातरी पाहिलेले आहे. माझी पक्की खात्री झाली त्याबद्दल पण केव्हा ? जणू खूप खूप पूर्वी ! पण मुलीला तर सतरावं वर्ष असेल फार फार तर, जास्त नाही.

" तुम्ही मॉस्कोला होता का ? " मी तिला विचारले.

" पूर्वी. मी पाच वर्षांची होते तेव्हा. आत्ता मी आणि आई सारातोवला राहात होतो. मी एकंदरीत फारच थोडा प्रवास केलाय. हे काही चांगलं नाही. फक्त कॉकेशसमधे आझोव समुद्रावरच्या एका बाईकडे गेलो होतो. "

" मी सुद्धा तिथे होतो. तगानरोगमधे. "

" हो ? " ती आनंदाने चकित झाली. " या बाईही अगदी तगानरोगच्या जवळच राहतात. तिथं एक मासेमारीचं ठिकाण आहे. त्यला म्हणतात " पेत्रुशिन भूशिर. "

" तुझ्या आईचं नाव काय ? "

" नतालिया पेत्रोवना गालागिन. "

त्याबरोबर मला सगळे आठवले. तगानरोगमधले ओसाड बंदर, उन्हाने भाजून निघालेल्या पोलादी तोफा, नावा बांधायच्या जागा. हलक्या लाटांचा आवाज, मोडकळीला आलेले 'झापरजेच ' जहाज; लंबुटांग्या विनोदो गालागिन, पेत्रो कोळी, पेत्रुशिन भूशिर, चपळ सावळी नताल्का– वाळूवरच्या समुद्राच्या पाण्यासारखे हिरवटसर चमकदार डोळे असलेली !

मी त्या मुलीकडे पाहिले. मला तीच हिरवटसर डोळ्यांतली सावध नजर दिसली.

त्याचवेळी एक सावळी, तसेच मुलीसारखे डोळे असलेली, किरकोळ बांध्याची स्त्री घाईघाईने खोलीत आली, जरी आमच्या भेटीनंतर चाळीस वर्षे लोटली असली तरी मी तिला तावडतोब ओळखले. ती नताल्का होती– नतालिया पेत्रोवना !

पण मी लगेच माझी ओळख दिली नाही. मला या स्टेशनचा परिचय करून घ्यायचा आहे असे मी सांगितले. नतालिया पेत्रोवना माझ्याशी अगदी साधेपणाने वागल्या. त्यांनी मला सगळे दाखवायचे आश्वासन दिले.

“ आभारी आहे त्याबद्दल. मला फार आनंद झाला नतालिया पेत्रोवना. विशेषतः तुम्ही इथे भेटल्याचा. ” मी म्हणालो.

तिच्या डोळ्यांत आश्चर्याचा भाव चमकून गेला. विनयशील माणसांच्या चेहऱ्यावर एखादी गोष्ट समजली नाही तर जसे नम्र ओशाळवाणे हसू चमकून जाते, तसे ती हसली. आणि म्हणाली; “ कशामुळे ‘ मलाच ’ भेटल्याचा आनंद होतोय तुम्हाला ? ”

“ कारण तुम्हीच मला प्रथम ‘ समुद्राच्या काळिजाबद्दल ’ आणि चाऱ्यांबद्दल माहिती दिलीत. प्योत्र सोफ्रोनोविच कसे आहेत ? ठीक आहेत ना ? ”

नतालिया पेत्रोवना एकदम माझ्या शेजारच्या बाकावर बसल्या. घाईघाईत वाकून जणू शोध घेतल्यासारखे एकटक माझ्या चेहेऱ्याकडे बघत राहिल्या.

“ थांबा जरा ! ” गोंधळून जाऊन मंजूळ आवाजात ती म्हणाली, “ मी स्वप्नात तर नाहीं ना ? खरंच का ते तुम्हीच आहात ? ”

“ हो मीच आहे, आणि तुम्ही– नताल्का ? ”

त्या मोठ्याने हसायला लागल्या आणि त्यांनी दोन्ही हात माझ्या पुढे केले.

“ जादू झालीय ! लेल्या, माहीत आहेत का तुला हे कोण आहेत ते ? ” ती लेल्याला घाईघाईने सांगू लागली. मी पेत्रुशिन भूशिरावर कसा होतो, ती मला चुलीवर बोर्शसूप कसं शिजवून द्यायची, आणि आपल्या बालिश आख्यायिकांनी माझं डोकं कसं फिरवायची ! ते ती लेल्याला घाईघाईने सांगू लागली. लेल्या गोंधळून एकदा माझ्याकडे आणि एकदा आईकडे पाहत राहिली.

“ प्योत्र सोफ्रोमोविच अजून जिवंत आहेत. आमचा म्हातारा फार चांगला आहे. पण फक्त फार वळवळ्या आहे. अजून त्याच आपल्या जुन्या घरात राहतात बाबा· आठवतंय तुम्हाला ते ! मला त्यांना नवं घर बांधून द्यावंसं वाटत होतं. पण त्यांनी इतका आरडा-ओरडा केला मला नको म्हणून ! नाही, तुम्ही थांबा जरा. मला नीट पाहून घेऊ दे तुमच्याकडे, साधे फिटर होतात आणि लेखक कसे बनलात ? ”

“ तुम्ही कशा हवामानशास्त्रज्ञ झालात ? ”

“ खरंच, याचा मी विचारच केला नाही कधी. सगळं आपल्या आपणच घडत गेलं. आणि खरं तर, क्रांती झाली नसती, तर मी आमच्या भूशिरावर चुन्यानं घरच रंगवत बसले असते. ”

“ आणि खिडक्यांना निळी किनार काढली असतीत, हो ना ? ”

“ हो, हो ! नक्कीच, आणि तुम्हाला आठवतंय ? ” नतालिया पेत्रोवनानी माझा हात हातात घेतला आणि विचारले, “ तुम्हीच मला पहिल्यांदा झोलुश्काची ( सिंड्रेलाची )

गोष्ट सांगितली होतीत ते आठवतं ? मी त्यावेळी इतकी रडले होते ! दुःखानं वेडी झाले होते. आणि माहीत आहे लेल्या ? " नतालिया पेत्रोवना मुलीकडे पाहून म्हणाल्या, " किनाऱ्यावर एखादी काच सापडली की वाटायचं, हा तिच्याच हिऱ्याच्या चढावाचा तुकडा आहे आणि निकोलाय पेत्रोविच लिपेचकिय गुरुजी आठवतात तुम्हाला ? "

" म्हणजे काय ? ती वाक्सोवची हास्यास्पद गोष्टही चांगलीच आठवतेय !"

" मला सांगा ना ती गोष्ट ! मला त्याबद्दल काहीच माहिती नाही. लिपेचकीय गुरूजी आमच्या जवळच भूशिरावर वारले. फार प्रेमळ गृहस्थ ! मूर्तिमंत वात्सल्य ! मी त्यांचं फार देणं लागते. असं कसं मी तुम्हाला ओळखलं नाही ? आणि तुम्ही मात्र मला लगेच ओळखलंत ! "

मी लेल्याकडे दृष्टी टाकली.

" हं हं ! आता आलं लक्षात ! तिच्यावरून तुम्ही मला ओळखलंत तर ! ती खरंच अगदी माझ्यावर गेलीय. मी सुद्धा अशीच हिच्यासारखी आनंदी आणि कल्पनासृष्टीत रमणारी होते तेव्हा." नतालिका पेत्रोवना बोलत होत्या.

" हे ग काय आई ? असं का तू बोलतेस ? " लेल्या कुरकुरत म्हणाली.

" काही नाही ग ! " नतालिया पेत्रोवनांनी तिला मधेच थांबवलं.

" स्वप्नात रंगणं काही वाईट नाहीं. आणि तुम्हाला माझे काका आठवतात ? झापरजेच ' वरचे-खलाशी ? "

" आणि तुम्हाला आठवतं ? रात्री तुम्ही मला उठवलंत ते ? प्योत्र सोफ्रोनेविच 'डॉनच्या त्या तसल्या भागात गेले होते तेव्हा ? चाच्यांबरोबर ? "

वरचेवर आम्ही एकमेकांना मधेच थांबवून मधे मधे बोलत होतो. नतालिया सारखी उगीचच हसत होती. आणि मधून मधून तिच्या डोळ्यांत अश्रू तरळत होते हे माझ्या लक्षातच आले नाही.

मी तिला वाक्सोव आणि लिपेचकीय गुरुजी यांची गोष्ट सांगितली.

" हं ऽ ऽ ऽ " नतालिया पेत्रोवनानी सुस्कारा टाकला. " निकोलाय पेत्रोविच आतापर्यंत जगले असते तर त्यांना किती आनंद झाला असता ! ऐका जरा, खरेच का ते तुम्हीच आहात ? खरंच मी किती भाग्यवान आहे ! अतिशय नशिबवान आहे मी ! आता तुम्ही आमच्याकडे घरच्यासारखेच राहा ! तुम्ही कुठे उतरलाय् ? ते काही नाही. तुम्हाला आमच्याकडेच आलं पाहिजे. पाहिलंत कशा छान खोल्या आहेत ? मला शब्द द्या येईन म्हणून. "

मी आनंदानें संमती दिली. मी संध्याकाळी नोवोसल्योनोवकात बॅग आणण्यासाठी गेलो. म्हणजे सकाळी खेड्यात परत येता आले असते.

नतालिया पेत्रोवना मला बसपर्यंत पोचवायला आल्या होत्या. शरदातली रात्र अजूनही उबदार होती. काळ्याभोर आकाशातून क्वचित पावसाचे थेंब पडत होते.

बस हलली. उतारू पेंगत होते. मी सुद्धा पेंगुळलो होतो आणि विचार करत होतो, नतालिया पेत्रोवनाना इतक्या वर्षांनी आपण अगदी जवळच्या माणसासारखे भेटलो हे किती छान झालं! त्या भेटीनंतर आता मला असं वाटत होतं की यापेक्षा वेगळं काही घडणंच शक्य नव्हतं.

सकाळी मी नतालिया पेत्रोवनांकडे त्यांच्या नव्या, प्रशस्त, स्तंभांचा मोकळा व्हरांडा असलेल्या घरात राहायला आलो. शरदातल्या शांत सौम्य उन्हाने सगळ्या खोल्या भरून टाकल्या होत्या.

लेल्या खूप लवकर उठत असे. मला जाग येऊ नये म्हणून स्वयंपाक घरातच आवाज न करता चहा पिऊन तो शाळेला जात असे. नतालिया पेत्रोवनाही लेल्याबरोबरच उठत. सगळे आवरून त्या हवामान स्टेशनवर जात.

मी स्वस्थ पडून दैनंदिन जीवनाचा नाद लक्षपूर्वक ऐकत असे. आत्ता चमच्यांची खणखण, तर नंतर चुलीवरच्या किटलीची फुसफुस! नंतर लेल्या आईला कुजबुजत्या आवाजात विचारते, "आई, ॲडॅप्ट म्हणजे काय ग?" किंवा नतालिया पेत्रोवन म्हणतात " अजून पुस्तकं सोडायची राह्यलीत, संध्याकाळी आपल्याला तेच काम केलं पाहिजे!"

पुस्तके सोडायला वेळच नव्हता. नतालिया पेत्रोवनांचा सगळा वेळ आलेली साधने तपासून पाहण्यात आणि त्यांची मांडामांड करण्यात जात होता. बॅरोग्राफ, बॅरोमीटर, थर्मो हैड्रोग्राफ, विंडकॉक, रेडिओप्रोब, हरतऱ्हेची स्केल्स, तक्ते, ढगांचे फोटो. अजून सगळे असिस्टंट आले नव्हते. त्यामुळे काम फार पडत होते.

कधी कधी नोवोसल्योनोवस्कमधे जाता जाता मी नतालिया पेत्रोवनांकडे जात असे. आणि साधनांची मांडामांड करायला त्यांना मदत करत असे.

आम्ही गतकाळाबद्दल, हल्लीच्या नतालिया पेत्रोवनांच्या कामाबद्दल, हवामान शास्त्रातल्या नव्या सिद्धांताबद्दल, हवामानात होणाऱ्या फेरफाराबद्दल खूप गप्पा मारल्या.

मी नोवोसल्योनोवस्कला जायला निघे तेव्हा प्रत्येकवेळी नतालिया पेत्रोवना मला नव्यानेच लावलेल्या, पण अजून न वाढलेल्या बागेच्या दारापर्यंत पोचवायला येत. माझा निरोप घेऊन ती स्नेहभराने हसे, आपल्या पांढऱ्या होऊ लागलेल्या केसांवरून हात फिरवी आणि हळू हळू घराकडे परत फिरे.

डॉनपलीकडे ढगांच्या राशीच्या राशी जमा झाल्या होत्या. उन्हाने त्यांच्या कडा डोळे दिपवून टाकण्याइतक्या झगमगत होत्या.

माझ्या मनात विचार आला, नताल्काच्या रूपाने जीवनाने आपला एक फेरा पूर्ण केला आहे—नव्या बालिश कल्पनांपासून सुरवात करून थेट रंगवलेल्या मोठ्या मोठ्या स्वप्नांच्या पूर्ततेपर्यंत! आमच्या देशाच्या आणि जनतेच्या आयुष्यातल्या नव्या भरभराटीच्या कालखंडाचे भागीदार आणि साक्षीदार बनलेल्या आमच्यासारख्या माणसांच

भविष्यकाळ किती भाग्याचा आहे हे कधी कधी आमचं आम्हालासुद्धा उमजेनासं होतं!

डॉनचे पाणी नव्या पात्रात सोडण्याच्या दिवशी मी लेल्यासह नोवोरोसिइस्कला गेलो. जिथून नदीचे सगळे पाणी अडून ते धरणाकडे वळताना दिसेल अशी किनाऱ्यावरची जागा आम्ही निवडली.

दगडांनी अडवलेली नदी रोरावत होती, संतापून या खिडक्यांवर धडका देत होती. तिचे ते रोरावणे फार दूरवर ऐकू जात होते. काहीवेळा त्या आवाजाने किनाऱ्यापर्यंत ऐकू येणाऱ्या बांधकामाचा आवाजही पार झाकून जाई.

इथे, या जागी पाण्याची सगळी गतिमान शक्ती प्रतीत होत होती. हा दगडी बांध काही तग धरणार नाही असं वाटत होतं. डॉन तो पार धुवून काढील आणि रागा रागाने सगळे दगड मुखापर्यंत वाहून नेईल असं वाटत होतं.

पण तो बांध उभा होता. मधून मधून हादरत होता. त्या बांधाजवळ दगडांनी भरलेले डंपरट्रक उभे होते. दगडांनी बांधात ठेवलेल्या खिडक्या बुजवून नदीला पूर्णपणे अडवण्यासाठी!

हे ट्रक कमांडिंग पोस्टवरच्या इशाऱ्याची वाट पहात होते. आता संध्याकाळ झाली होती. तरीही इशारा मिळाला नव्हता. ड्रायव्हर अस्वस्थ झाले होते. डॉनचा किनारा लोकांनी फुलून गेला होता. धरणाचे शिल्पकार डाव्या किनाऱ्यावर जमले होते.

शरदातले दिवस कधीकधी करड्या रंगाने झाकल्यासारखे दिसतात. बर्फ पडत नसतं. पण हवेला बर्फाचा वास येत असतो. त्या वासामुळे किंवा दूरवर पसरलेल्या थंडसर धुक्यामुळे असेल कदाचित्. पण असं वाटत असतं, की पाहता पाहता भरून आलेल्या स्तब्ध आकाशातून बर्फ पडायला लागेल, ते आणखी आणखीच दाट होईल आणि आपल्या हलक्या फुलक्या थराने सगळी जमीन, झाडे, धरण, समुद्रातल्या गोष्टींचे डोंगर, यंत्रे यांना झाकून टाकीपर्यंत पडतच राहील.

आत्ता अगदी तसलाच हिवाळा सुरू होण्या आधीचा दिवस होता.

दिवस संपला. कमांडिंग पोस्टवर प्रकल्प प्रमुखांच्या आज्ञेची वाट पाहत होते. आता अगदी अंधार पडला होता. पण प्रमुख घाई करत नव्हते. त्यांनी पुन्हा एकदा सगळे काळजीपूर्वक तपासले. सगळी तयारी आहे ना? एखादी सुद्धा बारीक सारीक गोष्ट राहून गेली नाही ना?

किनाऱ्यावर एकदम शेकडो दिवे पेटले, प्रोजेक्टरचे किरण उसळत्या पाण्यावर पडले.

ड्रायव्हरांनी जणू इशाऱ्याबरहुकूम पुढची दारे उघडली. ते बाहेर आले दुथडी भरून पाण्याचे डोंगर कसे वाहत येत होते ते नजर न ढळवता पाहत राहिले. फेसाळ पाणी मोकळ्या जागी शिरले. क्षणभर ते फेसांचे पट्टे रुंद झाले, त्यांचे रूपांतर पांढऱ्या झंकारणाऱ्या तारात झाले आणि ते अंधारात दिसेनासे झाले. टगबोटींनी आणि वाफोरांनी निरनिराळ्या उत्तेजक सुरांनी आपले भोंगे वाजवले.

बांधकामावरचे दिवे पेटले. नेहमीप्रमाणे त्यांच्या प्रकाशाने आकाश गढूळ गुलाबी दिसू लागले.

आणि नंतर पलीकडे, पूर्वेला, भावी समुद्राकाठच्या वस्त्यात दिवे पेटले. संध्याकाळच्या घरातल्या धुरांच्या वलयात ते मिसळून गेले. सगळी रात्र प्रकाशाचा झगझगाट, दिव्यांची लुकलूक, आणि दबक्या हालचाली यांनी भरून गेली होती.

लेल्याने माझा हात पकडला.

डॉनच्या किनाऱ्यांवर रेडिओवरून धीरगंभीर आवाज घुमला. त्याने प्रवाह अडवण्याची आज्ञा दिली. अनेक दिवे पेटले. इंजिनं धडधडू लागली. आणि गाड्यांचा सगळा डोंगर पुलावरून त्या जागेकडे गेला.

डॉन क्रुद्ध झाली. तिच्या अंगात संचार झाला. बांधाच्या खिडक्यात काळ्या काळ्या भोवऱ्यांनी ती गरगरत राहिली. दगड पडत होते तिथे ती किनाऱ्यावर धडका देऊ लागली. पण बांध वाढतच होता. अखेर डॉनला माणसांनी तयार केलेला नवा मार्ग गवसला. ती धरणाच्या दिशेने जाऊ लागली. पाण्यावर दिव्यांची प्रतिबिंबे चमकली. आणि हूऽऽरा चा जयघोष वाहत आला. वाद्यं गर्जू लागली. नदीवर बोटींचे भोंगे घुमत होते.

"हा पहा हिवाळा आला." हिरवे हातमोजे घातलेला पंजा माझ्यापुढे धरून लेल्या म्हणाली. हातमोज्याच्या लोकरीत बर्फाचा कंगोरेदार स्फटिक पडला होता. तो विरघळला त्याचे रूपांतर पाण्याच्या बिंदूत झाले. डॉनवरच्या रोषणाईतील प्रकाशाने तो ठिणगीसारखा चमकला. त्यातून प्रकाशाचे किरण फाकले.

●

# २०

" फार रात्र झाली ! " कार्पोव म्हणाले आणि त्यांनी दार बंद केले. वाऱ्याने धक्का देऊन ते उघडण्याचा प्रयत्न केला. पण कार्पोवनी दाराची कडी धरून ते जोरात आपल्या बाजूला ओढले. अखेर वारा हरला. पण तरीही सारखा दारावर एखाद्या जाड बुटाने ठोकल्यासारखा आवाज करत राहिला. दार थडथडत राहिले.

आत येऊन कार्पोव झिमल्यानोयकडे गेले.

" मग काय ? धडका देतोय अजून ? " झिमल्यानोयनी विचारले.

" नाही तर काय ? "

" जाऊ दे. आता आपल्याला त्याची भीती नाही ! " झिमल्यानोय हसले आणि दौतीच्या स्टँडवरच्या ब्रॉंझच्या बसलेल्या अस्वलाकडे पाहत ते बोलू लागले, " जोराने वाहा, शीळ घाल, रागाव, सगळे आभाळ खाली पाड म्हणावं त्याला ! आता आम्ही कॉंक्रिटच्या घरात चिलखत घातल्यासारखे सुरक्षित आहोत. कॉंक्रिटच्या भिंतीवर धडका देऊन हा स्टेपमधला वारा स्वतःचेच दात पाडून घेणार आहे ! "

" फार फार दिवस वाट पाहत होतो या क्षणाची ! " कार्पोव उद्गारले.

" चला जाऊ या ! " ते व्हरांड्यात आले. या संधीचा फायदा घेऊन वाऱ्याने दारे सताड उघडली आणि भिंतीवर आपटत राहिली. वाऱ्याचा जोर इतका होता की दार दोघांना मिळूनही बंद करायला जडच गेले. तेवढ्या वेळात वाऱ्याने इतके बर्फ आत आणले होते की, छतावरच्या दिव्याभोवती त्याचा धुक्यासारखा थर जमला होता.

गाडी धीटपणाने बर्फात घुसली आणि सबंध पांढरी होऊन तिने रस्त्यावर उडी

घेतली. कशामुळे कोण जाणे पण रस्त्यावर खूप शांतता होती. वारा जरा मंद गतीने वाहात होता. तिरकस पट्ट्यांसारखे बर्फ हळूहळू पडत होते. माळावर खूप दिवे तळपत होते, हेलकावे घेत होते.

" बांधकाम सुरू होण्यापूर्वी कसल्या भयाण रात्री इथं असायच्या याची कल्पना तरी आहे का तुम्हाला ? " झिमल्यानोयनी कार्पोवना विचारले.

" ते सगळं विसरून जा आता ! तसल्या रात्री आणि बर्फाची वादळं या नुसत्या शोभेच्या वस्तू होतील आता ! " कार्पोवनी उत्तर दिले.

जोराने आवाज करत डंपरट्रक समोरून येत होता. गाडी जितकी पुढे जात होती तितके दिवे दाट होत होते. त्या सगळ्यांच्यावर लाल तारा तळपत होता.

" पंपिंग स्टेशन ! " कार्पोव म्हणाले.

या रस्त्याचा खळगा न् खळगा झिमल्यानोयना माहीत होता. डोळे मिटूनसुद्धा आपण हा रस्ता पार करू असे त्यांना वाटायचे. पण या वादळी रात्री पंपिंग स्टेशनची आकृती आणि इतर वास्तूंच्या आकृत्या काही त्यांना ओळखता आल्या नाहीत. अंधारात त्या सगळ्या इमारती गोठून राहिलेल्या सावल्यांसारख्या दिसत होत्या.

अंधारात दबक्या हालचाली जाणवत होत्या. अस्पष्ट आवाज तरंगत येत होते. क्वचित यंत्रे कर्कश आवाज करत होती. जणू काही त्या आवाजाच्या धाकाने बर्फ शांत झाले होते. आणि लोकांना अडथळा होऊ नये म्हणून घाईघाईने, न थांबता पडून जात होते आणि तितक्याच घाईने वितळूनही जात होते.

" आता जाताना रस्त्याच्या डाव्या बाजूला जमिनीवर पडलेले आगगाडीचे रूळ आणि त्यांच्या बाजूला पडलेला गाडीचा जुनाट टायर लागेल. " झिमल्यानोयच्या मनात आले.

ते रूळ आणि तो टायर झियल्यानोयनी आजपर्यंत रोज दिवसातून १५–२० वेळा तरी पाहिले असतील. प्रथम त्यांना या वस्तूंचा राग यायचा. पण नंतर त्यांना कळले, की असल्या क्षुल्लक गोष्टींशी वैर करण्यात काहीच अर्थ नाही. म्हणून त्या वस्तू तिथून ताबडतोब हलविण्याचा हुकूमही त्यांनी दिला नाही. नंतर त्यांना त्यांची सवय झाली. एवढेच नव्हे, तर वसंतऋतूत एक दिवस जेव्हा टायरच्या सावलीला एक झामुख्रिष्काचे पिवळं फूल उमललेलं त्यांना दिसलं तेव्हा त्यांना चक्क आनंद झाला.

झिमल्यानोय गाडीच्या दिव्यांनी उजळलेल्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पाहत होते. रूळ नव्हतेच.

" इथं रूळ होते, " त्यांनी दबकत दबकतच ड्रायव्हरला विचारले. " आपण ते ओलांडले की काय ? "

" आज ते काढून नेले. " ड्रायव्हरने उत्तर दिले.

" म्हणजे काय ? "

" तो तर तात्पुरता मार्ग होता, कॉम्रेड झिमल्यानोय. उद्यापासून तो बंद करणार आहेत. हे पहा सगळं बाजूला काढून ठेवलं आहे. " शोफर म्हणाला.

" पूर्ण माहिती दिल्याबद्दल आभारी आहे. " चेष्टेच्या सुरात कार्पोव म्हणाले. पण झिमल्यानोयच्या मनात आले, गरज संपल्यामुळे खरोखरच उद्या हा तात्पुरता रस्ता बंद करतील. वसंतात तिथे गवत उगवेल, कालव्यातून वाहतूक सुरू होईल, बांधकाम कारागिर निघून जातील आणि या रुळासारख्या लहानसहान गोष्टींची कुणाला आठवण सुद्धा राहणार नाही. माणूस मोठा विचित्र प्राणी आहे ! आता हा कालवा, धरणाचा दरवाजा बांधून झाला. उद्या पंपिंग स्टेशन चालू होईल. आणि झिमल्यानोयना हेही माहीत आहे, की प्रचंड उद्योगाचा, प्रदीर्घ प्रयत्नांचा आता शेवट झालाय. पण का कोण जाणे, या जुन्या रुळांच्या नाहीसे होण्यामुळे त्यांच्या मनात बांधकाम संपल्याची स्पष्ट जाणीव निर्माण झाली.

पंपिंग स्टेशनवर खूप माणसे होती. प्रचंड प्रॉपेलर पंपांची जुळणी पूर्ण झाली होती. आज रात्री ती चालवून पाहयची आणि चालू स्थितीत टेस्ट करायची असे ठरले होते.

तंत्रज्ञानी यंत्राच्या रचनेवरून एकदा शेवटची नजर टाकली. झिमल्यानोय आणि कार्पोव प्रथम ॲप्रोचिंग कॅनॉलवर गेले. डॉनच्या पाण्याला पंपिंग स्टेशनकडे वाट करून देण्यासाठी सक्शन ड्रेज तिथला शेवटचा मातीचा बांध काढत होते. सगळं ठीक आहे अशी खात्री झाल्यावर झिमल्यानोय कार्पोवसह पंपिंग स्टेशनच्या इमारतीत गेले. नंतर ते पाणी सोडण्याची साधने बसवलेल्या जागी, लहानशा काँक्रिटच्या खोलीत गेले.

तिथे खूप उजेड होता. छतावरचा दिवा चकचकीत बंगाली दिव्यासारखा लखलखत होता. बाहेरच्या बाजूने काचांवर फार जलद बर्फ वितळत होते. त्याचे वेडेवाकडे ओहोळ खाली वाहत येत होते. असे वाटत होते, की त्या दिव्याच्या असह्य उजेडामुळे बर्फ इतक्या भरभर नाहीसे होत होते.

वृद्ध तंत्रज्ञ झाखार पेत्रोविच यंत्रांजवळ कामात गुंतलेले होते. त्यांनी चष्म्यावरून झिमल्यानोयकडे पाहिले आणि म्हणाले,

" नमस्ते ! सगळं अचूक आहे की नाही याची खात्री करून घेऊ आणि लगेच सुरू करू. माझ्या समजुतीप्रमाणे अचूकपणा हा तांत्रिक प्रगतीचा पाया आहे कॉम्रेड झिमल्यानोय ! "

" फार अस्वस्थ झाला आहात का ? " झिमल्यानोयनी विचारले.

" तुमच्या इतकाच. जास्त नाही. " झाखार पेत्रोविचनी उत्तर दिले. " कसं का होईना, नवीन तांत्रिक ज्ञान पैदा होतं आहे. ते गोळा केलं पाहिजे; त्याला ओळ लावली पाहिजे. जशी आई मुलाची प्रवासाची तयारी करून देते तशी– काळजीपूर्वक, मनापासून ते काम केलं पाहिजे. हे हृदयच पाहाना ! अगदी नाजूक यंत्र ! हृदयाची झडप तसूभर हलवा, सगळं खलास ! मरण ठरलेलं ! माणसाला फक्त एकच हृदय असतं, पण

आमच्या प्रत्येक यंत्राला अनेक हृदयं असतात. त्यांचा प्रत्येक ठोका नीट वाजला पाहिजे. ”

त्या वृद्ध तंत्रज्ञाचा युक्तिवाद झिमल्यानोयनी ऐकून घेतला आणि ते हसले. नवीन तांत्रिक चाचणीच्या वेळी वाटणाऱ्या असह्य चिंतेचा अनुभव त्यांनी आतापर्यंत अनेक वेळा घेतला होता. शेवटी सगळं काही व्यवस्थित लागी लागेल हे त्यांना माहीत असायचं. तरी ती चिंता टाळू शकत नव्हते ते.

झिमल्यानोयनी खिडकीकडे पाहिले. आता बर्फ पडत नव्हते. का कुणास ठाऊक पण त्यामुळे ते शांत झाले. जणू काही बर्फ पडण्या न पडण्याचा आणि पंपिंग स्टेशनच्या कामाचा काही संबंधच होता !

बोलण्याचे आवाज ऐकू आले. काही इंजिनियर आणि तंत्रज्ञ यांच्यासह बासार्गिन खोलीत शिरले.

प्रखर उजेडामुळे त्यांनी डोळे किलकिले केले. खिशातून रुमाल काढून ओला चेहेरा पुसला.

“ मला दम निघाला नाही.” त्यांनी झिमल्यानोयना सांगितले आणि एक दीर्घ श्वास घेतला. “ उद्या स्टेशन सुरू व्हायच्या वेळीच येणार होतो. पण पुन्हा पहिली चाचणी पाहायचं ठरवलं. आणि वेळही होता. ”

“ शेवटचा बांध आताच काढला. ” झिमल्यानोयनी सांगितले. “ डॉनच्या पाण्याने स्टेशनची चेंबर्स भरून गेली आहेत. ”

“ अस्सं ! ” बासर्गिन म्हणाले आणि टेबलाजवळ आले. सगळेजण ते काय सांगताहेत याची वाट पाहत राहिले. पण ते विचारात गढून गेले. फक्त टेबलावर पडलेल्या सिगरेटच्या मोकळ्या डबीवर बोटाने अगदी हळूहळू टकटक करत राहले.

हजारो कामगारांनी केलेल्या अगणित परिश्रमांबद्दल ते विचार करत होते. या हजारो लोकांच्या परिश्रमात, मातीच्या टाकलेल्या हजारो पाट्यांत, अनेक क्यूबिक मीटर काँक्रिटमध्ये, इलेक्ट्रोव्हायब्रेटर्सच्या हजारो घावांत एका शेवटच्या घावाची भर पडते, मातीचे शेवटचे बकेट टाकले जाते आणि त्याच क्षणाला ते काम संपते, पूर्ण होते. त्यानंतर ती वास्तू स्वतःचे असे गुंतागुंतीचे, विशाल जीवन जगू लागते. पावसाचा शेवटचा थेंब शोधणे कठीण आहे, नव्हे, ते जवळ जवळ अशक्यच आहे. त्याचप्रमाणे वास्तूत प्राण ओतणारा माणसाचा शेवटचा हात जाणून घेणे अशक्य आहे !

“ हं ! सुरू ! हा शब्द जणू काही अगदीच साधा शब्द आहे. पण त्याच्यामागे केवढे परिश्रम असतात ! ” बासार्गिन म्हणाले.

झिमल्यानोय उठले. त्यांनी बासार्गिनना विचारले, “ पहिला पंप सुरू करायला परवानगी आहे का ? ”

“ दाबा बटन ! ” बासार्गिन म्हणाले.

झिमल्यानोय स्विचबोर्डकडे गेले. त्यांनी बटनावर बोट ठेवले आणि वळून पाहिले. उघड्या दारापलीकडे कामगारांचा घोळका जमला होता. त्यात झिमल्यानोयना क्लावा, गर्माश, प्रोखोरोव आणि लालसर चेहेऱ्याचा, सदा उत्साही असलेला गर्माश झेंझिनोव दिसला.

" भाग्यवान आहोत आम्ही ! " झाखार पेत्रोविच म्हणाले आणि त्यांनी डोक्यावरची हॅट काढून हातात घेतली.

झिमल्यानोयनी बटन चालू केले. ते ताबडतोब जणू हलक्या आवाजात गुणगुणू लागले. हळूहळू त्या गुणगुणण्याचे रूपांतर चढत्या सुरात, यंत्राच्या दणकट पण हव्याशा वाटणाऱ्या आवाजात झाले. झिमल्यानोय यांच्या पायाखालच्या जमिनीखाली पाणी उसळू लागले, धडका देऊ लागले.

त्यांनी आपला हात अजून बटनावरच ठेवला होता. त्याला पंपाची थरथरती धडधडती गती जाणवत होती.कार्पोव खिडकीजवळ आले. त्यांनी खिडकीचे दार वर उचलले. पडणाऱ्या पाण्याच्या लोंढ्याची खळबळ आणि गडगडाट खोलीत घुसला. डॉनच्या पाण्याने कालव्यावरचा पाण्याचा पहिला खजिना भरला होता. पंपिंग स्टेशनवर जळणाऱ्या लाल ताऱ्याचा प्रकाश जणू प्रवाहाबरोबर वाहत जाण्यासाठी पाण्यात मिसळत होता आणि लगेच माघारी फिरत होता.

रात्रीची शांतता, भारून टाकणाऱ्या पाण्याची जिवंत धडकन ऐकून सगळे स्तब्ध झाले. समुद्राच्या भरतीच्या आवाजासारखा तो आवाज साऱ्या स्टेपभर पसरला.

त्याचवेळी सिदेरेंको आजी आपल्या घरात जागी झाली. ती धडपडत उठली, तिने रुमाल कसातरी डोक्याला बांधला आणि ती खिडकीजवळ आली. तिने खिडकीला तोंड टेकवून बाहेर पाहिले, पटकन ती मागे वळली आणि ओरडली, " कोंद्रात ! "

" काय झालं ग ?" अर्धवट जाग्या झालेल्या म्हाताऱ्या सिदेरेंकोने घाबरून विचारले.

" ऊठ कोंद्रात ! स्टेपमध्ये पाणी आलं ! वाट पाहिल्यासारखं आलं शेवटी पाणी ! "

पाण्याचा धीरगंभीर आवाज दमदारपणाने आणखी आणखी जमीन व्यापत पुढेच धावत होता. जणू या आवाजानेच घराघरांतले दिवे पेटले. लोक जागे होऊन बाहेर अंधारात घुसले आणि एकमेकांना ओरडून सांगू लागले, " पाणी आलं ! ऐका ! " सबंध वस्तीवरची कुत्री अस्वस्थ होऊन भुंकू लागली उत्तेजित झालेले कोंबडे अवेळी ओरडून एकमेकांना साथ देऊ लागले. धशात घास अडून घुसमटलेल्या गाई " आम्हाला या अंधाऱ्या गोठ्यातून बाहेर येऊ द्या. " असे हंबरून सांगू लागल्या.

पाणी धावतच होते. काळोखी रात्र असूनही लोकांना पाण्याची हालचाल दिसत होती. शुभ्र बर्फाने आच्छादलेल्या कोरड्या खळग्याच्या तळात पाण्याचा काळा काळा डाग झपाट्याने मोठा होत होता. तो काळा डाग पसरत होता. आणि पसरता पसरता किनाऱ्याला जाऊन भिडला. पाण्याने बर्फ गिळून टाकले. ते चुरचुर आवाज करत पाहता.

पाहता विरून गेले. त्या उथळ पाण्याच्या साऱ्या विस्तारावर पंपिंग स्टेशनचे दिवे चमचमत होते, हिंदकळत होते.

धुक्याने गुरफटलेली शांत सकाळ उगवली. रात्रीत बर्फ वितळून गेले होते. कुठून ते कळत नव्हते, पण ओलसर जमिनीतून की पाण्याचा खजिना भरून टाकणाऱ्या पाण्यातूनही असेल, वसंताच्या आगमनाचा गंध पसरत होता. तो गंध जमिनीवर पसरलेल्या पाचोळ्याचा, ओलसर जाळ्यांचा, जमिनीतल्या कडवट मुळयांचा होता.

ढगांच्या विरळ थरातून फिकट सूर्यकिरण शिरत होते. त्या किरणात नुकत्याच जन्मलेल्या तलावाचा गुळगुळीत पृष्ठभाग पांढऱ्या वस्त्राप्रमाणे चमचमत होता. वाढते पाणी तालबद्ध दमदार आवाज करत होते.

## भरत वाक्य*

ठरलेला दिवस उगवला. बांधकाम पूर्ण झाले. नव्या जलमार्गाचे उद्‌घाटन झाले. लोकांनी उरलेले बांधकामाचे वासे काढून नेले. धरणाच्या प्रवेशद्वाराच्या भव्य विजय कमानी तिच्या दिमाखदार वास्तुसौंदर्याने आणि भव्यतेने दक्षिण आकाशात शोभू लागल्या.

नुकत्याच जन्मलेल्या आणि लाटांचा मंजूळ आवाज करणाऱ्या डॉन समुद्रावरच्या धुक्यातून सूर्य प्रथमच वर आला.

या भव्य दिव्य वास्तूसाठी ज्या ज्या व्यक्तीने आपले हृदय ओतले होते, आपले श्रम दिले होते ती प्रत्येक व्यक्ती इथे मूक होई, विचारमग्न होई. ती व्यक्ती कशाबद्दल विचार करीत असे ? तिच्या मनात विचार येई, की स्वतःचे ध्येय मूर्त रूपात साकार होण्यासारखे कोणतेच मानसिक समाधान या जगात नाही ! आपल्या बांधवांचे आणि आपल्या भावी वारसांचे ऋण आपण पुरेपूर फेडलेले आहे. नुसते मातृभूमीवर प्रेम करण्याने काम भागत नाही, तर असे जगले पाहिजे, असे काम केले पाहिजे की मातृभूमीच आपल्यावर प्रेम करेल !

झिमल्यानोय यांच्या विभागातले कालव्याच्या प्रवेशद्वारावरच्या विजयकमानीचे बांधकाम नुकतेच पूर्ण झाले होते. कॉंक्रिटचे काम करणाऱ्यांची आणि तंत्रज्ञांची जागा आता शिल्पकार, मूर्तिकार आणि ब्रॉंझच्या कारागिरांनी घेतली होती.

झिमल्यानोय मोठ्या आवडीने वास्तुशास्त्रीय रेखाटने पाहत होते. सध्या त्यांची खोली संगमरवराच्या, ब्रॉंझच्या आणि चिनी मातीच्या मूर्तीच्या नमुन्यांनी विखुरलेली होती.

"हे बांधकामावरचे शेवटचे पाहुणे आहेत." झिमल्यानोय थोड्या उदासपणे म्हणायचे.

खरोखरीच ही बांधकामाची शेवटची सामग्री होती. या अद्वितीय वास्तूला चालू

युगाचा आशय आणि विलक्षण प्रमाणबद्धता प्राप्त करून देण्यासाठी ही सामग्री मागवण्यात आली होती.

कमान तयार झाली होती. झिमल्यानोय बासार्गिनची वाट पहात होते. प्रकल्प प्रमुखांनी दिवस संपता संपता यायचे कबूल केले होते.

आता तर अंधार पडायलाही सुरुवात झाली होती. पण बासार्गिन मात्र आले नव्हते. झिमल्यानोय अस्वस्थ होऊ लागले. बासार्गिननी ही कमान सूर्यास्ताच्या वेळी पाहावी अशी त्यांची इच्छा होती. मावळत्या सूर्याच्या प्रकाशात ती टणक, काळपट सोन्यापासून बनवल्यासारखी वाटायची.

क्लावा झिमल्यानोयकडे आली. गेल्या महिन्याभरात ती पार बदलून गेली होती. जास्त शिस्तीची झाली होती. तिचे डोळे हल्ली शांत आणि पारदर्शक दिसायचे. पूर्वीचा अभिनिवेश आता त्यात नव्हता.

" आमची क्लावा आता मोठी झाली. " झिमल्यानोयच्या मनात विचार आला. पण ते मोठ्याने म्हणाले, " निघायच्या तयारीला लागलीस ? "

" हो. उद्या मॉस्कोला जाणार आहे. पुढे शिकणार आणखी, कॉम्रेड झिमल्यानोय. '

. " ठीक आहे. हे बघ आपलं भाग्य हातचं सोडू नको. "

त्यांनी हस्तांदोलनासाठी हात पुढे केला. क्लावाने झिमल्यानोयचा हात पकडला आणि त्यावर कपाळ टेकले.

" हे काय ? " झिमल्यानोय कठोरपणाने म्हणाले. " भाग्य मिळवणं इतकं अवघड नाही ! पण ते जतन करणं मात्र जास्त अवघड आहे. "

दारापलीकडे आवाज ऐकू आले. क्लावाने झिमल्यानोयशी मनापासून हस्तांदोलन केले आणि नेहमीसारखी मुद्रा धारण केली. कार्पोव आत आले.

" काय हे या बासार्गिनचं ? काय विचार आहे त्यांचा ? धूर ओकणाऱ्या दिवटीच्या प्रकाशात कमान पहायचा विचार आहे की काय त्यांचा ? क्लावा, पोरी नमस्ते ! उडून जाणारा पक्षी तू ! " ते झिमल्यानोयकडे वळले आणि म्हणाले, " तू या संगमरवर आणि ब्रॉंझच्या मूर्तीमध्ये बटालियनच्या प्रमुखासारखा दिसतो आहेस. असं तुझं चित्र काढायला हवं होतं. अतिशय बोलकं चित्र तयार झालं असतं ! "

कार्पोवनी काळ्या रंगाच्या रेषा असलेला गुलाबी संगमरवराचा तुकडा उचलला आणि हातावर झेलून वजन अजमावत म्हणाले.

" किती अद्भूत आहे ही वस्तू ! "

मला मायकोवस्कीची एक गोष्ट आठवली. एका रात्री तो गाडीतून मॉस्कोच्या एका रस्त्यावरून जात होता. त्याला एका दुकानावर पाटी दिसली " स्काझचनीये मतिरि आली " ( अद्भुतरम्य चिजा ) ! घरी गेला तरी तो सारखा त्या पाटीचाच विचार करत होता. त्याने आपल्या कल्पनेतल्या अद्भुतरम्य चिजांवर एक कविता रचली.

खरोखरीच तशी पाटी आहे की नाही ते पाहण्यासाठी तो पुन्हा सकाळी त्या दुकाना-जवळ गेला. तिथं त्याला पाटी दिसली 'स्माझचनोये मतिरिआली' (लुब्रिकेटिंगचे सामान). अशी होती ती गोष्ट!"

"कशासाठी तू ही गोष्ट सांगितलीस?" कार्पोवनी विचारले. "कसं तुझं डोकं चालतंय तेच मला कळलं नाही."

"मला असं म्हणायचंय की अद्‌भुतरम्य वस्तू आणि लुब्रिकेटिंगच्या वस्तू यांत काही फरक नाही. अद्‌भुतरम्य वस्तू काही जास्त महत्त्वाच्या नाहीत. आणि मला असं दाखवायचंय, की सर्वांत अद्‌भुतरम्य वस्तू हे ब्रॉंझ किंवा संगमरवर नसून कॉंक्रिट आहे. ब्रॉंझ आणि संगमरवरी वस्तू नुसत्या शोभेच्या!"

कार्पोव काही बोलण्याच्या विचारात होते. पण तेवढ्यात प्रोखोरोव खोलीत आला. त्याच्या मागोमाग गर्माशही आला. आणि मग संभाषणाला अगदी वेगळे वळण लागले. पाण्याच्या खजिन्यातले पाणी आता कसे स्वच्छ व्हायला लागलेय याबद्दल बोलणे सुरू झाले.

बासार्गिन चांगला अंधार पडल्यावर आले. दिलगिरी प्रदर्शित करून ते म्हणाले, "मॉस्कोशी टेलिफोनवरून चाललेल्या संभाषणामुळे मी अडकून पडलो. रात्री सुद्धा कमान पहायला काही हरकत नाही! आपण सर्चलाईट लावू." त्यांनी जरा भीत-भीतच सुचवले.

"छान आहे कल्पना!" झिमल्यानोयनी पुष्टी दिली.

सगळेजण कमानीकडे गेले. स्टेपच्या विस्तीर्ण प्रदेशावरचा दिवसाचा शेवटचा प्रकाशही लुप्त झाला होता. कमानीची प्रचंड आकृती काळ्यावर काळपट दिसत होती.

शुद्ध चांदीच्या हजारो तारांनी विणल्यासारखा सर्चलाईटचा शुभ्र प्रकाश कमानीच्या पायाशी पडला. तिथून तो तिच्या भव्य पायावरून, स्तंभाच्या, स्थिर बाह्यरेषांवर फिरू लागला. नंतर स्तंभांच्या सौम्य चमक असलेल्या ब्रॉंझच्या ओतीव शोभिवंत गोलाई-वरून कमानीच्या वरच्या रुंद भागावरून फिरू लागला.

सगळे जण अवाक् होऊन त्या भव्य शोभिवंत कमानीकडे पाहत होते.

"शाबास!" शेवटी बासार्गिनच प्रथम बोलले आणि त्यांनी सिगरेट काढली. जळती काडी धरलेला त्यांचा हात थरथरत होता. "या भव्य प्रकल्पाचे काम संपल्याबद्दल कॉम्रेड्स, मी तुमचे अभिनंदन करतो आणि आभारही मानतो! माझ्या वतीने आणि सगळ्या-सगळ्यांच्या वतीने! माझ्या लहानग्या मुलाच्या वतीने सुद्धा. त्याला मी जरूर इथे घेऊन येईन. सगळ्यांबरोबर त्यालाही या अवर्णनीय आनंदाचा आस्वाद घेऊ दे!"

बासार्गिन चटकन् वळले आणि अंधारात माळावर गाडी उभी होती तिकडे गेले.

झिमल्यानोव काही पावलं त्यांच्या मागोमाग गेले. पण ते थांबले. त्यांना जाणवलं, की यावेळी बासार्गिनशी कशाबद्दलही बोलायला नको. त्यांना एकटंच राहू देणं बरं!

प्रकल्पाचे बांधकाम एखाद्या जिंकलेल्या लढाईची आठवण करून देत होते. बांधकाम संपल्यावर ओघानेच या स्टेप प्रदेशात गाढ शांतता प्रस्थापित झाली. फक्त माणूसच विसावा घेत विचारात गढून गेला होता असे नाही, तर निसर्गही आपल्या भावी उत्कर्षाच्या कल्पनेत रंगून गेला होता, शांत झाला होता.

सबंध स्टेप प्रदेश एका शांत तेजस्वी वातावरणात पहुडला होता. उन्हाळी दिवस त्यावरून मंद गतीने जात होते. डॉनवर आणि आझोव समुद्रावर नीरव शांतता पसरली होती. जणू काही तिने धूसर प्रकाशातूनच जन्म घेतला होता. ही नीरवता इतकी गाढ होती की वाऱ्याच्या मंद झुळकांना मासेमारी होड्यांच्या शिडांनांच नव्हे तर प्योत्र सोफ्रोनोविचच्या घरातील खिडकीच्या पातळ पडद्याला सुद्धा धक्का लावायची हिंमत होत नव्हती.

अशा त्या सकाळी लेल्या फार लवकर जागी झाली. अगदी सूर्योदयाच्या मुहूर्तालाच. नतालिया पेत्रोवना अजून झोपेतच होत्या. पण प्योत्र सोफ्रोनोविच आजोबा मात्र जुन्या स्टुलावर आरसा ठेवून एका स्टुलावर बसून दाढी करत होते.

परसदारच्या बागेतून तंबाकूच्या फुलांचा वास येत होता. रात्र सरली तरी ती अजून मिटली नव्हती. ती पूर्वेकडच्या ताऱ्यांप्रमाणे शुभ्र आणि थिजून गेलेली दिसत होती.

लेल्याने घाईघाईने कसेतरी कपडे चढवले, टर्किश टॉवेल घेतला आणि समुद्राकडे निघाली.

तांबूस रंगाचं मांजर घराच्या उंबरठ्यावर व्हरांड्याकडे पाठ करून ध्यानस्थ बसलं होतं. लेल्या त्याच्याजवळून गेली तरी त्यानं वळून सुद्धा पाहिलं नाही. फक्त त्याने कळे न कळेशी शेपटी हलवली.

"आजोबा!" लेल्याने प्योत्र सोफ्रोनोविचना विचारले, "तुम्हाला काय वाटतं? हे आपलं मांजर कशाबद्दल विचार करत असावं?"

"ते विचार करतेय की जीवन हे काहीतरी करण्यासाठी आहे. माळभर भटकण्यासाठी नाही!" प्योत्र सोफ्रोनोविचनी उत्तर दिले आणि ते खो खो हसत सुटले. लेल्याही हसू लागली. तिने आजोबांच्या केसांचा मुका घेतला आणि ती ओलसर वाळूवरून पळत घरापासून दूर गेली रात्रभर समुद्राने विश्रांती घेतली होती. कालची दिवसभराची उष्णता जाऊन तो थंड झाला होता. पाणी अजून उदास पण पारदर्शक दिसत होते. वाळू पाण्याच्या जाड थराखाली हिरवटसर दिसत होती.

लेल्या खाली वाकली आणि तिने पाण्याच्या अगदी जवळून बोटाने वाळूत एक खोल रेघ ओढली. इथून या रेघेपासून समुद्र सुरू होत होता. त्यावर एक सुद्धा लाट उठत नव्हती. किंबहुना त्याने लेल्याच्या बोटाची खूण सुद्धा पुसून टाकण्याचा प्रयत्न केला नाही. जणू कुरकूर न करता तो माणसाचं ऐकत होता.

"हे असंच घडेल. मनुष्य वाऱ्याला आणि पावसालाही आपल्या मनाप्रमाणे

करायला शिकवील !" लेल्या मनात म्हणाली.

लेल्याच्या मनात विचार आला, माणूस समुद्रांना आठवडेच्या आठवडे गप्प बसायला भाग पाडील. निळसर हवेच्या पट्ट्याने निर्वात वातावरणात लपेटून ठेवील. वसंत ऋतूला तो थांबवील आणि या किनाऱ्यांवर त्याला अखंड वस्ती करायला लावील. माणसाने नव्याने घडवलेली ही भूमी उबदार ओलाव्यात सूर्याच्या प्रकाशामुळे फुलून निघेल. वनेउपवने आपल्या काळपट पर्णसंभाराने या भूमीवर छत्र धरतील; भूमी एका नव्या उद्योगात गुंतून राहील. त्या उद्योगाला अजून कोणतंच नाव दिलेलं नाही. पण तो उद्योग म्हणजे देशाच्या नकाशावर नवनव्या सुपीक जमिनी निर्माण करणे !"

"खरंच का मी हे सगळं पाहू शकेन ?" लेल्याच्या मनात विचार आला आणि तिचे हृदय भरून आले. "नक्कीच पाहू शकेन ! आजोबा म्हणतात त्याप्रमाणे असले भाग्याचे खूप दिवस भविष्यात माझी वाट पाहताहेत. या अज्ञात दिवसांच्या पोटी कोणता आनंद दडलेला आहे कोण जाणे !"

ती भविष्यातल्या त्या दिवसांची चोरट्या अधीरतेने वाट पहात होती. कदाचित दूर कुठून तरी एक तरुण येईल, आपला बळकट हात पुढे करील, त्या हातावर ती आपले हृदय हळूच ठेवील.

पण अजून तरी तिला तो तरुण कोण असेल हे माहीत नव्हते, किंबहुना त्या तरुणाचे नावही तिच्यापासून दडवलेलं होतं.

"मग माझ्या नावाशी तुला काय करायचंय ?" लेल्याच्या तोंडून प्रश्न उमटला. तिचे तिलाही कळले नाही हे शब्द आपल्या डोक्यात कुठून आले ते ! तिच्या तोंडून कवितेच्या ओळी बाहेर पडल्या.

किनाऱ्यावर दूरदूरच्या
बागडणाऱ्या सागराच्या
उदास सुरांप्रमाणे लाटांच्या
विरून जाईल शब्द त्याचा !

ती हळूहळू घरी निघाली. या ओळी आपल्याला एकदम का आठवल्या याबद्दल ती तर्क करू लागली. आता दूरवरून एक लाट वाळूवर पळत आली. तिने खळखळाट केला आणि ती एकाकी लाट नष्ट झालेली आपण पाहिली त्यामुळे असेल कदाचित !

पूर्वेकडे पाहत लेल्या चालली होती. तिथे सूर्याचा शुभ्र गोल वर चढत होता. घराजवळ अंगणात हातपाय धुताना नतालिया पेत्रोवना प्योत्र सोफ्रोनोविचना काय म्हणत होती ते तिच्या कानावर आले.

"तुम्हाला कुठून कळल तो आज इथे येईल म्हणून ?"

"आम्हाला सगळयाचा पुरता पत्ता असतो !" प्योत्र सोफ्रोनोविचनी उत्तर दिले.

" तर लेल्याला आवरून तयार राहू दे. आपल्या कुटुंबाचा तो मोठा सन्मान आहे ! "

" कुठे जायची तयारी करायची मी आई ? " लेल्याने विचारले.

" घरात चल. मी तुला सगळं सांगते. " आई म्हणाली.

घरात झालेले संभाषण अगदीच छोटे होते.

" मला वाटतच होतं की आज असं काहीतरी घडेल म्हणून ! मी जागी झाले, डोळे उघडले आणि लगेच मला तसं वाटलं. ओ होऽऽ ! किती छान झालं आई ! " लेल्या बोलत सुटली.

प्योत्र सोफ्रोनोविचच्या घरातल्या संभाषणानंतर फक्त त्यांच्याच घरात नाही, तर सबंध पेत्रुशिन भूशिरावरच्या सगळ्या घरांत नवे चैतन्य संचारले. सामुदायिक शेताच्या अंगणात घाईघाईने उघडल्या जाणाऱ्या पेट्यांचा आवाज ऐकू येत होता. तीक्ष्ण नजरेची मुले किनाऱ्याजवळच्या टेकडीवर गेली आणि तिथून समुद्रावर निरखत राहिली. " अझोवकन्या " या लॉंचचे लोखंडी भाग साफ करण्यात आले. इंजिन तपासण्यात आले. कोळयांनी गुळगुळीत दाढ्या केल्या. स्त्रियांनी अवजड संदुकींची झाकणे उघडून रंगीबेरंगी पोशाख आणि शाली बाहेर काढल्या. इस्त्रीचा निळा धूर घराच्या बागांवर तरंगू लागला. अस्वस्थ झालेली मांजरे रागावलेल्या मालकिणींपासून दडण्यासाठी उठून घराबाहेर पळाली. " शूऽऽक, शूऽऽक ! सकाळभर पायात–पायात घोटाळतंय् मेलं ! "

कोळयांच्या तरुण मुलांनी करड्या रंगाचे सूट घातले. मुलींनी फिक्कट रंगाचे फुलाफुलांचे फ्रॉक आणि चढाव घातले.

लेल्यानेही आपला सर्वात उंची फ्रॉक घातला. पहिल्यांदा तिने आपल्या केसांची गाठ मागे बांधली होती. पण तिला ते पसंत पडले नाही म्हणून तिने पुन्हा नेहमीसारख्या लांब लांब वेण्या वळल्या.

कपडे करतांना एकदाही तिच्या चेहेऱ्यावर हसू उमटले नाही. तिचा चेहेरा कठोर पण फिकट दिसत होता. जणू ती जीवनातल्या एखाद्या अत्यंत महत्त्वाच्या प्रसंगासाठी तयारी करत होती.

प्रत्येकजण आपापल्या परीने अधीर, अस्वस्थ होता. प्योत्र सोफ्रोनोविचना एकदम आपल्या बायकोची–नतालियाच्या आईची आठवण झाली. त्यांच्या डोळ्यात क्षणभर अश्रू तरळले. त्यांचे हे सुख पहायला, आपल्या शास्त्रज्ञ मुलीला आणि सुंदर नातीला पाहून आनंद उपभोगायला ती आपल्यात नाही या विचाराने त्यांचे मन कष्टी झाले.

" शांत होती अगदी बिचारी ! शांत, त्या कणसासारखी होती ! " प्योत्र सोफ्रोनोविच पुटपुटले.

नतालिया पेत्रोवनालाही आपले दूरचे बालपण आठवले. इतके दूरचे, की जणू त्यांनी त्याबद्दल एखाद्या जुन्या पाने गळलेल्या पुस्तकातच वाचले असावे. कोळयांच्या

रीतीप्रमाणे आज आपणही अंगावर शाल घ्यायची असं त्यांनी ठरवलं. आपल्या आईची शाल !

त्यांनी संदूक उघडली, जुने रुमाल, सुकलेले गजरे, रिबिनी, जुन्या रूसोजपानी युद्धाच्या वेळचे फोटो यांच्यामधे त्यांना ती शाल सापडली. काळ्या शालीवर तपकिरी गुलाबी फुले असलेली ! त्या शालीखाली त्यांना आपल्या दोन चिंध्यांच्या बाहुल्या सापडल्या–अदार्का आणि गस्पोदार्का ! त्यांच्यात त्यावेळेपेक्षा काहीही बदल झाला नव्हता. आणि त्या अजूनही डांबराने कोरलेल्या भुवया उंचावून आश्चर्याने पाहिल्या-सारख्या बघत होत्या.

नतालिया पेत्रोवनांनी लेल्याला बोलावून त्या बाहुल्या दाखवल्या. लगेच तिने लहान मुलीसारखी त्या बाहुल्यांशी खेळायला सुरुवात केली. त्यांच्या डोक्याला रंगीबेरंगी चिंध्यांचे रुमाल बांधले, त्यांच्या गालाला लाली लावली आणि त्यांच्याशी काहीबाही बोलत राहिली. नतालिया पेत्रोवनांनी त्या घेऊन संदुकीच्या तळाशी टाकीपर्यंत ती त्यांच्याशी खेळत राहिली.

इग्नातीय मुसियेविच सकाळपासूनच आपल्या म्हातारीशी आपल्या हरवलेल्या ' हेलमेट ' वरून भांडत होता. अझोवचे कोळी आपल्या समुद्रावरच्या, काळी फ्लॅप असलेल्या टोपीला हेलमेट म्हणत.

म्हातारीने त्या टोपीला फडतूस म्हटले त्यावरून हे भांडण सुरू झाले. ती म्हणाली, " हल्ली सगळे लोक आणि कोळ्यांच्या सामुदायिक शेताचा अध्यक्ष, हिशेब तपासनीस, मशीन ड्रायव्हर समारंभाच्या वेळी टोपी घालून येतात. सगळ्या टोप्यांत हिरवी लोकरीची टोपी छान दिसते. " आणि इग्नातीय मुसियेविचने आपल्या जुन्या हेलमेटचाच हट्ट धरला.

" ही टोपी जनतेची आहे हे लक्षात ठेव. आणि थेट कामचात्कापर्यंत अझोवचे कोळी याच टोपीवरून ओळखले जातात ! मला मुळीच नको तुझी दुसरी टोपी ! सांगून ठेवतो तुला ! " रागाने इग्नातीय मुसियेविच ओरडले.

पण लवकरच हेलमेट सापडले आणि म्हाताऱ्यांचा समेट झाला.

टेकडीवरची मुले सर्वांत जास्त अस्वस्थ होती. डोळ्यांवर पंजे ठेवून दुधाळ पांढऱ्या क्षितिजावर ती निरखून पहात होती. उन्हाने ते क्षितिज डोळ्यात घुसणाऱ्या प्रकाशाने तळपत होते. पण त्या विस्तीर्ण भागावर काहीही दृष्टीस पडत नव्हते.

" तिमिऱ्याझोव " बोट बातुमीहून मॉस्कोला चालली होती. ती हलक्या पण बळकट आवरणाची सरोवरावरची नवी बोट होती. पावेल पेत्रोविच खमारा " तिमिऱ्याझोव " बोट चालवत होता. या मार्गावरून पहिली बोट नेण्याचे काम त्याच्यावर सोपवण्यात आले होते.

ही निवड अगदी योग्य आहे हे पटत असूनही काळ्या समुद्रावरचे कप्तान ख्माराचा थोडा हेवा करत होते. जरी इतर कप्तानांपेक्षा ख्मारा खूपच लहान असला तरी तो अनुभवी कप्तान होता. केवळ लहान वय म्हणून या ‘ सागरी सिंहाचा ’ पाय कुणी मागे ओढला नाही.

बोट कॉकेशसच्या किनारपट्टीजवळून जात होती तोवर ख्मारा शांत होता. इथले सगळे ओळखीचे होते. ओढाळ वारा फेसाळ लाटांचा पाठलाग करत होता. किनाऱ्यावरून पिवळसर अंधारात लपलेली सुखुमी– गुदाऊनी,– गाग्री–सोचीसारखी सुशोभित शहरे येत होती, जात होती.

हिरव्या झाडीत लपलेली लहानशी वस्ती मागे राहिली. तिथे ख्माराचा मित्र आपल्या यूर्का नावाच्या मुलासह राहात होता. कप्तानाच्या जागेवरून डोळे किलकिले करून ख्मारा या मागे पडणाऱ्या वस्तीकडे पहात होता. या वस्तीतल्या बागेत त्याने आपल्या आवडत्या मैत्रिणीला स्वतःच्या सफरींबद्दलच्या गोष्टी सांगितल्या होत्या.

जरी सगळे कप्तान – ख्माराचे मित्र – त्याला ‘ सागरी सिंह ’ म्हणत, तरी ते टोपणनाव फक्त परंपरेची देणगी होती. ख्माराला सारं अवघं तिसावं वर्ष चालू होतं. त्याच्या रापलेल्या चेहऱ्यावर, उजव्या गालावर वण होता. फिआदोसियामध्ये सैन्य उतरवताना झालेल्या जखमेची निशाणी होती ती !

बोट जसजशी डॉनच्या मुखाकडे जाऊ लागली तसतसा ख्मारा जास्तच अस्वस्थ होऊ लागला. त्याला स्वतःलाही या अस्वस्थतेचे कारण कळत नव्हते. जिथे वादळे नाहीत, मोठ्या लाटा नाहीत अशा शांतसखोल वोल्गातून बोट न्यायची झाली तरच खरोखरी खलाशी अस्वस्थ होत. किंवा नदीवरच्या कप्तानाला जर नदीवरची बोट समुद्रातल्या मार्गाने न्यायचे काम सोपवले तर गोष्ट वेगळी. त्यावेळी नक्कीच कप्तान खूप अस्वस्थ होईल.

ख्मारा आपली अस्वस्थता लपवत होता. पण लवकरच त्याची खात्री पटली, की फक्त आपणच नाही, तर असिस्टंट कॅप्टनपासून तो फायरमनपर्यंत बोटीचा सगळा नोकरवर्गच अस्वस्थ झाला आहे. त्या सगळ्यांच्या अस्वस्थतेचं कारण ऐकून तर ख्माराला हसूच आले. पण त्या हसण्यातसुद्धा काही भाग उत्कंठेचा होता.

ख्माराने एका जुन्या दुय्यम अधिकाऱ्याचे व्हीलसमनबरोबर चाललेले संभाषण ऐकले.

“ वोल्गावर कदाचित आपली फजिती होईल. ” काळजीच्या सुरात व्हीलसमन म्हणाला. “ अगदी नीट किनाऱ्याला लागायला खूप अनुभव हवा.”

“ बरोबर आहे तुझं म्हणणं. तिथला प्रवाह फार वाईट आहे. थोडासा जरी अंदाज चुकला तरी तो प्रवाह बोटीला वाहत नेऊन धक्क्यावर आपटेलसुद्धा. धक्क्याचं काही नुकसानसुद्धा होईल. तसं झालं तर त्या वोल्गावासीयांच्या या प्रांतात सगळे हसतील आपल्याला.” मदतनीस म्हणाला.

" नक्कीच हसतील." काळजीच्या सुरात व्हील्समनने दुजोरा दिला.

" काय मूर्खासारखं बोलताय ? अगदी क्षुल्लक गोष्टी आहेत या. त्याबद्दल विचार करायचंसुद्धा कारण नाही." ख्माराने त्यांना दाबले.

" उगीच काहीतरी बोलतोय आपलं आम्ही !" व्हील्समन पुटपुटला.

' तिमिऱ्याझोव ' जहाजाने आपल्या मागल्या भागात लिंबे आणि अंजिराच्या पेट्या, कॉकेशियन वाईन आणि मसाल्याचे पदार्थ मॉस्कोला नेण्यासाठी भरून घेतले होते. क्रिमियातली सफरचंदे आणि तंबाखूही होती.

अझोव समुद्राने बोटीचे स्वागत नीरव शांततेने केले. पिवळसर प्रकाश पाण्यावर साकळून राहिल्यासारखा वाटत होता. फक्त क्षितिजावर तो प्रकाश फिका पडल्यासारखा वाटत होता. बेग्लींत्सचा फिरता दीपस्तंभ त्यांनी कधीच मागे टाकला होता. हलका नैर्ऋत्य वारा लहान-लहान लाटा उठवत होता. समुद्र फेसाळत होता, गात होता.

दीपस्तंभाजवळ नांगरलेल्या कोळ्यांच्या होड्यांची फडफडती शिडे दिसायला सुरुवात झाली.

ख्माराने बोटीची नाकापासून शेपटीपर्यंत पुन्हा एकदा शेवटची पाहणी केली. संध्याकाळी ' तिमिऱ्याझोव ' नव्या जलमार्गावरच्या पहिल्या बंदरात प्रवेश करणार होती.

बोट धुवून पुसून आरशासारखी चकचकीत केली होती. बोटीवरच्या स्वच्छतेचा सराव असलेल्या ख्मारालासुद्धा असे वाटत होते की आपला डेकला, भिंतीला किंवा टेबलाला बोटाचा ओझरता जरी स्पर्श झाला तरी तिथे तेलकट डाग पडेल.

बेग्लींत्सचा दीपस्तंभ ओलांडून पुढे आल्यावर ख्मारा खाली आपल्या केबिनमध्ये आला. पाण्यावरच्या परावर्तित प्रकाशाने ती खोली भरून गेली होती. तिला तंबाखूच्या धुराचा मंद वास येत होता.

ख्मारा टेबलाजवळ बसला आणि त्याने हिरव्या कातडी वेष्टनाची वही जवळ ओढली. तो तिला आपले ' ड्यूटीबुक ' म्हणे. या वहीत तो कधी कधी आपले विचार लिहून ठेवी अगर वाचलेल्या पुस्तकांमधले उतारे उतरवून ठेवी.

सवयीने तो अशा प्रत्येक लिखाणावर ते ज्या ठिकाणी केले असेल त्या ठिकाणाचा बरोबर उल्लेख करी. या बाबतीत त्या वहीचे ' ड्यूटीबुकाशी ' खरोखरच साम्य होते. त्यापैकी एक लिखाण असे होते :

" २ डिसेंबर. रात्री ३ वाजता. याल्टाच्या किनाऱ्यावर. धूर. डेकवर बर्फाचा भुगा पसरलाय. किनाऱ्यावरून धुराचा वास येतोय. बागांमध्ये वाळकी पाने जाळून टाकली जात आहेत. उदास वाटतंय. असल्या हिवाळ्यात चेखोव इथे राहिला आणि त्यानं लिखाण केलं. आणि आता आम्ही खाद्यपदार्थांनी भरलेल्या बोटी घेऊन या किनाऱ्यावरून जातो, हिंदुस्थानात जातो, मुंबईला जातो. तिथं दुष्काळ आहे. तेव्हा जणू या बोटीलासुद्धा आपल्या या सफरीचा उदात्त उद्देश जाणवतो. ती धीमेपणाने लाटा कापत

जाते. बोटीच्या मागच्या भागातून दुर्बिणीतून चेखोवचं आउल्कामधलं सफेद घर आणि त्यात मंद जळणाऱ्या हिरव्या शेडच्या दिव्याचा प्रकाश खिडकीतून दिसतो. तो प्रकाश क्वचित अधिक चमकदार होतो. जणू आम्हाला तो शुभसूचक सिग्नल देतो. बहुधा तो आमच्या सफरीला शुभेच्छा व्यक्त करत असावा."

खमाराने ते टिपण वाचले. नंतर काही पाने उलटली आणि लिहायला सुरवात केली.

"अझोव समुद्रातला फिरता दीपस्तंभ पार केला. अगदी वेगळ्या आणि अपूर्वाईच्या मार्गाने जातोय आम्ही! बातुमीहून रोस्तोवला आणि तिथून पुढे डॉनवरून वोल्गा – डॉन कालव्यातून, आणि नंतर वोल्गातून मॉस्कोला. पाच वर्षांपूर्वी मनात तरी आलं होतं का, की आमच्या बोटीवरच्या छोट्या पुलावरून दीपस्तंभ आणि समुद्रावरचे धक्के, समुद्रातली भूशिरे आणि बंदरे याशिवाय सारातोव, उल्यानोव्स्क, प्लेस या सारखी गावे बर्चची जंगले, गवतांच्या उडव्या, काठावरच्या झोपड्या, समुद्रावरच्या बोटी कधीही न पाहिल्याने कुतूहलाने बोटीबरोबर पळणारी मुले, उत्तरेतले सायंकालीन देखावे आणि शेवटी क्रेमलीन दिसेल म्हणून? समुद्रापासून दूर असलेल्या मॉस्कोमधला प्रकाश, त्याची झळाळी, तिथली धावपळ बोटीवरच्या छोट्या पुलावरून आपल्याला पाहायला मिळेल असं वाटलं तरी होतं का?"

केबिनच्या दारावर कुणीतरी टकटक केले. खमाराने घाईघाईने वही बंद केली आणि तो ओरडला, "आत या!"

पहाऱ्यावरच्या खलाशाने सांगितले, की "मदतनिसाने कप्तानाला-खमाराला पुलावर यायला सांगितलेय्." नवलच आहे! काही बिघडलं तर नाहीना? पण असं होणं शक्यच नाही." खमाराच्या मनात विचार झाला.

तो पुलावर आला.

उन्हाने उजळून टाकलेल्या मातीच्या किनाऱ्यावर पडलेल्या तांबूससर छटेने संध्याकाळ होऊ लागली आहे हे लक्षात येत होते.

"काय झालंय?" खमाराने मदतनिसाला विचारले.

मदतनिसाने न बोलता बोटीच्या नाकाच्या बाजूला हात केला. एक मोठी समुद्रावरची लॉंच भरवेगाने आडवी येत होती आणि तिच्या मागोमाग आणखी काही कोळ्यांची शिडांची होडकी येत होती. कोळ्यांच्या होड्या मागे पडत होत्या. त्यांना वारा पुरेसा नव्हता.

लॉंचवर खुणेची निशाणे फडकली. ती बोटीचे एंजिन बंद करायला सांगत होती.

"याचा अर्थ काय?" खमारानं मदतनिसाला विचारले. पण त्याने फक्त खांदे उडवले.

लॉंच वेगाने जवळ येत होती. खमाराने टेलिग्राफ मशिनचे हॅंडल फिरवले. बाण सर्वांत हळू या खुणेवर स्थिरावला.

बोटीवरचे सगळे प्रवासी आणि खलाशी ज्या बाजूला लॉंच येत होती त्या डाव्या किनाऱ्याच्या बाजूला गोळा झाले. लॉंच 'तिमिऱ्याझोव'च्या जवळ येऊन पोचली. त्यातून एक उंच, तपकिरी रंगाचा सूट आणि विशिष्ट सागरी कॅप घातलेला म्हातारा तळवे तोंडाजवळ कर्ण्यासारखे जुळवून ओरडला.

"अहो कप्तानसाहेब! कोळयांच्या शिष्टमंडळाला मॉस्कोपर्यंत तुमच्या बोटीवर घ्या!"

"उघड्या समुद्रात बोटीच्या जवळ का आलात?" खमाराने विचारले.

"असंच! आमच्या कोळयांच्या नेहमीच्या सवयीप्रमाणे. आपल्या सर्वांच्यातल्या एकाच भ्रातृभावनेमुळे! म्हणून आता खोळंबा होईल अशी कारणं काढू नका." म्हाताऱ्याने उत्तर दिले.

"बोटीवर या!" असे म्हणून खमाराने टेलिग्राफ मशीन स्टॉपवर नेले.

बोटीच्या मागल्या टोकाखालून शेवटचे फेसाचे गोळे उठले आणि ती थांबली.

लॉंच 'तिमिऱ्याझोव' जवळ नांगरली. खलाशांनी दार उघडले. आणि लॉंचवर शिडी लावली.

खमारा पुलावरून पळाला आणि पाहुण्यांच्या स्वागतासाठी भरकन शिडीजवळ जायला निघाला. त्याला वाट देण्यासाठी सगळे बाजूला सरले. प्रवाशांच्या चकित नेत्रांनी आणि खलाशांच्या स्मिताने खमाराच्या कृतीला पसंतीची पावती दिली. जणू लोकांना म्हणायचे होते, "बघा आमचा कप्तान कसा उमदा आहे!"

शिडीवरून सर्वांत प्रथम इग्नातीय मुसियेविच आला. त्याने खमाराशी जोरजोरात हस्तांदोलन केले. आणि पेत्रुशिन भुशिरावरच्या कोळयांच्या सामुदायिक शेताच्या शिष्ट-मंडळातील प्रतिनिधींची ओळख करून देण्यासाठी खमाराजवळ उभा राहिला.

इग्नातीय मुसियेविचच्या मागोमाग ब्रिगेडची प्रमुख, पूर्ण निळया डोळयांची भुऱ्या केसांची, खाऱ्या हवेने सावळी दिसणारी मारूस्या चढली. कोळयांनी पोचे पडलेल्या काही पत्र्याच्या पेट्या बोटीच्या डेकवर घेतल्या.

"हे सुकवलेले सुदाक मासे आहेत. थोडे भाजलेले मासे, माशांची अंडी! मॉस्कोत देण्यासाठी. साऱ्या जगात मशहूर आहेत या चिजा. आमच्या भुशिरावरच्यासारखी मासे वाळवायची पद्धत कुठेच सापडायची नाही. या कामात धीर पाहिजे." इग्नातीय मुसियेविच बोलत होता.

खमाराने त्या पेट्या शीतगृहात ठेवण्याचा हुकूम दिला. शिडीवरून सर्वांत शेवटी चढली शेलाट्या बांध्याची, गवती फुलांचा मोठा गुच्छ घेतलेली मुलगी!

"आणि ही आमची लेल्या! आमच्यातल्या सर्वांत वृद्ध कोळयांची नात!" इग्नातीय मुसियेविचने सांगितले.

खमाराने लेल्याकडे पाहिले आणि तो हसला. लेल्या शिडीवरच थबकली आणि

फुलाचा गुच्छ छातीशी धरून थोड्याशा आश्चर्याने हसून तिने ग्रमाराकडे पाहिले. डेकवर जायला तिला एकाच पावलाची गरज होती. पण पुढे पाऊल टाकावं की नाही हा निश्चय न होऊन किंचित झुकून ती तिथेच उभी राहिली. नंतर ती असं हसली की जणू सूर्याचा सर्वांत तेजस्वी किरळ समुद्रावरून परावर्तित होऊन लेल्याच्या चेहऱ्यावर उतरलाय.

बिचकत बिचकत तिने ते शेवटचे पाऊल टाकले, गुच्छ पुढे केला आणि म्हणाली, "हे छान जमलं! याचा अर्थ कॉकेकसमध्ये जे सांगायला तुम्हाला सवड मिळाली नाही ते सगळं तुम्ही मला आता सांगू शकाल. खरंच, सांगाल?"

"खरंच सांगेन!" ग्रमाराने उत्तर दिले आणि गुच्छातली खाली पडलेली फुले उचलण्यासाठी तो वाकला. मोठ्या सफरींच्या कप्तानाला न शोभणारा असा जो गोंधळ त्याच्या मनात उडाला होता तो लपवण्यासाठी करता येण्याजोगी ती तेवढी एकच सर्वांत सोईस्कर कृती होती.

तो पुन्हा ताठ उभा राहिला तेव्हा त्याच्या रापलेल्या चेहऱ्यावरची निराळी छटा खलाशांच्या तीक्ष्ण दृष्टीलाच फक्त दिसू शकली असती. पण चाणाक्ष खलाशांना वाटले, की आपला कप्तान पडलेली फुले उचलण्यासाठी फार घाईने खाली वाकल्यामुळेच त्याचा चेहरा असा आरक्त झालाय. फक्त इग्नातिय मुसियेविचने खरे काय ते जाणले.

"जादुगारीण आहे!" इग्नातीय मुसियेविच उद्गारला.

पुढे जे सगळे घडले ते लेल्याला नंतर एखाद्या आश्चर्यजनक पण खरोखरीच पडलेल्या स्वप्नाप्रमाणे वाटत होते.

बोटीवरच्या सफरीचे दिवस कशासारखे होते असे तिला जर कुणी विचारले असते, तर लेल्याने काही तरी अगदी अनपेक्षित असेच उत्तर दिले असते. ते दिवस म्हणजे चांदण्याचा पाऊस होता असलंच काही तरी तिने सांगितलं असतं. लेल्याच्या डोक्यात नेहमीच अशा विचित्र उपमा येत. नतालिया पेत्रोवना लेल्याची ती मनःस्थिती पाहून भ्याली असती.

खरोखरीच बोटीच्या सफरीतील प्रत्येक दिवस बारकाईने पाहिला तर असे दिसेल की तो प्रत्येक दिवस आशयपूर्ण, महत्त्वपूर्ण आणि दीप्तीमान होता. ती दीप्ती नव्याने जन्माला आलेल्या डॉन समुद्रामुळे, ताज्या, नव्याने आलेल्या पालवीमुळे होती. फडफडणाऱ्या निशाणांची, रात्रीच्या आकाशाची, दिव्यांनी उजळलेल्या विद्युतगृहाची, नव्या नगरांची, मानव्याच्या राजधानीची, मॉस्को नगरीची होती!

त्सिमलाध्ये नाविक शाळेच्या गणवेशातला एक तरुण बोटीवर चढला. लेन्या बोब्रोव! तोसुद्धा मॉस्कोला जाणाऱ्या शिष्टमंडळातलाच होता.

लेन्याची इग्नातीय मुसियेविचशी झालेली भेट हृदयंगम होती. पण आगगाडीतल्या

प्रमाणेच तो या बोटीवर कसा आणि तो मॉस्कोत कशासाठी जातोय हे त्याच्याकडून काढून घेणे लेन्याला जमले नाही ! कुणी त्याला इथे पाठवलंय ?

" नंतर तुला इतकं कळेल की दुसऱ्या कशात लक्ष घालायला तुझी बुद्धीच तोकडी पडेल. असं असतं जगात, तरुण माणसा !" इग्नातीय मुसियेविच लेन्याला म्हणाले.

माणसांच्या घोळक्यांनी गजबजलेले धक्के, कालव्याचे दणकट बांधकाम, धरणाचे दरवाजे, सुंदर वस्त्या, धुळीने माखून किनाऱ्यावर विसावा घेणारी यंत्रे, कालव्यातले पाणी पिणारे माजलेले उंट, पाण्याच्या खजिन्यावरच्या सोनेरी लाटांची वलये, हे सगळे बोटीच्या अगदी जवळून तरंगत तरंगत मागे पडत होते.

कार्पोवकाच्या पाण्याच्या खजिन्याजवळ झिमल्यानोय, कार्पोव, सिदेरेंको आणि गर्माश बोटीत चढले. ते फक्त क्रास्नो आर्मेइस्कपर्यंतच येणार होते. झिमल्यानोय यांच्या विभागात अजून काही अपुरी कामे वाट पाहत होती. नेहमीप्रमाणेच ते घाईत होते.

उत्तेजित मनोवृत्तीमुळे लेल्याचे डोळे अधिकच गहिरे दिसत होते. ती सगळ्या बोटीभर फिरत होती. कल्योल्निकोवामधे मुलांना शोधायला गेली असताना आणि पळत डब्यात चढताना जशी ती खळखळून हसली होती तशी ती त्यानंतर एकदाही हसली नव्हती. हल्ली ती फक्त स्मितहास्य करी. वारंवार विचारात गढून जाई. एकदा झिमल्यानोयनी तिला हाक मारून बोलावले आणि विचारले,

" लेल्या, काय झालंय तुला ?"

" काही नाही. असंच आपलं !" लेल्याने उत्तर दिले.

" असंच आपलं म्हणजे काय ? विचारात गढून जाणं ही मानसिक अस्वास्थ्याची खूण आहे." उसन्या कठोरपणाने झिमल्यानोयनी दटावले.

जेव्हा बोट पाण्याच्या खजिन्याकडे निघाली तेव्हा कार्पोव खमाराकडे पुलावर आले. त्यांनी एकमेकांची ओळख करून घेतली. कार्पोवनी दुष्काळाने वारलेल्या बाळाची गोष्ट त्याला सांगितली. " या नव्या समुद्राच्या तळात त्याचं चिमुकलं थडगं आहे.

" अंदाजे कुठे आहे ते थडगं ?" खमाराने विचारले. कार्पोवनी म्हाताऱ्या सिदेरेंको जोडप्याला पुलावर बोलावून घेतले. त्यांच्याबरोबरच्या आपल्या घनिष्ट संबंधामुळे इग्नातीय मुसियेविचही त्यांच्याबरोबर पुलावर आले.

सिदरेंको आजीने प्रश्नार्थक मुद्रेने नवऱ्याकडे पाहिले. " त्याऽऽ तिथे खुणेचा दिवा तरंगतोय तिथं." म्हाताऱ्या सिदरेंकोने सांगितले आणि लहान लहान लाटांबरोबर हेलकावे खाणारा पांढरा खुणेचा दिवा हाताने दाखवला. " अगदी त्या थडग्याच्या शेजारीच लागलाय तो !"

" ठीक आहे ! खमारा म्हणाला.

बोट त्या दिव्याजवळ आली. बोटीचा भोंगा गंभीरपणे निनादला. बोटीने सलामी

दिली. मागच्या टोकावरचं निशाण ध्वज स्तंभावरून अर्ध्यावर उतरवण्यात आले होते. "वाऱ्यासारख्या पळणाऱ्या" लहानग्या बंड्याच्या स्मृतीसाठी बोटीने सलामी दिली होती!

रात्री धरणाच्या शेवटच्या दरवाजातून बोटीने वोल्गात प्रवेश केला.

दूरवर स्टालिनग्राडमधल्या दिव्यांचा प्रकाश भरून राहिला होता.

ख्मारा पुलावर उभा होता. किनाऱ्यावरून गोडसर औषधी गंध दरवळत होता.

"काय हुंगताय् कॅप्टन?"

"कसला वास आहे हा?"

"हा तर वेल्लाचा वास आहे!" व्हील्समनने उत्तर दिले आणि तो हसत सुटला. "वेल्लाचा वास वाळुंजीच्या पानांसारखाच येतो. शप्पत!"

वाळुंजी! ख्माराने कोट काढला. केसावरून हात फिरवला आणि एक उसासा टाकला.

किनाऱ्यावरची वाळुंजी, आवडीची राकीतची झुडुपं! इथं, समुद्राच्या पाण्याचा मारा सहन करायची सवय झालेल्या या बोटीच्या डेकशेजारी! केवढा चमत्कार घडलाय्!

गर्द वाळुंजी आणि तिच्या पर्णसंभारात हरवलेला तारा! ज्याचा प्रकाश या इथल्या शांत रात्रीवर लुकलुकतो आहे. इथल्या वोल्गा डॉन नद्यांच्या पाण्यावर, निद्रिस्त निवासांवर, तलावांच्या शीतल पाण्यावर प्रतिबिंबं पडताहेत त्या ताऱ्याची!

ख्माराचे हृदय अधिरतेच्या आणि प्रेमाच्या वेदनेने जड झाले! मातृभूमीवरच्या प्रेमाच्या वेदनेने, तिथल्या जनतेवरच्या प्रेमाच्या वेदनेने, मानव जातीला शांतता आणि सौख्य मिळवून देणाऱ्या त्यांच्या परिश्रमांवरच्या प्रेमाच्या वेदनेने ते जड झाले! कठड्यावर कोपरं टेकवून डेकवर उभी राहून विचारात गढून जाऊन मध्यरात्रीच्या अंधारात अस्पष्ट दिसणाऱ्या या महानदीकडे पहात राहिलेल्या त्या हसऱ्या आनंदी मुलीबद्दलच्या नाजूक भावनांचा आवेग त्याच्या हृदयाला वेदना देत होता.

स्टालिनग्राडमधले दिवे तरंगत तरंगत नजीक आले. पूर्ण तेजाने तळपू लागले. त्यांच्या प्रकाशाने डेक उजळून निघाला होता.

ज्या शहराने असंख्य विशुद्ध प्रेमळ शूर हृदये आपल्या अभंग विशाल मातृभूमीला दिली त्या चिरंतन कीर्ती लाभलेल्या नगरीला अभिवादन करण्यासाठी, मातृभूमीला अभिवादन करण्यासाठी बोटीने आवाज दिला, बोटीचा भोंगा गंभीरपणे गरजला!

शूर, उदार मानवी मनापेक्षा अधिक सुंदर दुसरं काय असू शकेल? आपल्या परिश्रमांनी आपल्या देशबांधवांसाठी आणि संबंध मानवजातीसाठी जे लोक न्याय आणि सौख्य यांची हमी निर्माण करतात त्या लोकांहून अधिक सुंदर दुसरे काय असू शकेल? काहीही नाही!

बोटीचे स्वागत करण्यासाठी सर्चलाईटच्या प्रकाशांचे तीर स्टालिनग्राडच्या आकाशात घुसत होते.

या अभूतपूर्व, सुखी भूमीवर प्रवेश देणाऱ्या कमानींसारख्या दिसणाऱ्या या प्रकाश झोतांखालून बोट पुढे निघाली. मानवजातीच्या इतिहासातील सुवर्णयुगाकडे — कम्युनिझमच्या सुवर्ण युगाकडे !

१९५१ चा वसंतऋतु.



# आमची प्रकाशने

### कार्ल मार्क्स

**अनुवादक : वसंत तुळपुळे**

भांडवल भाग १ ला — ४० रु.
भांडवल भाग २ रा — २५ रु.
भांडवल भाग ३ रा — ६० रु.
पॅरिस कम्यून — ३ रु.
तत्त्वज्ञानाचे दारिद्र्य — १२ रु.

**अनुवादक : मालिनी तुळपुळे**

लुई बोनापार्टची १८ वी ब्रुमेअर — १० रु.

### कॉ. लेनिन

**अनुवादक : प्रा. दि. के. बेडेकर**

धर्म — ४ रु.

**अनुवादक : स. ह. मोडक**

कामगार क्रांती आणि तत्त्वच्युत कौट्स्की — ८ रु.

**अनुवादक : शांता रानडे**

कार्ल मार्क्स आणि फ्रेडरिक एंगल्स यांचा निवडक पत्रव्यवहार — ५० रु.

### फ्रेडरिक एंगल्स

**अनुवादक : श्री. ब. मा. देशमुख**

कुटुंबसंस्था, शासनसंस्था, खाजगी मालमत्ता यांचा उगम — ६ रु.

**अनुवादक : वसंत तुळपुळे**

कामगारांशी हितगुज — ३ रु.

### इतिहासाचार्य वि. का. राजवाडे

भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास — ८ रु.

### मालती गाडगीळ

डबाबाटलीवाली — ३–५० रु.
मुस्लिम श्रमिका — ६ रु.
स्त्रीचे बंधविमोचन — ७५ पैसे

### कमल भागवत

समाजवाद म्हणजे आहे तरी काय ? — ३ रु.
महागाई कमी करता येईल — ५० पैसे
समाजाच्या इतिहासाचा उलगडा म्हणजेच ऐतिहासिक भौतिकवाद — १ रु.

### एन्. एम्. टिळेकर

पुण्याची जातीय दंगल जबाबदार कोण ? — ५० पैसे

### विनायक भावे

कार्ल मार्क्स—व्यक्ती व शक्ती — १–५० रु.

### वसंत तुळपुळे

वरकड मूल्यांचा सिद्धांत अर्थात कामगार वर्गाच्या पिळवणुकीचा सिद्धान्त — १ रु.

**कमल भागवत, मालती गाडगीळ**
**शांता केळकर, कुसुम रणदिवे,**
**मालिनी तुळपुळे, शांता रानडे**

स्त्री चळवळीची वाटचाल — २० रु.

### आमची आगामी प्रकाशने

निसर्गाचा द्वंद्वात्मक विकास
सिन्योजा
वान्या मामा
समुद्र पक्षी